# ॥ अथ श्रीमङ्गलाचरणम् ॥

वर्णानामर्थसङ्घानां रसानां छन्दसामपि ।
मङ्गलानांच कर्तारौ वन्दे वाणीविनायकौ ॥१॥

वसुदेवसुतं देवं कंसचाणूरमर्दनम् ।
देवकी परमानन्दं कृष्णं वन्दे जगद्गुरुम् ॥२॥

अखण्डमण्डलाकारं व्याप्तं येन चराचरम् ।
तत्पदं दर्शितं येन तस्मै श्री गुरवे नमः ॥३॥

येनाक्षरसमाम्नायमधिगम्य महेश्वरात् ।
कृत्स्नं व्याकरणं प्रोक्तं तस्मै श्रीपाणिनये नमः ॥४॥

आदिनाथेन मच्छिन्द्रः मच्छिन्द्रेण च गोरक्षः ।
गोरक्षेण गहीनी च निवृत्तिश्च गहीनिना ॥५॥
निवृत्तिनोपदिष्टश्च ज्ञानदेवो दयानिधिः ।
ज्ञानदेवेन श्रीजोग एतेभ्यो गुरुभ्यो नमः ॥६॥

---

## मङ्गलाचरण का करावे?

१. कोणतेही शुभकार्य करतांना त्यात कुठल्याही प्रकारचा व्यत्यय (विघ्न) येऊ नये म्हणून (प्रत्येक) कर्माच्या प्रारंभी शास्त्रात मंगलाचरण (आपल्या ईष्टाचे स्मरण, वेदाचे स्तवन, स्तोत्र पठनादि करणे) याचे विधान शास्त्रात आहे.

२. कोणतेही शुभकार्य पूर्ण झाल्यावर त्यात जी काही त्रुटी झाली असेल, ती राहू नये (तिचा दोष लागू नये) म्हणून प्रत्येक शुभकार्य पूर्ण झाल्यावर त्याच्या शेवटी सुद्धा शास्त्रात मंगलाचरण करण्याचे विधान सांगितलेले आहे.

मंगलाचरण संक्षिप्त असेल तरी चालेल, परन्तु ते शांत भावाने, (मनःपूर्वक, ध्यानमग्न होऊन) करावे, घाई घाईने नव्हे. मंगलाचरणाने मन एकाग्र करुन पठन-पाठन आदि कोणतेही शुभकार्यास प्रारंभ करावा. असे केल्यास बुद्धिची स्थिरता व एकाग्रता अवश्य प्राप्त होते.

# प्रथमः पाठः

## भ्वादिगण परस्मैपद* पठ् - धातु लट् लकार (वर्तमानकाळ)

**वचन** - संस्कृत भाषेत व्यवहारातील कोणत्याही व्यक्ति, वस्तु इत्यादिंची संख्या दाखवितांना ती एक असल्यास **'एकवचन'** दोन असल्यास **द्विवचन** व दोनपेक्षा अधिक असल्यास **बहुवचन** अशाप्रकारे या तीन वचनांचा प्रयोग होतो. इतर भाषेत फक्त एकवचन आणि बहुवचन (अनेकवचन) हे दोनच वचन असतात.

**पुरुष** - कर्त्याच्या विभिन्न रूपास 'पुरुष' असे म्हणतात. ते महर्षि पाणिनि पध्दतीच्यानुसार खालीलप्रमाणे -

| पुरुष | एकवचन | द्विवचन | बहुवचन |
|---|---|---|---|
| प्रथम पुरुष | सः = तो | तौ = ते दोघे | ते = ते सर्व |
| मध्यम पुरुष | त्वम् = तू | युवाम् = तुम्ही दोघे | यूयम् = तुम्ही सर्व |
| उत्तम पुरुष | अहम् = मी | आवाम् = आम्ही दोघे | वयम् = आम्ही सर्व |

**लकार** - महर्षि पाणिनि मुनिंनी काळाच्या निश्चित बोधासाठी त्याचे जे दहा (१०) प्रकार केलेले आहेत, त्यांच्या सुरुवातीचे प्रत्येक अक्षर 'ल' युक्त असल्यामुळे त्यांना 'लकार' असे म्हणतात. ते पुढील प्रमाणे - लट्, लिट्, लुट्, लृट्, लेट्, लोट्, लङ्, लिङ्, लुङ् आणि लृङ् यांच्यातील आपण पहिला प्रकार बघुया तो म्हणजे 'लट् लकार' . हा लकार निश्चित कोणत्या काळात असावा? याचे उत्तर महर्षि पाणिनि खालील सूत्रात देतात.

**वर्तमानेलट्** = वर्तमानकाळातील क्रिया व्यक्त करण्यासाठी लट् लकाराचा प्रयोग करतात.

लट् लकाराची संक्षिप्त प्रत्यये*

| पुरुष | एकवचन | द्विवचन | बहुवचन |
|---|---|---|---|
| प्रथम पुरुष | अति | अतः | अन्ति |
| मध्यम पुरुष | असि | अथः | अथ |
| उत्तम पुरुष | आमि | आवः | आमः |

**गण★**- महर्षि पाणिनि मुनिंच्या व्याकरणात (२१००) धातुंचे जे विशिष्ट दहा (१०) गट आहेत, त्यांनाच **'गण'** असे म्हणतात. त्यांच्यातील **'भ्वादिगण'** हा पहिल्या क्रमांकाचा गण असून त्याच्यातील पठ् धातुला लट् लकाराची संक्षिप्त प्रत्यये लाऊन त्याची रूपे कशी होतात ते आपण पुढिल प्रमाणे शिकुया.-

**पठ्** = शिकणे, वाचणे

| पुरुष | एकवचन | द्विवचन | बहुवचन |
|---|---|---|---|
| प्रथम पुरुष | पठ् + अति = पठति | पठ् + अतः = पठतः | पठ् + अन्ति = पठन्ति |
| मध्यम पुरुष | पठ् + असि = पठसि | पठ् + अथः = पठथः | पठ् + अथ = पठथ |
| उत्तम पुरुष | पठ् + आमि = पठामि | पठ् + आवः = पठावः | पठ् + आमः = पठामः |

* पाणीनीय व्याकरणात धातुंचे (क्रियावाची शब्दांचे) परस्मैपद व आत्मनेपद असे दोन विभाग आहेत. काही धातुंना फक्त परस्मैपदाचे प्रत्यय लागतात त्यांना "परस्मै पदी धातु" म्हणतात. काही धातुंना फक्त आत्मनेपदाचे प्रत्यय लागतात त्यांना "आत्मनेपदी धातु" म्हणतात. काही-काही धातुंना परस्मैपद व आत्मनेपद या दोन्ही पदांचे प्रत्यये लागतात त्यांना "उभयपदी धातु" म्हणतात.

* काही वेळेस वर्तमानकाळातील (लट् लकाराची) संक्षित प्रत्ययांमध्ये बदल घडून येतो परन्तु **'भ्वादि, दिवादि, तुदादि व चुरादि** या गणामध्ये मात्र बदल दिसून येत नाही

★ संस्कृत व्याकरणात १. भ्वादि, २. अदादि, ३. जुहोत्यादि, ४. दिवादि, ५. स्वादि, ६. तुदादि, ७. रुधादि, ८. तनादि, ९. क्र्यादि १०. चुरादि अशा प्रकारे महर्षि पाणिनि मतानुसार हे दहा (१०) गण (त्यांच्या व्याकरण शास्त्रात) दिसून येतात.

# पहिला पाठ

☞ **कर्त्र्यधीनं क्रियापदम्** = कर्त्याच्या पुरुष वचनाप्रमाणे क्रियापदाचे पुरुष वचन असतात.

उदा. – सः पठति । = (तो शिकतो) या वाक्यात कर्ता 'सः' हा प्रथम पुरुषी एकवचनी असल्यामुळे क्रियापद 'पठति' हे सुद्धा प्रथमपुरुषी एकवचनी आहे.

या प्रमाणे तौ पठतः, ते पठन्ति इत्यादि पुढील सारणीमध्ये बघु या.

| पुरुष | एकवचन | द्विवचन | बहुवचन |
|---|---|---|---|
| प्रथम पुरुष | सः पठति | तौ पठतः | ते पठन्ति |
| मध्यम पुरुष | त्वम् पठसि | युवाम् पठथः | यूयम् पठथ |
| उत्तम पुरुष | अहम् पठामि | आवाम् पठावः | वयम् पठाम |

आता आपण वरील वाक्यांचा अर्थ बघु या

| पुरुष | एकवचन | द्विवचन | बहुवचन |
|---|---|---|---|
| प्रथम पुरुष | सः पठति<br>तो शिकतो / वाचतो | तौ पठतः<br>ते दोघे शिकतात / वाचतात | ते पठन्ति<br>ते सर्व शिकतात/ वाचतात |
| मध्यम पुरुष | त्वम् पठसि<br>तू शिकतोस / वाचतोस | युवाम् पठथः<br>तुम्ही दोघे शिकता/ वाचतात | यूयम् पठथ<br>तुम्ही शिकतात/ वाचतात |
| उत्तम पुरुष | अहम् पठामि<br>मी शिकतो / वाचतो | आवाम् पठावः<br>आम्ही दोघे शिकतो / वाचतो | वयम् पठाम<br>आम्ही शिकतो/ वाचतो |

| अशुद्ध वाक्य | शुद्ध वाक्य | नियम |
|---|---|---|
| सः पठसि । * | सः पठति । | कर्त्र्यधीनं क्रियापदम् । |
| अहम् पठाम : । | अहम् पठामि । | कर्त्र्यधीनं क्रियापदम् । |

**स्वाध्याय – जोड्या लावा**

| 'अ' गट | 'ब' गट |
|---|---|
| सः | पठामि |
| यूयम् | पठामः |
| अहम् | पठति |
| वयम् | पठथ |

* संस्कृत भाषेत पूर्ण विरामासाठी '।' (सरळ उभी रेष) हे चिन्ह वापरतात.

# द्वितीयः पाठः

## भ्वादिगणातील काही धातु

**वद् = बोलणे, सांगणे**

| | | | |
|---|---|---|---|
| प्रथम पुरुष | वदति | वदतः | वदन्ति |
| मध्यम पुरुष | वदसि | वदथः | वदथ |
| उत्तम पुरुष | वदामि | वदावः | वदामः |

प्र.पु. सः वदति = तो बोलतो तौ वदतः = ते दोघे बोलतात ते वदन्ति = ते सर्व बोलतात
म. पु. त्वम् वदसि = तू बोलतोस युवाम् वदथ = तुम्ही दोघे बोलतात यूयम् वदथ = तुम्ही सर्व बोलतात
उ.पु. अहम् वदामि = मी बोलतो आवाम् वदावः= आम्ही दोघे बोलतो वयम् वदामः = आम्ही सर्व बोलतो

**भू (भव्)* = होणे, असणे**

| | | | |
|---|---|---|---|
| प्रथम पुरुष | भवति | भवतः | भवन्ति |
| मध्यम पुरुष | भवसि | भवथः | भवथ |
| उत्तम पुरुष | भवामि | भवावः | भवामः |

प्र.पु. सः भवति = तो होतो तौ भवतः = ते दोघे होतात ते भवन्ति = ते सर्व होतात
म. पु. त्वम् भवसि = तू होतोस युवाम् भवथः = तुम्ही दोघे होतात यूयम् भवथ = तुम्ही सर्व होतात
उ.पु. अहम् भवामि = मी होतो आवाम् भवावः=आम्ही दोघे होतात वयम् भवामः = आम्ही सर्व होतात

**गम् (गच्छ्) जाणे**

| | | | |
|---|---|---|---|
| प्रथम पुरुष | गच्छति | गच्छतः | गच्छन्ति |
| मध्यम पुरुष | गच्छासि | गच्छथः | गच्छथ |
| उत्तम पुरुष | गच्छामि | गच्छावः | गच्छामः |

प्र.पु. सः गच्छति = तो जातो तौ गच्छः = ते दोघे जातात ते गच्छन्ति= ते सर्व जातात
म. पु. त्वम् गच्छासि = तू जातोस युवाम् गच्छाथः=तुम्ही दोघे जातात यूयम् गच्छथ= तुम्ही सर्व जातात
उ.पु. अहं गच्छामि= मी जातो आवाम् गच्छावः=आम्ही दोघे होतो वयम् गच्छामः= आम्ही सर्व जातो

**संधी = मोऽनुस्वारः** = पदान्त अर्थात शब्दरूपाच्या किंवा धातुरूपाच्या शेवटील 'म्' (हलन्त म्) च्या पुढे कोणतेही व्यंजन आल्यास 'म्' चा अनुस्वार होतो. 'म्' पुढे स्वर आल्यास मात्र 'म्' चा अनुस्वार होत नाही.

उदा. – त्वम् पठसि= त्वं पठसि । अहम् पठामि = अहं पठामि ।

---

*ज्या धातुंच्या पुढे (समोर) कंसात त्याचे जे वेगळे रूप दिलेले आहे, त्या कंसातील रूपालाच लट्, लोट् लङ् आणि विधिलिङ् लकाराची प्रत्येये लागतील. लोट्, लङ्, आणि विधिलिङ् यांचा विचार प्रसंगप्राप्त पुढे करण्यात येईल.

# दुसरा पाठ

**१. उदाहरण वाक्ये**

१. सः गच्छति = तो जातो. २. वयं वदामः = आम्ही बोलतो.

**२. मराठी भाषेत भाषान्तर करा.**

१. सः भवति । २. त्वं वदसि । ३. अहं गच्छामि ।
४. तौ भवतः । ५. युवां वदथः । ६. आवां गच्छावः ।
७. ते भवन्ति । ८. यूयं वदथ । ९. वयं गच्छामः ।

**३. संस्कृत भाषेत भाषांतर करा**

१. तो बोलतो. २. ते दोघे जातात. ३. ते सर्व होतात.
४. तू बोलतोस. ५. तुम्ही दोघे जातात. ६. तुम्ही सर्व होतात
७. मी बोलतो ८. आम्ही दोघे जातो ९. आम्ही सर्व होतात
१०. तो शिकतो ११. तुम्ही दोघे शिकतात १२. आम्ही सर्व शिकतो.

**४. शुद्ध करा आणि नियम सांगा**

१. सः गच्छन्ति । २. त्वं पठति । ३. अहं भवामः ।
४. युवां वदथ । ५. वयं पठथः । ६. तौ वदावः ।

**५. जोड्या लावा**



# तृतीयः पाठः

## भ्वादिगणातील काही धातु

**रक्ष्** = रक्षण करणे

| | | | |
|---|---|---|---|
| प्रथम पुरुष | रक्षति | रक्षतः | रक्षन्ति |
| मध्यम पुरुष | रक्षसि | रक्षथः | रक्षथ |
| उत्तम पुरुष | रक्षामि | रक्षावः | रक्षामः |

| | | | |
|---|---|---|---|
| प्र.पु. | सः रक्षति= तो रक्षण करतो | तौ रक्षतः = ते दोघे रक्षण करतात | ते रक्षन्ति = ते सर्व रक्षण करतात |
| म. पु. | त्वं रक्षसि=तू रक्षण करतोस | युवां रक्षथः = तुम्ही दोघे रक्षण करतात | यूयं रक्षथ = तुम्ही सर्व रक्षण करतात |
| उ.पु. | अहं रक्षामि=मी रक्षण करतो | आवां रक्षावः = आम्ही दोघे रक्षण करतो | वयं रक्षामः = आम्ही सर्व रक्षण करतो |

**नम्** = नमस्कार करणे, नमणे

| | | | |
|---|---|---|---|
| प्रथम पुरुष | नमति | नमतः | नमन्ति |
| मध्यम पुरुष | नमसि | नमथः | नमथ |
| उत्तम पुरुष | नमामि | नमावः | नमामः |

| | | | |
|---|---|---|---|
| प्र.पु. | सः नमति= तो नमस्कार | तौ नमतः = ते दोघे नमस्कार करतात | ते नमन्ति = ते सर्व नमस्कार करतात |
| म. पु. | त्वं नमसि=तू नमस्कार करतोस | युवां नमथः=तुम्ही दोघे नमस्कार करता | यूयं नमथ = तुम्ही सर्व नमस्कार करता |
| उ.पु. | अहं नमामि=मी नमस्कार करतो | आवां नमावः=आम्ही दोघे नमस्कार करतो | वयं नमामः = आम्ही सर्व नमस्कार करतो |

**पच्** = शिजविणे, स्वयंपाक करणे

| | | | |
|---|---|---|---|
| प्रथम पुरुष | पचति | पचतः | पचन्ति |
| मध्यम पुरुष | पचसि | पचथः | पचथ |
| उत्तम पुरुष | पचामि | पचावः | पचामः |

| | | | |
|---|---|---|---|
| प्र.पु. | सः पचति= तो शिजवितो | तौ पचतः = ते दोघे शिजवतात | ते पचन्ति = ते सर्व शिजवतात |
| म. पु. | त्वं पचसि=तू शिजवितोस | युवां पचथः=तुम्ही दोघे शिजवता | यूयं पचथ = तुम्ही सर्व शिजवता |
| उ.पु. | अहं पचामि=मी शिजवितो | आवां पचावः=आम्ही दोघे शिजवतो | वयं पचामः = आम्ही सर्व शिजवतो |

**शुच् (शोच्)** = शोक करणे

| | | | |
|---|---|---|---|
| प्रथम पुरुष | शोचति | शोचतः | शोचन्ति |
| मध्यम पुरुष | शोचसि | शोचथः | शोचथ |
| उत्तम पुरुष | शोचामि | शोचावः | शोचामः |

| | | | |
|---|---|---|---|
| प्र.पु. | सः शोचति= तो शोक करतो | तौ शोचतः = ते दोघे शोक करतात | ते शोचन्ति = ते सर्व शोक करतात |
| म. पु. | त्वं शोचसि=तू शोक करतोस | युवां शोचथः=तुम्ही दोघे शोक करता | यूयं शोचथ = तुम्ही सर्व शोक करता |
| उ.पु. | अहं शोचामि=मी शोक करतो | आवां शोचावः=आम्ही दोघे शोक करतो | वयं शोचामः = आम्ही सर्व शोक करतो |

**हस्** = हसणे

| | | | |
|---|---|---|---|
| प्रथम पुरुष | हसति | हसतः | हसन्ति |
| मध्यम पुरुष | हससि | हसथः | हसथ |
| उत्तम पुरुष | हसामि | हसावः | हसामः |

| | | | |
|---|---|---|---|
| प्र.पु. | स हसति= तो हसतो | तौ हसतः = ते दोघे हसतात | ते हसन्ति = ते सर्व हसतात |
| म. पु. | त्वं हससि=तू हसतोस | युवां हसथः=तुम्ही दोघे हसतात | यूयं हसथ = तुम्ही सर्व हसतात |
| उ.पु. | अहं हसामि=मी हसतो | आवां हसावः=आम्ही दोघे हसतो | वयं हसामः = आम्ही सर्व हसतो. |

**संधी = एतत्तदोः सुलोपः** ===== सः आणि एषः* यांच्या पुढे कोणतेही व्यंजन आल्यास यांच्या विसर्गाचा लोप होतो.

उदा. : सः गच्छति= स गच्छति (तो जातो) एषः गच्छति = एष गच्छति हा जातो

* 'एषः' हे एतत् सर्वनामाच्या पुल्लिंग प्रथमा विभक्तीचे एकवचन आहे.

# तिसरा पाठ

## १. उदाहरण वाक्ये

१. स नमति = तो नमस्कार करतो

२. ते रक्षन्ति = ते सर्व रक्षण करतात

३. त्वं पचसि = तू स्वयंपाक करतोस

४. वयं रक्षाम : = आम्ही सर्व रक्षण करतो

## २. मराठी भाषेत भाषान्तर करा.

१. स शोचति ।

२. तौ पचतः ।

३. अहं पठामि ।

४. तौ रक्षतः ।

५. ते पचन्ति ।

६. यूयं शोचथ ।

७. आवां रक्षावः

८. वयं नमामः ।

९. ते पठन्ति ।

## ३. संस्कृत भाषेत भाषान्तर करा.

१. तो हसतो

२. ते दोघे रक्षण करतात

३. तुम्ही सर्व शोक करतात

४. आम्ही दोघे नमस्कार करतो

५. ते सर्व स्वयंपाक करता[illegible]

६. मी. जातो

७. तू हसतोस

८. आम्ही दोघे स्वयंपाक [illegible]

९. तुम्ही दोघे शिकतात

१०. ते दोघे शोक करतात

११. तुम्ही सर्व हसतात

१२. ते सर्व नमस्कार करतात.

## ४. शुद्ध करा आणि नियम सांगा

१. स पचन्ति ।

२. आवां वदामः

३. ते शोचावः ।

## ५. जोड्या लावा

| 'अ' गट | 'ब' गट |
|---|---|
| सः | रक्षामः |
| ते | वदति |
| वयम् | पचसि |
| त्वम् | गच्छन्ति |

## ६. वाक्य परिवर्तन

स नमति = तो नमस्कार करतो = हे एकवचनी वाक्य द्विवचनात व बहुवचनात परिवर्तित करुया.

तौ नमतः = ते दोघे नमस्कार करतात (द्विवचन)

ते नमन्ति = ते सर्व नमस्कार करतात (बहुवचन)

या प्रमाणे 'तू हसतोस' व 'मी जातो' या वाक्यांना द्विवचन व बहुवचनामध्ये परिवर्तन करा.

# चतुर्थः पाठः

## दिवादिगण* लट्

लट् लोट् लङ आणि विधिलिङ् या लकारांची संक्षिप्त प्रत्यये लागण्यापूर्वी दिवादिगणातील धातुंना 'य्' लागतो.

आता आपण दिव् (दीव्) या दिवादिगणातील धातुचे प्रथम पुरुष एकवचनाचे रूप बनवू या

दीव् + य् + अति = दीव्यति

दिव् (दीव्) = प्रकाशणे, जुगार खेळणे

| | | | |
|---|---|---|---|
| प्रथम पुरुष | दीव्यति | दीव्यतः | दीव्यन्ति |
| मध्यम पुरुष | दीव्यसि | दीव्यथः | दीव्यथ |
| उत्तम पुरुष | दीव्यामि | दीव्यावः | दीव्यामः |

| | | | |
|---|---|---|---|
| प्र.पु. | स दीव्यति = तो प्रकाशतो | तौ दीव्यतः = ते दोघे प्रकाशतात | ते दीव्यन्ति = ते सर्व प्रकाशतात |
| म. पु. | त्वं दीव्यसि= तू प्रकाशतोस | युवां दीव्यथः = तुम्ही दोघे प्रकाशतात | यूयं दीव्यथ = तुम्ही सर्व प्रकाशतात |
| उ.पु. | अहं दीव्यामि = मी प्रकाशतो | आवां दीव्यावः= आम्ही दोघे प्रकाशतो | वयं दीव्यामः = आम्ही सर्व प्रकाशतो |

तुष् = संतुष्ट होणे, खुष होणे

| | | | |
|---|---|---|---|
| प्रथम पुरुष | तुष्यति | तुष्यतः | तुष्यन्ति |
| मध्यम पुरुष | तुष्यसि | तुष्यथः | तुष्यथ |
| उत्तम पुरुष | तुष्यामि | तुष्यावः | तुष्यामः |

| | | | |
|---|---|---|---|
| प्र.पु. | स तुष्यति = तो संतुष्ट होतो | तौ तुष्यतः = ते दोघे संतुष्ट होतात | ते तुष्यन्ति = ते सर्व संतुष्ट होतात |
| म. पु. | त्वं तुष्यसि = तू संतुष्ट होतोस | युवां तुष्यथः = तुम्ही दोघे संतुष्ट होतात | यूयं तुष्यथ = तुम्ही सर्व संतुष्ट होतात |
| उ.पु. | अहं तुष्यामि= मी संतुष्ट होतो | आवां तुष्यावः=आम्ही दोघे संतुष्ट होतो | वयं तुष्यामः = आम्ही सर्व संतुष्ट होतो |

| | | | |
|---|---|---|---|
| भ्रम् (भ्राम्)= फिरणे, भ्रमण करणे | भ्राम्यति★ | भ्राम्यतः | भ्राम्यन्ति |
| नश् = नष्ट होणे | नश्यति | नश्यतः | नश्यन्ति |
| मुह् = मोहित होणे, मुर्च्छित होणे, वेडे होणे | मुह्यति | मुह्यतः | मुह्यन्ति |
| शुष् = वाळणे, कोरडे होणे | शुष्यति | शुष्यतः | शुष्यन्ति |
| नृत् = नाचणे, नृत्य करणे | नृत्यति | नृत्यतः | नृत्यन्ति |

### भ्वादिगणातील काही धातु

| | | | |
|---|---|---|---|
| बुध् (बोध्) = जाणणे | बोधति | बोधतः | बोधन्ति |
| चर् = जाणे, चालणे, चरणे | चरति | चरतः | चरन्ति |
| खाद् = खाणे | खादति | खादतः | खादन्ति |
| तप् = तापणे, प्रकाशणे, तप करणे | तपति | तपतः | तपन्ति |

* दिवादिगण हा पाणिनीय धातुपाठातील चतुर्थ (चौथ्या) क्रमांकाचा गण असल्यामुळे यास 'चतुर्थगण' असे सुद्धा म्हणतात.

★ वरील प्रमाणे भ्राम्यसि, भ्राम्यथ, नश्यसि इत्यादि रूपे बनतील.

# चौथा पाठ

**१. उदाहरण वाक्ये**

१. स बोधति = तो जाणतो,
२. ते नृत्यन्ति = ते नाचतात
३. त्वं तुष्यसि = तू संतुष्ट होतोस
४. वयं भ्राम्यामः = आम्ही* फिरतो

**२. मराठी भाषेत भाषान्तर करा.**

१. स नश्यति । २. त्वं नृत्यसि । ३. अहं भ्राम्यामि ।
४. स मुह्यति । ५. त्वं तुष्यसि । ६. अहं खादामि ।
७. स दीव्यति । ८. त्वं मुह्यसि । ९. अहं तपामि ।

**३. संस्कृत भाषेत भाषांतर करा**

**क)**

१. तो नाचतो २. तू फिरतोस ३. मी मोहित होतो।
४. तो संतुष्ट होतो ५. तू जाणतोस ६. मी जातो (चर)
७. तो वाळतो ८. तू खातोस ९. मी नमस्कार करत आहे★

**ख.**

१. ते दोघे फिरतात २. तुम्ही दोघे मोहित होतात.
३. आम्ही दोघे संतुष्ट होतो. ४ तुम्ही दोघे नाचतात.

**ग.**

१. ते कोरडे हो तात २. तुम्ही नष्ट होतात.
३. आम्ही खातो. ४. आम्ही जाणतो.

**४. शुद्ध करा आणि नियम सांगा**

१. स नश्यन्ति । २. त्वं नृत्यति । ३. अहं तुष्यथ ।
४. यूयं बोधामि । ५. अहं चरावः ६. वयं तपसि ।

**५. स्वाध्याय**

**अ.** ३ - क मधील वाक्यांना द्विवचनामध्ये व बहुवचनामध्ये परिवर्तित करा.

**आ.** पठ्, गम्, भू, हस्, चर्, ह्या धातुंच्या लट् लकाराची रूपे लिहा

**६. जोड्या लावा**

| 'अ' गट | 'ब' गट |
| --- | --- |
| अहम् | मुह्यन्ति |
| ते | शुष्यामि |
| वयम् | तपसि |
| त्वम् | खादामः |

---

* 'ते सर्व' बद्दल 'ते' 'तुम्ही सर्व' बद्दल 'तुम्ही' व 'आम्ही सर्व' बद्दल 'आम्ही' असा शब्दप्रयोग केलेला आढळतो.

★ क्रियेच्या सुरुवातीपासून समाप्तिपर्यंतच्या काळाला 'वर्तमानकाळ' असे म्हणतात. ''मी नमस्कार करत आहे'' या वाक्यात क्रिया चालू आहे म्हणून त्याचे भाषान्तर ''अहं नमामि'' असे होईल. या विषयी विशेष विचार प्रसंग प्राप्त पुढे करण्यात येईल.

# पञ्चमः पाठः

## तुदादिगण* लट्

## तुदादिगणातील काही धातु

**तुद्** = दुःख देणे

| | | | |
|---|---|---|---|
| प्र.पु. | स तुदति= तो दुःख देतो | तौ तुदतः = ते दोघे दुःख देतात | ते तुदन्ति = ते सर्व दुःख देतात |
| म. पु. | त्वं तुदसि=तू दुःख देतोस | युवां तुदथः = तुम्ही दोघे दुःख देतात | यूयं तुदथ = तुम्ही सर्व दुःख देतात |
| उ.पु. | अहं तुदामि=मी दुःख देतो | आवां तुदावः = आम्ही दोघे दुःख देतो | वयं तुदामः = आम्ही सर्व दुःख देतो |

**विश्** = प्रवेश करणे, शिरणे

| | | | |
|---|---|---|---|
| प्र.पु. | स विशति= तो प्रवेश करतो | तौ विशतः = ते दोघे प्रवेश करतात | ते विशन्ति = ते प्रवेश करतात |
| म. पु. | त्वं विशसि=तू प्रवेश करतोस | युवां विशथः=तुम्ही दोघे प्रवेश करता | यूयं विशथ = तुम्ही प्रवेश करतात |
| उ.पु. | अहं विशामि=मी प्रवेश करतो | आवां विशावः=आम्ही दोघे प्रवेश करतो | वयं विशामः = आम्ही प्रवेश करतो |

**उप *+विश्** = बसणे

| | | | |
|---|---|---|---|
| प्र.पु. | सः✿ उपविशति = तो बसतो | तौ उपविशतः = ते दोघे बसतात | ते उपविशन्ति = ते बसतात |
| म. पु. | त्वम्★ उपविशसि =तू बसतोस | युवाम् उपविशथः=तुम्ही दोघे बसतात | यूयं उपविशथ = तुम्ही बसतात |
| उ.पु. | अहम् उपविशामि=मी बसतो | आवां उपविशावः=आम्ही दोघे बसतो | वयम् उपविशामः = आम्ही बसतो |

**कृष्**⅄ = नांगरणे

| | | | |
|---|---|---|---|
| प्र.पु. | स कृषति= तो नांगरतो | तौ कृषतः = ते दोघे नांगरतात | ते कृषन्ति = ते नांगरतात |
| म. पु. | त्वं कृषसि=तू नांगरतोस | युवां कृषथः=तुम्ही दोघे नांगरतात | यूयं कृषथ = तुम्ही नांगरतात |
| उ.पु. | अहं कृषामि=मी नांगरतो | आवां कृषावः=आम्ही दोघे नांगरतो | वयं कृषामः = आम्ही नांगरतो |

**इष् (इच्छ्)** = इच्छिणे

| | | | |
|---|---|---|---|
| प्र.पु. | सः✿ इच्छति= तो इच्छितो | तौ इच्छतः = ते दोघे इच्छितात | ते इच्छन्ति = ते इच्छितात |
| म. पु. | त्वम्★ इच्छसि=तू इच्छितोस | युवाम् इच्छथः=तुम्ही दोघे इच्छितात | यूयम् इच्छथ = तुम्ही इच्छितात |
| उ.पु. | अहम् इच्छामि=मी इच्छितो | आवाम् इच्छावः=आम्ही दोघे इच्छितात | वयम् इच्छामः = आम्ही इच्छितो |

## भ्वादिगणातील काही धातु

| | | | | |
|---|---|---|---|---|
| जि (जय्) = जिंकणे | प्र. पु. | जयति | जयतः | जयन्ति |
| यज् = यजन–यज्ञ करणे,पूजन करणे | प्र. पु. | यजति | यजतः | यजन्ति |
| तृ (तर्) = तरणे, पोहणे | प्र. पु. | तरति | तरतः | तरन्ति |

## दिवादिगणातील काही धातु

| | | | | |
|---|---|---|---|---|
| लुभ् = लोभ करणे | प्र. पु. | लुभ्यति | लुभ्यतः | लुभ्यन्ति |
| पुष् = पुष्ट करणे, पुष्ट होणे | प्र. पु. | पुष्यति | पुष्यतः | पुष्यन्ति |

---

* तुदादिगण हा पाणिनीय धातुपाठातील षष्ठ (सहाव्या) क्रमांकाचा गण असल्यामुळे यास '**षष्ठगण**' असे सुद्धा म्हणतात. तुदादिगणातील धातु साधारणतः भ्वादिगणातील पठ् धातुप्रमाणे चालतात.

* धातुंच्या पूर्वी लागणाऱ्या प्र, परा, अप, सम्....., उप इत्यादिंना उपसर्ग म्हणतात.

✿ सः च्या पुढे स्वर आल्यामुळे सः च्या विसर्गाचा लोप झालेला नाही.

★ 'म्' च्या पुढे स्वर आल्यामुळे 'म्' चा अनुस्वार झालेला नाही.

⅄ 'कृष्' (कर्ष्) = ओढणे, खेचणे – हा धातु भ्वादिगणातील आहे. भ्वादिगणातील याची रूपे **कर्षति – कर्षतः – कर्षन्ति** इ.

# पाचवा पाठ

## १. उदाहरण वाक्ये

१. स कृषति = तो नांगरतो
२. त्वं यजसि = तू पूजन करतोस
३. अहं जयामि = मी जिंकतो
४. वयं तरामः = आम्ही तरतो

## २. मराठी भाषेत भाषान्तर करा.

१. स विशति ।
२. त्वम् उपविशसि ।
३. अहं कृषामि ।
४. सः इच्छति ।
५. त्वं जयसि ।
६. अहं तरामि ।
७. ते लुभ्यन्ति ।
८. यूयं पुष्यथ ।
९. वयम् उपविशामः ।

## ३. संस्कृत भाषेत भाषान्तर करा.

क.

१. तो बसतो
२. तू नांगरतोस.
३. मी इच्छितो
४. तो जिंकतो
५. तू शिरतोस
६. मी बसतो
७. तो लोभ करतो
८. तू पुष्ट करतोस
९. मी प्रवेश करतो

ख.

१. ते दोघे इच्छितात.
२. तुम्ही दोघे जिंकतात.
३. आम्ही दोघं बसतो
४. ते दोघे दुःख देतात
५. तुम्ही दोघे प्रवेश करतात
६. आम्ही दोघे पूजन करतो

ग.

१. ते प्रवेश करतात
२. तुम्ही बसतात
३. आम्ही जिंकतो
४. ते पुष्ट करतात
५. तुम्ही बसतात
६. आम्ही पुष्ट होतो.

## ४.

| अशुद्ध वाक्य | शुद्ध वाक्य | नियम |
|---|---|---|
| अहं इच्छामि । | अहम् इच्छामि । | मोऽनुस्वार : । |
| स उपविशति । | सः उपविशति । | एततदोः सुलोप : । |
| स विशामः । | स विशति । | कर्त्र्यधीनं क्रियापदम् । |

## ५. स्वाध्याय

अ = ३. क. मधील वाक्यांना द्विवचनामध्ये व बहुवचनामध्ये परिवर्तित करा.
आ = ३. ग. मधील वाक्यांना एकवचनामध्ये परिवर्तित करा.
इ = तुद्, विश, इष्, जि, पुष् या धातुच्या लट् लकाराची संपूर्ण रूपे लिहा

## ६. जोड्या लावा

| 'अ' गट | 'ब' गट |
|---|---|
| आवाम् | पुष्यामः |
| ते | लुभ्यथ |
| त्वम् | तुदसि |
| यूयम् | इच्छन्ति |
| वयम् | यजावः |

# षष्ठः पाठः

## चुरादिगण* गण

लट्, लोट्, लङ् आणि विधिलिङ् या लकारांची संक्षिप्त प्रत्यये लागण्यापूर्वी चुरादिगणातील धातुंना 'अय्'

आपण चुर् (चोर्) या चुरादिगणातील धातुचे प्रथमपुरुष एकवचनाचे रूप बनवू या.
भय्+अति=चोरयति

## चुरादिगणातील काही धातु

चोर्) = चोरणे, चोरी करणे

| | | |
|---|---|---|
| स चोरयति= तो चोरतो | तौ चोरयतः = ते दोघे चोरतात | ते चोरयन्ति = ते सर्व चोरी करतात |
| त्वं चोरयसि=तू चोरतोस | युवां चोरयथः = तुम्ही दोघे चोरतात | यूयं चोरयथ = तुम्ही चोरतात |
| अहं चोरयामि=मी चोरतो | आवां चोरयावः = आम्ही दोघे चोरतात | वयं चोरयामः = आम्ही चोरतात |

: = चिन्तन करणे, विचार करणे

| | | |
|---|---|---|
| स चिन्तयति= तो चिन्तन करतो | तौ चिन्तयतः = ते दोघे चिन्तन करतात | ते चिन्तयन्ति = ते चिन्तन करतात |
| त्वं चिन्तयसि=तू चिन्तन करतोस | युवां चिन्तयथः=तुम्ही दोघे चिन्तन करता | यूयं चिन्तयथ = तुम्ही चिन्तन करतात |
| अहं चिन्तयामि=मी चिन्तन करतो | आवां चिन्तयावः=आम्ही दोघे चिन्तन करतो | वयं चिन्तयामः = आम्ही चिन्तन करतो |

= खाणे, भक्षण करणे

| | | |
|---|---|---|
| स भक्षयति= तो खातो | तौ भक्षयतः = ते दोघे खातात | ते भक्षयन्ति = ते खातात |
| त्वं भक्षयसि=तू खातोस | युवां भक्षयथः=तुम्ही दोघे खातात | यूयं भक्षयथ = तुम्ही खातात |
| अहं भक्षयामि=मी खातो | आवां भक्षयावः=आम्ही दोघे खातो | वयं भक्षयामः = आम्ही खातो |

: प्रसिद्ध करणे

| | | |
|---|---|---|
| स प्रथयति= तो प्रसिद्ध करतो | तौ प्रथयतः = ते दोघे प्रसिद्ध करतात | ते प्रथयन्ति = ते प्रसिद्ध करतात |
| त्वं प्रथयसि=तू प्रसिद्ध करतोस | युवां प्रथयथः=तुम्ही दोघे प्रसिद्ध करतात | यूयं प्रथयथ = तुम्ही प्रसिद्ध करता |
| अहं प्रथयामि=मी प्रसिद्ध करतो | आवां प्रथयावः=आम्ही दोघे प्रसिद्ध करतो | वयं प्रथयामः = आम्ही प्रसिद्ध करतो |

| | | | | |
|---|---|---|---|---|
| त्रास देणे, पीडा देणे | प्र.पु. | अर्दयति | अर्दयतः | अर्दयन्ति |
| क्षाल्) = धुणे | प्र.पु. | क्षालयति | क्षालयतः | क्षालयन्ति |
| गोष्) = घोषणा करणे | प्र.पु. | घोषयति | घोषयतः | घोषयन्ति |
| सुशोभित करणे | प्र.पु. | भूषयति | भूषयतः | भूषयन्ति |

## गणातील काही धातु

| | | | | |
|---|---|---|---|---|
| = इच्छिणे | प्र.पु. | वाञ्छति | वाञ्छतः | वाञ्छन्ति |
| = सेवा करणे, भजन करणे | प्र.पु. | भजति | भजतः | भजन्ति |

* चुरादिगण हा पाणिनीय धातुपाठातील दशम (दहाव्या) क्रमांकाचा गण असल्यामुळे याला दशमगण असे म्हणतात.

# सहावा पाठ

## १. उदाहरण वाक्ये

१. स प्रथयति = तो प्रसिद्ध करतो. २. वयं भूषयामः = आम्ही सुशोभित करतो.
३. यूयं भूषयथ = तुम्ही सर्व सुशोभित करतात. ४. आवां प्रथयावहः = आम्ही दोघे प्रसिद्ध करतो.

## २. मराठी भाषेत भाषान्तर करा.

१. स चिन्तयति । २. त्वं चोरयसि । ३. अहं भक्षयामि ।
४. तौ प्रथयतः । ५. युवाम् अर्दयथः । ६. आवां क्षालयाव ।
७. ते भजन्ति । ८. यूयं भूषयथ। ९. वयं वाञ्छामः ।

## ३. संस्कृत भाषेत भाषान्तर करा.

क. १. तो घोषणा करतो २. तू खातोस . ३. मी प्रसिद्ध करतो
४. तो सुशोभित करतो ५. तू त्रास देतोस ६. मी जाहीर करतो
७. तो सेवा करतो ८. तू इच्छितोस ९. मी धुतो

ख. १. ते दोघे त्रास देतात. २. तुम्ही दोघे घोषणा करतात. ३. आम्ही दोघे सुशोभित करतो
४. ते दोघे धुतात. ५. तुम्ही दोघे जाहीर करतात. ६. आम्ही दोघे इच्छितो.

ग. १. ते प्रसिद्ध करतात २. तुम्ही सेवा करतात ३. आम्ही विचार करतो.
४. ते त्रास देतात ५. तुम्ही चोरतात. ६. आम्ही सेवा करतो. (भज्)

## ४.

| अशुद्ध वाक्य | शुद्ध वाक्य | नियम |
|---|---|---|
| त्वं भक्षयामि | त्वं भक्षयसि | कर्त्र्यधीनं क्रियापदम् । |
| त्वं अर्दयसि | त्वम् अर्दयसि । | मोऽनुस्वारः । |

## ५. स्वाध्याय

अ = ३. क. मधील वाक्यांना द्विवचनामध्ये व बहुवचनामध्ये परिवर्तित करा.
आ = वाञ्छ, भज्, चिन्त्, चुर् , या धातुंच्या लट् लकाराची संपूर्ण रूपे लिहा.
इ = चुर्, चिन्त्, भक्ष्, प्रथ्, अर्द्, प्रथ्, घुष्, भूष्, भज् , या धातुंच्या लट् लकाराची संपूर्ण रूपे लिहा.

## ६. जोड्या लावा

| 'अ' गट | 'ब' गट |
|---|---|
| आवाम् | वाञ्छसि |
| ते | भजामः |
| त्वम् | भूषयन्ति |
| वयम् | अर्दयावः |

## ७. रूप ओळखणे

भजति = भज् धातु, भ्वादिगण, परस्मैपद, लट् लकार, (वर्तमानकाळ) प्रथम पुरुष, एकवचन
भक्षयामः = भक्ष् धातु, चुरादिगण, परस्मैपद, लट् लकार, (वर्तमानकाळ) उत्तम पुरुष, बहुवचन
याप्रमाणे नृत्यति, चोरयन्ति ही रूपे ओळखा.

# सप्तमः पाठः

## विभक्ति कारक परिचय

**विभक्ति :-** वेगवेगळ्या प्रत्ययानुसार नाम–सर्वनाम इत्यादिंमध्ये जी विभिन्नता दिसून येते तीस (तीला) विभक्ति असे म्हणतात.

**कारक*** **:-** क्रिया निष्पन्न करणाऱ्या वस्तु, व्यक्ति, पदार्थ इत्यादींना 'कारक' असे म्हणतात.

कारक सहा प्रकारचे असून ते पुढील प्रमाणे

१. कर्ता २. कर्म ३. करण ४. संप्रदान ५. अपादान. ६ अधिकरण

**विभक्तीचे प्रकार सातआहेत व आठवे संबोधन आहे. ते पुढील प्रमाणे –**

१. प्रथमा २. द्वितीया ३. तृतीया ४. चतुर्थी ५. पंचमी ६. षष्ठी ७. सप्तमी ८ संबोधन

**विभक्ति प्रत्यय :-** विभक्तीचा निर्देश करण्यासाठी शब्दाला काही ठराविक अक्षरे जोडली जातात. त्यांना **'विभक्ति प्रत्यय'** असे म्हणतात.

मूळ मराठी विभक्ती प्रत्यय व देव या नामाची होणारी रूपे

| कारक | विभक्ती | एकवचन | | बहुवचन | |
|---|---|---|---|---|---|
| | | प्रत्यय | शब्दाची रूपे | प्रत्यय | शब्दाची रूपे |
| कर्ता | प्रथमा | – | देव | – | देव |
| कर्म | द्वितीया | स, ला, ते | देवास, देवाला, देवाते | स, ला,ना, ते | देवांस, देवांला, देवांना, देवांते |
| करण | तृतीया | ने, ए, शी | देवाने (देवे) देवाशी | नी, शी, ई, ही | देवांनी, देवांशी (देवीं), देवांही |
| संप्रदान | चतुर्थी | स, ला, ते | देवास, देवाला, देवाते | स, ला, ना, ते | देवांस, देवांला, देवांना, देवांते |
| अपादान | पंचमी | ऊन, हून, तून | देवाहून, देवातून | ऊन, हून, तून | देवांहून, देवांतून |
| – | षष्ठी | चा, ची, चे | देवाचा, देवाची, देवाचे | चा, ची, चे | देवांचा, देवांची, देवांचे |
| अधिकरण | सप्तमी | त, ई, आ | देवात, (देवी) देवा | त, ई, आ | देवांत (देवी) देवां |
| – | संबोधन | – | हे* देव ! | नो | हे* देवानो ! |

संस्कृत भाषेत एकवचन, द्विवचन व बहुवचन अशी तीन वचने आहेत

---

* क्रियाजनकत्वं कारकत्वम्

★ संबोधनामध्ये शब्दाच्या अगोदर हे, रे, अयि इत्यादि संबोधन बोधक शब्द वापरतात.

# सातवा पाठ

संस्कृत भाषेत कोणत्याही (एकट्या) वर्णाच्या विषयी माहिती सांगताना अथवा त्याच्या कडे लक्ष केन्द्रित करतांना त्याच्या पुढे (समोर) 'कार' शब्द जोडून त्यास संबोधले जाते. उदा. गीता, गंगा, गायत्री, गोविंद आणि गाय यांना 'पंचगकार' असे म्हणतात. कारण कि यांच्या सुरुवातीचे प्रत्येक व्यंजन 'ग' युक्त आहे. येथे 'ग' कडे लक्ष केन्द्रित करुन त्यांना 'गकार' असे म्हटले आहे. त्याच प्रमाणे रुच्, मुच्, शुच्, अश्च्, उदश्च्, प्राश्च् आदि हे शब्द चकार युक्त (चकारी) आहेत. या प्रमाणे प्रत्येक वर्णास अ कार, उ कार, म कार आदि बोलण्याची पद्धत आहे. त्यांच्या समोर 'अन्त' हा शब्द जोडल्यास अकार+अन्त=अकारान्त अर्थात 'अ' कार आहे ज्याच्या अन्ती (शेवटी) तो. उकार+अन्त=उकारान्त अर्थात 'उ' कार आहे ज्याच्या अन्ती (शेवटी) तो. आदि. आदि. याच प्रमाणे वरील सर्व शब्दांच्या शेवटी 'च्' असल्यामुळे ते सर्व 'चकारान्त' शब्द आहेत.

अशा पद्धतीने कोणत्याही नामाचा शेवट ज्या व्यंजन किंवा स्वराने होत असेल, त्याच्यापुढे 'कार' हा शब्द लावावा. उदा. देव्+अ=देव यात अन्तीम वर्ण 'अ' असल्यामुळे देव हा शब्द अकारान्त आहे हे सिद्ध होते. तसेच हा शब्द पुल्लिङ्ग असल्यामुळे यास अकारान्त पुल्लिङ्ग असे म्हणावे. याप्रमाणे प्रत्येक नामास ओळखावे. व ज्या लिंगात असेल त्या लिंगात संस्कृत भाषेप्रनाणे चालवावे.

आता आपण संस्कृत व्याकरणाप्रमाणे 'देव' या शब्दाची विभक्ती रूपे शिकणार आहोत. ते खालील प्रमाणे.

| विभक्ति | एकवचन | द्विवचन | बहुवचन |
|---|---|---|---|
| प्रथमा | देवः = देव | देवौ = दोन देव | देवाः = अनेक देव (सर्व देव) |
| द्वितीया | देवम् = देवास, देवाला, देवाते | देवौ = दोन देवास, दोन देवांना | देवान् = देवास, देवांला, देवांना, देवांते |
| तृतीया | देवेन = देवाने (देवे) देवाशी | देवाभ्याम् = दोन देवांनी, दोन देवांशी | देवैः= देवांनी, देवांशी (देवीं), देवांही |
| चतुर्थी | देवाय = देवास, देवाला, देवाते | देवाभ्याम् = दोन देवांस, दोन देवांना | देवेभ्यः = देवांहून |
| पंचमी | देवात् = देवाहून, देवातून | देवाभ्याम् =दोन देवांहून, दोन देवांतून | देवेभ्यः = देवांहून, देवांतून |
| षष्ठी | देवस्य = देवाचा, देवाची, देवाचे | देवयोः = दोन देवाचा, ची, चे | देवानाम् = देवांचा, देवांची, देवांचे |
| सप्तमी | देवे = देवात, (देवी) देवा | देवयोः = देन देवात | देवेषु = देवांत (देवीं) देवां |
| संबोधन | हे देव! = हे देव! | हे देवौ! = हे दोन देवांनो ! | हे देवाः ! = हे देवांनो ! |

सर्व अकारान्त पुल्लिंगी शब्द 'देव' शब्दाप्रमाणे चालतील. उदा. बालकः बालकौ बालकाः *

**काही विभक्ति प्रतिरूपक शब्दयोगी अव्यये -**

**द्वितीया** – लागी, प्रति – उदा. देवम् – देवालागी, देवाप्रति, देवौ – दोन देवालांगी, दोन देवांप्रति देवान् – (अनेक) देवांलागी, देवांप्रति

**तृतीया** – कडून, द्वारे (मुळे) उदा. देवेन – देवाकडून, देवाद्वारे (मुळे) देवाभ्याम् – दोन देवांकडून/ द्वारे देवैः – (अनेक) देवांकडून/द्वारे

**चतुर्थी** – करिता, साठी, स्तव, कारणे, प्रीत्यर्थ उदा. देवाय – देवाकरिता, देवासाठी, देवास्तव, देवाकारणे, देवाप्रीत्यर्थ ✿

**पंचमी** – पासून, पेक्षा, शिवाय, खेरीज, वाचून उदा. देवात् – देवापासून, देवापेक्षा, देवाशिवाय, देवाखेरीज, देवावाचून

**षष्ठी** – संबंधी उदा. देवस्य – देवासंबंधी

**सप्तमी** – आत, मध्ये, ठायी, विषयी, वर उदा. देवे – देवात, देवामध्ये, देवाठायी, देवाविषयी, देवावर

---

* काही शब्दांच्या तृतीया व षष्ठी विभक्ती रूपांमध्ये असणाऱ्या न् चा ण् होईल हा विषय प्रसंगप्राप्त पुढे सांगण्यात येईल.

✿ द्विवचनामध्ये व बहुवचनामध्ये देवाभ्याम् = दोन देवांकरिता वगैरे अर्थ करून घ्यावेत.

# अष्टमः पाठः

**नामानि** = **देवः** = देव, देवता, **ईश्वरः** = शासन करणारा, देव **बालकः**= मुलगा, **नृपः** = राजा
**रामः**=राम **बुधः**= सूज्ञ मनुष्य **कृषीवलः**= शेतकरी **छात्रः** = विद्यार्थी **कूर्मः** = कासव,
**मनुष्यः** = मनुष्य, माणुस, **भृत्यः**= सेवक, नोकर, **जीवः**= जीव, प्राणी, २. प्राणी

**क्रियापदानि** = <u>**भ्वादिगण**</u> = त्यज् = त्याग करणे, टाकणे **वप्** = पेरणे **सृ (सर्)** = सरकणे
अव+गम् (अवगच्छ्) = जाणणे **वह्** = वाहणे, वाहून नेणे

**अव्ययानि** = **अत्र** = येथे, **तत्र** = तेथे, **यत्र** = जेथे, **कुत्र** = कोठे, **अन्यत्र** = दुसऱ्या ठिकाणी, दुसरीकडे

☞ **संकेत** - देवः ते जीवः देववत्, त्यज् ते वह् पठतिवत्

**शब्दसंग्रहासाठी खालील चिन्हसंकेत लक्षात ठेवणे आवश्यक आहे.**

१. 'वत्' अर्थात प्रमाणे, तुल्य; देववत् अर्थात देव प्रमाणे (देव शब्दा प्रमाणे)

२. **'देव ते जीव देववत्** अर्थात प्रस्तुत (ह्या) पाठात दिलेल्या शब्द संग्रहातील. देव शब्दापासून जीव शब्दापर्यन्त असणारे सर्व शब्द देव शब्दाप्रमाणे चालतील

३. '**त्यज् ते वह् पठतिवत्** अर्थात प्रस्तुत पाठात दिलेल्या सब्दसंग्रहातील **त्यज्** धातुपासून **वह्** धातुपर्यंत असणारे सर्व धातु **पठ्** धातुप्रमाणे चालतील.

४. **देव** शब्दाचे प्रथमा व द्वितीया विभक्तीची रूपे पाठ करा व देव शब्दाप्रमाणे **ईश्वर**, **बालक** इत्यादि अकारान्त पुल्लिंग शब्द चालवा. पहा पाठ संख्या सात.

☞ **व्याकरण** = (कर्ता कारक व प्रथमा विभक्ती)

**स्वतंत्रः कर्ता** = (स्वतंत्र रूपाने) क्रिया करणाऱ्या कारकास कर्ता* असे म्हणतात.

**कर्तरि प्रथमा** = कर्त्याची प्रथमा विभक्ती होते

उदा. : ''मुलगा शिकतो'' या वाक्यात शिकण्याची क्रिया करणारा मुलगा आहे म्हणून तो कर्ता आहे. त्यामुळे त्याची प्रथमा विभक्ती होईल. मुलगा एकटा असल्यामुळे प्रथमा विभक्तीचे एकवचन होईल. 'मुलगा' या शब्दाला संस्कृतमध्ये बालक हा शब्द आहे. '**बालक**' शब्दाचे प्रथमा विभक्ती एकवचन '**बालकः**' असे होईल. आता. शिकतो हे वर्तमानकाळी क्रियापद आहे. शिकणे या अर्थी संस्कृतमध्ये '**पठ्**' हा धातु (क्रियावाची शब्द) आहे. त्याची वर्तमानकाळामध्ये **पठति पठतः पठन्ति** इत्यादी नऊ रूपे होतात. त्यापैकी '**बालकः**' या कर्त्याबरोबर कोणते रूप वापरावे. असा प्रश्न निर्माण होतो. याचे उत्तर पुढील प्रमाणे.

**शेषे प्रथम : त्वम्, युवाम्, यूयम्** तसेच **अहम्**, आवाम्, वयम् यांच्या व्यतिरिक्त कोणतेही नाम किंवा सर्वनाम कर्ता असल्यास त्याबरोबर प्रथम पुरुषाचा प्रयोग होतो.

वरील विवेचनावरुन **बालकः** या एकवचनी कर्त्याबरोबर **पठ्** धातुचे '**पठति**' हे प्रथमपुरुष, एकवचनाचे रूप प्रयोग केले जाईल.

**बालकः पठति** = मुलगा शिकतो (कर्ता एकवचनी म्हणून क्रियापद एकवचनी)
**बालकौ पठतः** = दोन मुले शिकतात. (कर्ता द्विवचनी म्हणून क्रियापद सुद्धा द्विवचनी)
**बालकाः पठन्ति** = मुले शिकतात (कर्ता बहुवचनी म्हणून क्रियापद सुद्धा बहुवचनी)

---

*होणे, असणे अशा प्रकारच्या सत्तार्थक धातुंचा प्रयोग झाल्यास जो होतो किंवा असतो तो त्या वाक्यात कर्ता असतो.
उदा. - **सः भवति ।** = तो होतो या वाक्यात सः (तो) कर्ता आहे.

# आठवा पाठ

१. **उदाहरण वाक्ये**

१. बालकः गच्छति = मुलगा जातो २. बालकौ गच्छतः = दोन मुले जातात ३. बालकाः गच्छन्ति = मुले जातात, ४. स बालकः यत्र गच्छति तत्र हसति = तो मुलगा जेथे जातो (तेथे हसतो), ५. स कुत्र गच्छति? = तो कोठे जातो?

२. **मराठी भाषेत भाषांतर करा -**

१. देवः रक्षति २. नृपः गच्छति । ३. बुधःचिन्तयति ४. भृत्यः वहति । ५. जीवः मुह्यति । ६. कृपीवलाः वपन्ति ७. स बालकः पठति । ८. तौ बालकौ पठतः । ९. ते बालकाः यत्र गच्छन्ति तत्र हसन्ति । १०.रामः त्यजति । ११. कूर्मः सरति । १२. स कुत्र पठति? १३. स बालकः अस्ति । १४. बालकौ कुत्र पठतः । १५. स छात्रः अवगच्छति । १६. वयम् अवगच्छामः १७. यूयम् अवगच्छथ । १८. ते अवगच्छन्ति ।

३. **संस्कृत भाषेत भाषांतर करा -**

क) १. राम जातो २. शेतकरी पेरतो ३. तो मुलगा जातो
४. सूज्ञ मनुष्य जाणतो ५. मुलगा नमस्कार करतो. ६. तो मनुष्य शोक करत आहे.
७. नोकर जात आहे. ८. तो मुलगा जातो. ९. तो राजा जिंकतो.

ख) १. दोन माणसे जातात. २. दोन मुले नमस्कार करतात. ३. ती दोन मुले शिकत आहेत.
४. सेवक सेवा करतात ५. जीव मोहित होतात. ६. ती मुले फिरतात
७. दोन सुज्ञ मनुष्य विचार करत आहेत?

ग) १. तो कोठे शिकतो? २. तो येथे शिकतो. ३. तो मनुष्य कोठे जातो?
४. तो मनुष्य दुसरीकडे जातो ५. तो राजा जेथे जातो तेथे जिंकतो ६. ते जेथे जातात तेथे विचार करतात
७. ते दोघे कोठे जातात?

घ) १. तो त्याग करतो. २. तो शेतकरी पेरतो. ३. तो सरकतो.
४. तो वाहून नेतो. ५. तो तेथे जातो. ६. तू जाणतोस.

४. **अशुद्ध वाक्य शुद्ध वाक्य नियम**

| अशुद्ध वाक्य | शुद्ध वाक्य | नियम |
|---|---|---|
| रामं गच्छति । | रामः गच्छति । | कर्तरि प्रथमा । |
| ते यत्र गच्छन्ति तत्र चिन्तयति । | ते यत्र गच्छन्ति तत्र चिन्तयन्ति । | कर्त्र धीनं क्रियापदम् |

५. **स्वाध्याय -**

अ = ३. क मधील वाक्यांना द्विवचनामध्ये व बहुवचनामध्ये परिवर्तित करा.
आ = ३. घ. मधील वाक्यांना सुद्धा द्विवचनामध्ये व बहुवचनामध्ये परिवर्तित करा.
इ = त्यज्, वप्, सृ वह् या धातुंच्या लट् लकाराची संपूर्ण रूपे लिहा.
ई = देव, ईश्वर, राम, भृत्य या शब्दाची प्रथमा व द्वितीया विभक्ती रूपे लिहा.

६. **रूपे ओळखा -**

उदा. देवः = देव अकारान्त पुल्लिंग प्रथमा विभक्ती एकवचन याप्रमाणे बालकः, बुधाः ही रूपे ओळखा.

७. **जोड्या लावा -**

| 'अ' गट | 'ब' गट |
|---|---|
| देवान् | प्रथमा विभक्ती बहुवचन |
| ईश्वरम् | द्वितीया विभक्ती बहुवचन |
| नृपः | प्रथमा विभक्ती द्विवचन |
| नृपौ | द्वितीया विभक्ती एकवचन |
| कूर्माः | प्रथमा विभक्ती एकवचन |

# नवमः पाठः

**नामानि** = वनम्= वन, अरण्य, गृहम् = घर, पुस्तकम् = पुस्तक, पोथी
पत्रम् = पान, चिठ्ठी, पुष्पम् = फूल फलम् = फळ जलम् = पाणी, सत्यम् = सत्य, खरे
राज्यम् = राज्य, भोजनम् = जेवण वेदः = वेद ग्रामः = गाव शिष्यः = शिष्य, विद्यार्थी

**अव्ययानि** = अद्य = आज इदानीम् = आता किम् = काय (का) यदा=जेव्हा, ज्यावेळी तदा=तेव्हा, त्यावेळी
कदा = केव्हा सदा = नेहमी, वारंवार सर्वदा = नेहमी, वारंवार एकदा = एकदा

**संकेत** = वनम् ते राज्यम्, वनवत् ; वेदः ते शिष्यः देववत्

**व्याकरण** (कर्म कारक, द्वितीया विभक्ती)

१. 'वन' अकारान्त नपुंसकलिंग

| | | | |
|---|---|---|---|
| प्रथमा | वनम् - वन | वने - दोन वने | वनानि (अनेक) वने |
| द्वितीया | वनम् - वनास, वनाला | वने - दोन वनास,वनांना | वनानि (अनेक) वनांस, वनांना |

२. गृह, पुस्तक इत्यादि अकारान्त नपुंसकलिंगी शब्द 'वन' शब्दाप्रमाणे चालतील परंतु प्रस्तुत पाठात दिलेल्या गृह, पत्र, पुष्प, या शब्दांच्या विभक्ती रूपांमध्ये असणाऱ्या 'न्' चा 'ण्' होईल. *

उदा. गृहाणि पत्राणि पुष्पाणि

३. संस्कृतमध्ये असलेले तीन पुरुष पुढील प्रमाणे

१. प्रथम पुरुष = सः=तो, तौ = ते दोघे, ते = ते सर्व

तसेच एखादा वस्तु, व्यक्ती, वगैरे कर्ता असल्यास प्रथम पुरुषाचा प्रयोग करतात.

२. मध्यम पुरुष = त्वम् = तूं, युवाम् = तुम्ही दोघे, यूयम = तुम्ही सर्व

ही सर्वनामे कर्ता असल्यास मध्यम पुरुषाचा प्रयोग करतात.

३. उत्तम पुरुष = अहम् = मी, आवाम् = आम्ही दोघे वयम् = आम्ही सर्व

ही सर्वनामे कर्ता असल्यास उत्तम पुरुषाचा प्रयोग करतात.

**कर्तुरीप्सिततमं कर्म** = वाक्यात कर्त्याच्या सर्वात अधिक इच्छित असणाऱ्या (वस्तु व्यक्ती इत्यादि) कारकास कर्म असे म्हणतात.

**उदा. - 'राम वेद शिकतो'** या वाक्यात राम या कर्त्याचे (शिकणे क्रियेसाठी) **'वेद'** सर्वात अधिक इच्छित आहे. म्हणून प्रस्तुत वाक्यात **'वेद'** कर्मकारक आहे.

**कर्मणि द्वितीया** = कर्म कारकाची द्वितीया विभक्ती होते.

उदा.- रामः वेदम् पठति = राम वेद शिकतो [कर्म (वेद) एक म्हणून कर्माचे एकवचन]
रामः वेदौ पठति = राम दोन वेद शिकतो [कर्म (वेद) दोन म्हणून कर्माचे द्विवचन]
राम वेदान् पठति = राम (अनेक) वेद शिकतो [कर्म (वेद) अनेक म्हणून कर्माचे बहुवचन]

* या विषयी अधिक माहितीसाठी दाराव्या पाठातील 'रषाभ्यां नो णः समानपदे'' हा नियम पहा.

# नववा पाठ

१. **उदाहरण वाक्ये**

१. रामः पुस्तकं पठति = राम पुस्तक वाचतो २. स ग्रामं गच्छति = तो गावाला जातो
३. तत्र किं भवति?= तेथे काय होत आहे? ४. सः ईश्वरं नमति = तो देवाला नमस्कार करतो.

२. **मराठी भाषेत भाषांतर करा.**

१. स पुस्तकं पठति । २. त्वं कुत्र गच्छसि? ३. अहं ग्रामं गच्छामि । ४. बालकः फलं खादति । ५. तौ राज्यं रक्षतः । ६. यूयं सत्यं वदथ । ७. वनं नश्यति । ८. स शिष्यः सत्यं वदति । ९. त्वं जलं वाञ्छसि । १०. भृत्यः पत्राणि तत्र वहति । ११. अहं जलम् इच्छामि । १२. गृहं नश्यति । १३. त्वम् इदानीं किं पठसि? १४. स कदा पठति? १५. यदा त्वं पठसि तदा स तुष्यति । १६. स सदा सत्यं वदति । १७. आवां सत्यं वदावः । १८. यूयम् अद्य किं पठथ ? १९. स यदा पठति तदा त्वं वदसि ।

३. **संस्कृत भाषेत भाषांतर करा -**

क) १. तो खरे बोलते २. तो मुलगा वेद शिकतो. ३. राजा राज्याचे रक्षण करतो,
४. तो फुलाची इच्छा करतो. ५. तू काय खातोस? ६. मी देवाला नमस्कार करतो.
७. तू तेथे काय शिकत आहेस? ८. तो फळे खातो, ९. मी नेहमी खरे बोलतो,

ख) १. ते दोघे खरे बोलतात. २. तुम्ही दोघे गावाला जातात. ३. आम्ही दोघे देवाला नमस्कार करतो.

ग) १. ते विद्यार्थी जेवणाची इच्छा करतात. २. तुम्ही पुस्तके वाचत आहात.
३. आम्ही खरे बोलतो. ४. राजा राज्य जिंकतो.

घ) १. तो आज काय शिकत आहे? २. मी आता जातो. ३. येथे काय होत आहे.
४. राम जेव्हा तेथे जातो तेव्हा तो पुस्तक वाचतो. ५. तू केव्हा पुस्तक वाचतोस?
६. आम्ही नेहमी खरे बोलतो. ७. आता येथे काय होत आहे?

४.

| अशुद्ध वाक्य | शुद्ध वाक्य | नियम |
|---|---|---|
| नृप राज्यस्य रक्षति । | नृपः राज्यं रक्षति । | कर्मणि द्वितीया । |
| वयं सदा सत्यं वदामि | वयं सदा सत्यं वदामः । | कर्त्र्यधीनं क्रियापदम् । |

५. **स्वाध्याय**

अ = ३. क मधील वाक्यांना द्विवचनामध्ये व बहुवचनामध्ये परिवर्तित करा.
आ = गृह, पुष्प, भोजन या शब्दांच्या प्रथमा व द्वितीया विभक्तीची रूपे लिहा.
इ = संस्कृतमध्ये पुरुष किती व कोणते?
ई = व्याकरणानुसार कर्म म्हणजे काय, सूत्रासह व्याख्या लिहा.

६. **रूपे ओळखा -**

नृपः, फलानि, ग्रामम्, शिष्याः, वेदान् , वपति

| 'अ' गट | 'ब' गट |
|---|---|
| पुष्पाणि | द्वितीया विभक्ती बहुवचन |
| तोयम् | प्रथमा विभक्ती बहुवचन |
| भृत्यान् | प्रथम पुरुष बहुवचन |
| सरन्ति | प्रथमा विभक्ती एकवचन |

# दशमः पाठः

**नामानि** = माला = माळा, हार लता = वेल बालिका = मुलगी रमा = रमा, लक्ष्मी कथा = कथा
क्रीडा = खेळ विद्या = विद्या, ज्ञान पाठशाला = शाळा

**क्रियापदानि** = भ्वादिगण = आ+गम् (आगच्छ्) = येणे दृश् (पश्य्) = पाहणे पा (पिब्)= पिणे
घ्रा (जिघ्र्) = वास घेणे स्था (तिष्ठ्) = थांबणे, उभे राहणे सद् (सीद्) = बसणे

**अव्ययानि** = इत्थम् = याप्रमाणे यथा = ज्याप्रमाणे, जसे तथा = त्याप्रमाणे, तसे कथम् = कसे, का
अपि = सुद्धा न = नाही आम् = होय

**संकेत** = माला ते पाठशाला मालावत्, आगम् ते सद् पठतिवत्

१. 'माला' आकारान्त स्त्रीलिंग

माला = माळा माले = दोन माळा मालाः = अनेक माळा
मालाम् = माळेस, माळेला माले = दोन माळांना मालाः = माळांस, माळांना

लता बालिका इत्यादि आकारान्त स्त्रीलिंगी शब्द माला शब्दाप्रमाणे चालवा

२. लट् लकार प्रथम पुरुष एकवचनामध्ये आ+गम् धातुचे आगच्छति, दृश् धातुचे पश्यति, पा धातुचे पिबति, घ्रा धातुचे जिघ्रति, स्था धातुचे तिष्ठति व सद् धातुचे सीदति असे रूप होईल. याप्रमाणे यांची राहिलेली रूपे चालवा.

३. वर्णमाला -

| स्वर | | | व्यञ्जन | अन्तस्थोष्मायोगवाह | | |
|---|---|---|---|---|---|---|
| ऱ्हस्व | दीर्घ | संयुक्त | 'क' वर्ग<br>क ख ग घ ङ | अन्तस्थ | ऊष्म | अयोगवाह |
| अ | आ | ए | 'च' वर्ग<br>च छ ज झ ञ | य | श | ं अनुस्वार |
| इ | ई | ऐ | 'ट' वर्ग<br>ट ठ ड ढ ण | र | ष | ँ अनुनासिक |
| उ | ऊ | ओ | 'त' वर्ग<br>त थ द ध न | ल | स | ः विसर्ग |
| ऋ | ॠ | औ | 'प' वर्ग<br>प फ ब भ म | व | ह | ळ |
| ऌ | | | | | | |

प्रत्येक वर्गाचे प्रथम (पहिले) व्यंजन = क च ट त प
प्रत्येक वर्गाचे द्वितीय (दुसरे) व्यंजन = ख छ ठ थ फ
प्रत्येक वर्गाचे तृतीय (तिसरे) व्यंजन = ग ज ड द ब
प्रत्येक वर्गाचे चतुर्थ (चौथे) व्यंजन = घ झ ढ ध भ
प्रत्येक वर्गाचे पंचम (पाचवे, अनुनासिक) व्यंजन = ङ ञ ण न म

**कठोर व्यंजन** = प्रत्येक वर्गाचे प्रथम व द्वितीय व्यंजन तसेच श ष स.
**मृदु व्यंजन** = प्रत्येक वर्गाचे तृतीय, चतुर्थ, पंचम व्यंजन तसेच य र ल व ह
**अनुनासिक व्यंजन** = प्रत्येक वर्गाचे पाचवे व्यंजन तसेच ङ ञ ण न म

**गत्यर्थकर्मणि द्वितीयाचतुर्थ्यौ चेष्टायामध्वनि** = गमनार्थक गम्, चर् इत्यादि धातुंचा प्रयोग झाल्यास ज्या स्थळाकडे गती असते त्याची द्वितीया विभक्ती होते. अशा प्रसंगी द्वितीया विभक्तीच्या ऐवजी चतुर्थी विभक्तीचा सुद्धा प्रयोग करतात.

उदा. - स विद्यालयं गच्छति = तो शाळेत जातो = स विद्यालयाय गच्छति

# दहावा पाठ

१. **उदाहरण वाक्ये**

१. स गृहं गच्छति = तो घरी जातो २. सः आगच्छति = तो येतो ३. स पुष्पं जिघ्रति = तो फुलाचा वास घेतो ४. बालिका किं पठति = मुलगी काय शिकते ५. त्वम् अपि अत्र तिष्ठसि किम् = तू सुद्धा येथे थांबतोस का? ६. आम् = होय ७. अहम् अपि अत्र तिष्ठामि = मी सुद्धा येथे थांबतो.

२. **मराठी भाषेत भाषांतर करा.**

१. स पाठशालां गच्छति । २. त्वं क्रीडां पश्यसि । ३. अहं विद्या पठामि । ४. आवां पुष्पं जिघ्रावः । ५. वयम् अत्र सीदामः । ६. स किं पिबति? स तोयं पिबति । ७. कथा कुत्र भवति? ८. रमा गृहं भूषयति । ९. आवाम् अत्र तिष्ठावः । १०. अहं लतां पश्यामि ११. स मालां वाञ्छति । १२. सः इत्थम् पठति । १३. त्वम् अपि अत्र पठसि । १४. अहं तत्र न पठामि । १५. स कथं पठति? १६. स वनं गच्छति ।

३. **संस्कृत भाषेत भाषांतर करा -**

क) १. तो वनात जातो. २. तू घरी जातोस. ३. तो फुलाचा वास घेतो. ४. तो तेथे बसतो. ५. मी पाणी पितो. ६. तू विद्या शिकतोस. ७. तो खेळ पाहतो. ८. तू शाळेत जात नाहीस. ९. मी शाळेत जातो.

ख) १. ते दोघे घरी जातात. २. तुम्ही दोघे पाणी पितात. ३. आम्ही दोघे येतो. ४. ते नेहमी फुलांचा वास घेतात. ५. तुम्ही शाळेत जातात. ६. आम्ही येथे थांबतो. ७. आम्ही वनात जातो.

ग) १. तो या प्रमाणे बोलतो. २. तो जसा विचार करतो तसे बोलतो. ३. तो कसे शिकतो? ४. मी सुद्धा पुस्तक वाचतो. ५. तो शाळेत सुद्धा जातो. ६. तू तेथे जात नाहीस. ७. तू तेथे का जात नाहीस?

घ) १. तो येथे येतो. २. तू काय पाहतोस? ३. तू पाणी पितोस. ४. मी फुलाचा वास घेतो.

४.

| अशुद्ध वाक्य | शुद्ध वाक्य | नियम |
|---|---|---|
| स वने गच्छति । | स वनं गच्छति । | गत्यर्थ कर्मणि ... । |
| स तत्र स्थाति । | स तत्र तिष्ठति । | धातुरूप । |
| स पुष्पस्य जिघ्रति । | स पुष्पं जिघ्रति । | कर्मणि द्वितीया । |
| वयं सदा सत्यं वदामि । | वयं सदा सत्यं वदामः । | कर्त्र्यधीनं क्रियापदम् । |

५. **स्वाध्याय**

अ = ३. क मधील वाक्यांना द्विवचनामध्ये व बहुवचनामध्ये परिवर्तित करा.

आ = ३ ख. मधील वाक्यांना एकवचनामध्ये परिवर्तित करा.

इ = ३ घ. मधील वाक्यांना बहुवचनामध्ये परिवर्तित करा

ई = आगम्, दृश्, पा, घ्रा, स्था, सद् या धातुंच्या लट् लकाराची संपूर्ण रूपे लिहा

उ = माला, बालिका, रमा, विद्या या शब्दांची प्रथमा व द्वितीया विभक्तीचे संपूर्ण रूपे लिहा.

६. **रूपे ओळखा**

लताम्,* बालिका, कथाः, जिघ्रथः, सीदतः

७. **रिकाम्या जागा भरा (लट् लकार)**

१. स कदा... (आ+गम्) २. स विद्यालयम् ... (दृश्)

★ लताम् = लता – आकारान्त स्त्रीलिंग, द्वितीया विभक्ती, एकवचन

# एकादशः पाठः

**नामानि** = भारः = ओझे, वजन घटः = घडा, घागर खलः = दुष्ट २. खळे

**विशेषणानि (संख्यावाचक शब्द)** = एकः = एक द्वौ = दोन त्रयः = तीन चत्वारः = चार
पञ्च = पाच षट् = सहा सप्त = सात अष्ट = आठ नव = नऊ दश= दहा

**क्रियापदानि** = अस्* = असणे कृ⅄ = करणे भ्वादिगण = अट् = भटकणे, फिरणे

**अव्यये** = इतः = येथून, इकडून ततः= तेथून, त्यामुळे, यतः = जेथून, कारण की
कुतः = कोठून च = आणि एव = मात्र, च, केवळ

☞ **संकेत** = भारः ते खलः देववत् , अट् पटतिवत्

☞ **व्याकरण** (अस् कृ-लट्)

**अस् लट्**

| | | |
|---|---|---|
| अस्ति = आहे | स्तः = दोघे आहेत | सन्ति = आहेत |
| असि = तू★ आहेस | स्थः = तुम्ही दोघे आहात | स्थ = तुम्ही आहात |
| अस्मि = मी आहे | स्वः = आम्ही दोघे आहोत | स्मः = आम्ही आहोत |

**कृ लट्**

| | | |
|---|---|---|
| करोति = करतो | कुरुतः = दोघे करतात | कुर्वन्ति = करतात |
| करोषि = तू करतोस | कुरुथः = तुम्ही दोघे करता | कुरुथ = तुम्ही करतात |
| करोमि = मी करतो | कुर्वः = आम्ही दोघे करतो | कुर्मः = आम्ही करतो |

**एकं त्यक्त्वा 'च' योजयेत्** = संस्कृतमधील 'च' (आणि 'व' असा अर्थ असणाऱ्या) ह्या अव्ययाचा प्रयोग (साधारणतः) एका शब्दानंतर करतात.

उदा. फळ आणि फूल चे भाषान्तर '**फलं पुष्पं च**' असे करावे.
**फलं च पुष्पम्** अशी वाक्यरचना अशुध्द मानली जाते.
राम आणि कृष्ण = **रामः कृष्णः च ।**
मुलगा आणि मुलगी = **बालकः बालिका च ।**

दोन्ही शब्दानंतर देखील '**च**' चा प्रयोग करतात.

उदा. :- **फलं च पुष्पं च । रामः च कृष्णः च । बालकः च बालिकाचः ।**

**अपदं न प्रयुञ्जीत्** = प्रत्यय न लावता कोणत्याही शब्दाचा किंवा धातुचा (क्रियावाची शब्दाचा) संस्कृत भाषेत प्रयोग करु नये.

उदा. – **रामः पठति । नृपः गच्छति ।** अशा प्रकारे प्रत्यय लावून शब्दांचा किंवा धातुंचा प्रयोग करावा. **राम पठ्, नृप, गम्** – अशा प्रकारे प्रत्यय रहित शब्दांचा प्रयोग करु नये. सर्वसाधारणपणे अव्ययांना प्रत्यय लागत नाहीत.

---

* हा धातु अदादि गणातील आहे. अदादिगण द्वितीय क्रमांकाचा गण असल्यामुळे याला द्वितीय गण असे सुद्धा म्हणतात.

⅄ हा धातु तनादिगणातील आहे. तनादिगण अष्टम (आठव्या) क्रमांकाचा गण असल्यामुळे याला अष्टमगण असे सुद्धा म्हणतात.

★ **त्वम् युवाम् , यूयम्** या मध्यम पुरुषवाचक सर्वनामांचा प्रयोग झाला नसेल तरीही क्रियापदाच्या रूपावरुन मध्यमपुरुषवाचक सर्वनाम भाषांतर करताना घेता येते. उदा. – **पठसि** = तू शिकतोस **पठथः** = तुम्ही दोघे शिकतात, **असि** = तू आहेस . उत्तमपुरुषाचेही असेच आहे. उदा.– **पठामि** = मी शिकतो **पठामः** = आम्ही शिकतो **अस्मि** = मी आहे प्रथमपुरुषाचे मात्र असे नाही. उदा.– **पठति** = शिकतो **पठति** = चा 'तो शिकतो' असा अर्थ करता येत नाही. **स पठति ।** असे असेल तरच 'तो शिकतो' असा अर्थ होईल. **रामः पठति** = राम शिकतो **बालिका पठति** = मुलगी शिकते

# अकरावा पाठ

१. **उदाहरण वाक्ये**

१. अत्र एकः मनुष्यः अस्ति = येथे एक मनुष्य आहे २. तत्र द्वौ बालकौ स्तः = तेथे दोन मुले आहेत ३. स किं करोति = तो काय करतो ? ४. सः अपि अत्र एव अस्ति = तो सुद्धा येथेच आहे ५. ते भोजनं कुर्वन्ति = ते जेवण करतात ६. अत्र खलाः न सन्ति = येथे दुष्ट नाहीत.

२. **मराठी भाषेत भाषांतर करा.**

१. अत्र एकः बालकः अस्ति । ३. तत्र द्वौ मनुष्यौ स्तः । ३. तत्र त्रयः बालकाः सन्ति । ४. चत्वारः* ग्रामा नश्यन्ति । ५. अत्र पञ्च पुष्पाणि सन्ति । ६. षट् पुस्तकानि कुत्र सन्ति? ७. सप्त बालिकाः तत्र पठन्ति ८. अत्र अष्ट गृहाणि सन्ति । ९. तत्र नव विद्यालयाः सन्ति । १०. दश मनुष्याः ततः आगच्छन्ति । ११. स बालकः किं करोति? १२. स बालकः भोजनं करोति । १३. सः अपि अत्र एव पठति । १४. भृत्यः भारं वहति । १५. स घटं करोति । १६. अहं खलं न पश्यमि ।

३. **संस्कृत भाषेत भाषांतर करा -**

क) १. तो आहे २. तो कोठे आहे? ३. ते दोघे तेथे आहेत ४. ते कोठे आहेत? ५. ते येथे आहेत ६. तू कोठे आहेस?, ७. मी येथे आहे. ८. मी विद्यार्थी आहे. ९. आम्ही विद्यार्थी आहोत.

ख) १. तो मुलगा काय करतो? २. तो जेवण करत आहे. ३. तू काय करतोस ४. मी आता पुस्तक वाचत आहे. ५. मी जेवण करतो. ६. एक मुलगा जेवण करतो.

ग) १. देव एकच आहे. २. दोन मुले काय करत आहेत? ४. तीन माणसे जेवण करतात. ४. चार मुले येत आहेत. ५. पाच फुले आणि फळे येथे आहेत. ६. सहा मुली शिकत आहेत. ७. सात विद्यार्थी घरी जात आहेत. ८. आठ माणसे येथे आहेत. ९. नऊ शेतकरी पेरतात. १०. दहा मुले खेळत आहेत.

घ) १. तो कोठून येतो? २. तो तेथून येतो. ३. तो जेथून येतो, तेथे जात नाही. ४. तू येथून तेथे जातोस. ५. पाने आणि फूले येथे आहेत. ६. मी सुद्धा येथेच आहे. ७. दुष्ट नेहमी भटकतो

४.

| अशुद्ध वाक्य | शुद्ध वाक्य | नियम |
|---|---|---|
| पत्राणि च पुष्पाणि । | पत्राणि पुष्पाणि च । | एकंत्यक्त्वा च योजयेत् |
| स सन्ति | सः अस्ति । | कर्तधीनं क्रियापदम् । |

५. **स्वाध्याय**

अ = १ पासून १० पर्यंतच्या संख्यांचे वाक्ये तयार करा.
आ = ३ ख. मधील वाक्यांना द्विवचनामध्ये व बहुवचनामध्ये परिवर्तित करा.
इ = अस् व कृ धातुच्या लट् लकाराची संपूर्ण रूपे लिहा

६. **रूपे ओळखा**

१. भाराः, अस्ति, कुर्वन्ति, स्वः कुर्मः

---

* एक, दोन, तीन, चार या संख्यावाचक विशेषणांसाठी संस्कृतमधील संख्यावाचक विशेषणे तिन्ही लिंगात वेगवेगळी आहेत.
उदा. एकः (पु.), एका (स्त्री.), एकम् (नपुं.); द्वौ (पु.), द्वे (स्त्री.), द्वे (नपुं .); त्रयः (पु.) तिस्रः (स्त्री.), त्रीणि (नपुं.); चत्वारः (पु.), चतस्रः (स्त्री), चत्वारि (नपुं.)।

पाच ते दहा पर्यंत असणारी संस्कृतमधील संख्यावाचक विशेषणे तिन्ही लिंगात सारखीच (एकच) असतात.
उदा. – एकः बालकः , एका बालिका , एकं पुष्पम् ।
पञ्च बालकाः, पञ्च पालिकाः, पञ्च पुष्पाणि ।

# द्वादशः पाठः

**नामानि** = चन्द्रः = चंद्र जनकः = वडिल पुत्रः = पुत्र, मुलगा उपाध्यायः = शिक्षक, गुरु
नरः = मनुष्य, माणुस प्राज्ञः = शहाणा मनुष्य सज्जनः = सज्जन मनुष्य
दुर्जनः = दुर्जन, दुष्ट मनुष्य विद्यालयः = शाळा प्रश्नः = प्रश्न सूर्यः = सूर्य

**सर्वनामनी** = भवान् = आपण, महाराज (पुल्लिंग) भवती = आपण, बाई साहेब (स्त्रीलिंग)

**क्रियापदानि** = भ्वादिगण = क्रीड् = खेळणे पत् = पडणे स्मृ (स्मर्) = स्मरण करणे, आठवणे
शंस् = स्तुति करणे, सांगणे नी (नय्) = नेणे निन्द् = निंदा करणे
खन् = खणणे, खोदणे हृ (हर्) = हिरावून घेणे, हरण करणे

☞ **संकेत** = चन्द्रः ते सूर्यः वेदवत् ; क्रीड ते हृ पठतिवत्

☞ **व्याकरण** (देव शब्द, भवत् सर्वनाम प्रथमा)

१. देव शब्दाची संपूर्ण विभक्तीरूपे पाठ करा. जनक, पुत्र इत्यादी शब्द देव शब्दाप्रमाणे चालवा.

२. लट् लकार प्रथमपुरुष एकवचनामध्ये क्रीड् धातुचे क्रीडति, पत् धातुचे पतति, स्मृ धातुचे स्मरति, शंस् धातुचे शंसति, नी धातुचे नयति, खन् धातुचे खनति हृ धातुचे हरति या धातुंची लट् लकाराची इतर रूपे बनवा.

३. भवत् (आपण) (हे सर्वनामा कर्ता असल्यास) या सर्वनामाबरोबर प्रथम पुरुषाचा प्रयोग करतात.
हे वरील विधान **''शेषे प्रथमः''** या नियमाने सिध्द आहे.
भवत् या सर्वनामाची पुल्लिंग प्रथमा विभक्ती, एकवचन, द्विवचन, बहुवचनात अनुक्रमे
**भवान्** = (आपण), **भवन्तौ** = (आपण दोघे) **भवन्तः** (आपण सर्व) अशी रूपे होतात.
भवत् या सर्वनामाची स्त्रीलिंग प्रथमा विभक्ती, एकवचन, द्विवचन, बहुवचनात अनुक्रमे **भवती** (आपण स्त्री.) **भवत्यो** (आपण दोघी) **भवत्य** (आपण सर्व स्त्री.) अशी रूपे होतात.

उदा. भवान् पठति = आपण शिकतात भवन्तौ पठतः = आपण दोघे शिकतात
भवत्यौ पठतः = आपण दोघी शिकतात भवत्यः पठन्ति = आपण सर्व शिकतात (स्त्री)

**अच् हीनं परेण संयोज्यम्** = हलन्त व्यंजनापुढे स्वर आल्यास पुढील स्वर मागच्या हलन्त व्यंजनात मिळून जातो.
वरील नियम ऐच्छिक आहे. येथे ऐच्छिक म्हणजे बोलणाऱ्याच्या किंवा लिहिणाऱ्याच्या इच्छेवर अवलंबून असणे.
**उदा. = अहम् + अद्य = अहमद्य** वरील नियम ऐच्छिक असल्यामुळे **अहम् अद्य** असे सुद्धा योग्य आहे.
याप्रमाणे त्वम् + इदानीम् = त्वमिदानीम् किंवा त्वम् इदानीम्

**रषाभ्यां नो णः समानपदे । अट् कुप्...** = एकाच शब्दात ऋ, र् आणि ष् यांच्यापुढे न् आल्यास त्या न् चा ण् होतो. ऋ, र् आणि ष् यांच्या पुढे येणारा न् यांच्यामध्ये स्वर, क वर्ग अर्थात **क्, ख्, ग्, घ्, ङ्, प** वर्ग अर्थात **प्, फ्, ब्, भ्, म्** तसेच **य्, र्, व्** आणि ह यांच्यापैकी काही वर्ण आले तरीही **न्** चा **ण्** होतो.
उदा. राम शब्दाचे तृतीया विभक्ती एकवचनामध्ये देवेन प्रमाणे **रामेन** असे रूप प्राप्त होते, परन्तु वरील नियमाने न् चा ण् होऊन **'रामेण'** असे होते. राम, ईश्वर, नृप, चन्द्र, सूर्य, ग्राम, पुत्र, शिष्य इत्यादि शब्दांच्या तृतीया विभक्ती एकवचनामध्ये न् चा ण् व षष्ठी विभक्ती बहुवचामध्ये नाम् चे 'णाम्' होइल. उदा. **ईश्वरेण, ईश्वराणाम्, नृपाणाम्, नृपेण, चन्द्रेण, चन्द्राणाम्, सूर्येण, सूर्याणाम्, पुत्रेण, पुत्राणाम्, शिष्येण, शिष्याणाम** इत्यादि.

☞ शब्दाच्या शेवटील **न्** चा **ण्** होणार नाही. उदा. **रामान्**

# बारावा पाठ

१. **उदाहरण वाक्ये**

१. भवान् गच्छति = आपण जातात. बालकः ईश्वरं स्मरति = मुलगा देवाचे स्मरण करतो.

३. पत्राणि पतन्ति = पाने पडतात ४. पुत्रः जनकं नमति = मुलगा वडिलांना नमस्कार करतो.

५. स शंसति = तो स्तुति करतो

२. **मराठी भाषेत भाषांतर करा.**

१. भवान् कुत्र गच्छति? २. भवती किं पठति । ३. पुत्रः भोजनं करोति । ४. पुष्पं पतति । ५. बालकः सूर्यं चन्द्रं च पश्यति । ६. स प्रश्नं चिन्तयति ७. सः ईश्वरं स्मरति । ८. शिष्यः उपाध्यायं नमति । ९. त्वमद्य किं करोषि? १०. स भृत्यः मालां हरति । १२. शिष्यः पुस्तकं तत्र नयति । १३. नराः गच्छन्ति । १४. स बालकः विद्यालयं गच्छति । १५. प्राज्ञाः सत्यं वदन्ति । १६. वयमीश्वरं स्मरामः।

३. **संस्कृत भाषेत भाषांतर करा -**

क) १. तो मुलगा वडिलांना नमस्कार करतो २. सज्जन मनुष्य देवाचे स्मरण करतो. ३. तो विद्यार्थी शाळेत जातो. ४. दुष्ट माणसे खरे बोलत नाहीत. ५. शहाणा मनुष्य खरे बोलतो. ६. सूर्य प्रकाशता. ७. सूज्ञ मनुष्य देवाचे स्मरण करतो. ८. विद्यार्थी शिक्षकांना नमस्कार करतात. ९. ती मुले शाळेत जातात. १०. तो चन्द्राला पाहतो. ११. तुम्ही दोघे शाळेत केव्हा जातात? १२. तो खणतो.

ख) १. तो खेळतो. २. पान पडते. ३. तो मुलगा देवाचे स्मरण करतो. ४. सज्जन मनुष्य देवाची स्तुति करतो. ५. तो पुस्तके तिकडे नेतो. ६. तो दुष्ट मनुष्य निंदा करतो. ७. तू काय हिरावून घेतोस?

ग) १. आपण दोघे कोठे जातात? २. आपण दोघी काय करतात? ३. आपण दोघे भोजन करतात. ४. आपण दोघी स्वयंपाक करतात.

४.

| अशुद्ध वाक्य | शुद्ध वाक्य | नियम |
|---|---|---|
| बुधः ईश्वरस्य स्मरति । | बुधः ईश्वरं स्मररति । | कर्मणि द्वितीया |
| सूर्येन, चन्द्रानाम् । | सूर्येण, चन्द्राणाम् । | रषाभ्यां नो ण : समानपदे । |

५. **स्वाध्याय**

अ = ३. ख मधील वाक्यांना द्विवचनामध्ये व बहुवचनामध्ये परिवर्तित करा.

आ = ३ ग. मधील वाक्यांना एकवचनामध्ये व बहुवचनामध्ये परिवर्तित करा.

इ = चन्द्र, पुत्र, नर, सज्जन या शब्दांची संपूर्ण विभक्तीरूपे लिहा.

ई = क्रीड्, पत्, स्मृ, शंस्, नी, निन्द्, हृ या धातुंच्या लट् लकाराची संपूर्ण रूपे लिहा.

६. **रूपे ओळखा**

क्रीडतः, स्मरन्ति, भवान्, भवति, भवती

७. **रिकाम्या जागा भरा (लट् लकार)**

१. भवन्तः ............ (हस्) २. भवती किम् ...... (पठ्) ३. ते बालकाः तत्र ........ (क्रीड्) ४. वयं किम् ...... (कृ). ५. यूयं सदा सत्यं ...... (वद्)

# चतुर्दशः पाठः

**नामानि** = वसुधा = पृथ्वी कन्या = मुलगी भार्या = पत्नी अजा = बकरी जटा = जटा, चिकटलेले केस क्षमा = क्षमा छाया = छाया, सावली प्रभा = तेज, कान्ती, किरण तारा = चांदणी, नक्षत्र गङ्गा = गंगा यमुना = यमुना सुधा = अमृत प्रयागः = प्रयाग सुखम् = सुख, दुःखम् = दुःख

**क्रियापदानि** = चुरादिगण = कथ् = सांगणे रच् = रचना करणे, बनविणे, तयार करणे पूज् = पूजा करणे

**अव्यये** = अन्तरा = मध्ये (दोघांमध्ये) अन्तरेण = शिवाय, वाचून

**संकेत** = वसुधा ते सुधा मालावत् ; प्रयाग देववत् : सुख व दुःख वनवत्

**व्याकरण** (माला शब्द, लङ् लकार, द्वितीया विभक्ती)

१. माला शब्दाची संपूर्ण विभक्ती रूपे पाठ करा. पहा परिशिष्ट शब्दसंख्या १७.

२. कन्या, भार्या इत्यादी आकारान्त स्त्रीलिंग शब्द 'माला' शब्दाप्रमाणे चालवा. भार्या, तारा, प्रभा इत्यादी शब्दांच्या विभक्ती रूपांमध्ये **'रषाभ्यां नो णः ....।'** या नियमाप्रमाणे न् चा 'ण्' होईल. उदा. भार्याणाम्, ताराणाम्, प्रभाणाम्

३. लट् लकार प्रथम पुरुष एकवचनामध्ये कथ् धातुचे **कथयति**, रच् धातुचे **रचयति**, पूज् धातुचे **पूजयति** या धातुंची लट् लकाराची इतर राहिलेली रूपे बनवा

**लोट** लकार प्रथमपुरुष एकवचनामध्ये कथ् धातुचे कथयतु, रच् धातुचे रचयतु, पूज् धातुचे पूजयतु या धातुंची लोट् लकाराची इतर रूपे बनवा.

**लङ् लकार** = अनद्यतन अर्थात आज न घडलेल्या म्हणजे आजच्या अगोदर घडलेल्या भूतकाळातील क्रिया व्यक्त करण्यासाठी लङ् लकाराचा प्रयोग करतात.

लङ् लकारामध्ये धातुच्या अगोदर (सुरुवातीला, पुवी) 'अ' * लागतो व धातुच्या नंतर (पुढे) प्रत्यय लागतात.

| पठ्–लङ् = भूतकाळ = शिकले, वाचले या अर्थी | | | | लङ्– परस्मैपद संक्षिप्त प्रत्यये | | |
|---|---|---|---|---|---|---|
| पुरुष | एकवचन | द्विवचन | बहुवचन | एकवचन | द्विवचन | बहुवचन |
| प्रथम पुरुष | अ+पठ्+अत्=अपठत्<br>शिकला, वाचले | अ+पठ्+अताम्=अपठताम्<br>दोघे शिकले, वाचले | अ+पठ्+अन्=अपठन्<br>ते शिकले, वाचले | अत् | अताम् | अन् |
| मध्यम पुरुष | अ+पठ्+अः = अपठः<br>तू शिकले /वाचले | अ+पठ्+अतम्=अपठतम्<br>तुम्ही दोघे शिकले/वाचले | अ+पठ्+अत = अपठत<br>तुम्ही शिकले/ वाचले | अः | अतम् | अत |
| उत्तम पुरुष | अ+पठ्+अम्=अपठम्<br>मी शिकलो/वाचले | अ+पठ्+आव = अपठाव<br>आम्ही दोघे शिकलो/वाचले | अ+पठ्+आम = अपठाम<br>आम्ही शिकलो/वाचलो | अम् | आव | आम |

याप्रमाणे लङ् लकाराची संक्षिप्त प्रत्यये लावून इतर धातुंची रूपे बनवा.

उदा. – अ+वद्+अत् = अवदत् = बोलला अरक्षत् = रक्षण केले, अपृच्छत् = विचारले, उप+विश्= उप+अविशत्★ = उपाविशत् = बसला याप्रमाणे इतर धातुंची रूपे बनवून तिन्ही पुरुषांमध्ये चालवा.

दिवादिगणातील धातुंना 'य्' विशेष लागेल. उदा. – अ+दीव्+य्+अत् = अदीव्यत् = प्रकाशला, अनृत्यत् = नाचला इत्यादी या प्रमाणे इतर धातुंची रूपे बनवून तिन्ही पुरुषांमध्ये चालवा.

चुरादिगणातील धातुंना अय् विशेष लागेल. उदा. – अ+चोर्+अय्+अत् = अचोरयत् = चोरले, अभक्षयत् = खाल्ले इत्यादि याप्रमाणे इतर धातुंची रूपे बनवून तिन्ही पुरुषांमध्ये चालवा.

**अन्तराऽन्तरेण युक्ते** = अन्तरा व अन्तरेण या शब्दांचा प्रयोग झाला असता यांच्या संबंधीत शब्दांची द्वितीया विभक्ती होते.

उदा. – **गङ्गां यमुनां च अन्तरा प्रयागः अस्ति** = गंगा व यमुना यांच्यामध्ये प्रयाग आहे.

**ज्ञानम् अन्तरेण न सुखम्** = ज्ञानाशिवाय सुख नाही.

* धातु स्वरादि असेल तर लङ् लकारामध्ये धातुच्या अगोदर अ च्या ऐवजी आ लागतो आणि तो आ व धातुचा आदि स्वर यांच्यात वृद्धि (संधी) होते. अर्थात

(१) धातुचा आदि स्वर अ असेल तर आ व अ मिळून त्यांचा 'आ' होतो. उदा. – आ+अट्+अत् = आटत्

(२) धातुचा आदिस्वर इ, ई, ए व ऐ या पैकी असेल तर 'आ' व हे स्वर मिळून त्यांचा 'ऐ' होतो. उदा. – आ+इच्छ्+अत् = ऐच्छत्

(३) धातुचा आदि स्वर उ, ऊ, ओ व औ या पैकी असेल तर आ व हे स्वर मिळून त्यांचा 'औ' होतो उदा. – आ+उख्+अत् = औखत्

★ धातु उपसर्गयुक्त असल्यास धातुलाच 'अ' लागतो. उप ला 'अ' लागणार नाही. 'विश्' लाच लागेल

# चौदावा पाठ

१. उदाहरण वाक्ये

१. स पुस्तकम् अपठत् = त्याने * पुस्तक वाचले / तो पुस्तक वाचता झाला.
२. अहं पुस्तकम् अपठम् = मी पुस्तक वाचले
३. त्वं पत्रम् अलिखः = तू पत्र लिहिलेस
४. दुर्जनः असत्यम् अवदत् = दुष्ट मनुष्य खोटे बोलला
५. कन्या पत्रम् अलिखत् = मुलीने पत्र लिहिले.

२. मराठी भाषेत भाषांतर करा.

१. स नगरमगच्छत् । २. त्वं ग्रामम् अगच्छः । ३. अहं जलम् अपिबम् । ४. दुर्जनः पुस्तकम् अचोरयत्। ५. सः अचिन्तयत् । ६. अहम् अकथम् । ७. कन्या मालाम् अरचयत् । ८. कन्या नृपम् अनमत् । ९. स छायां प्रति अगच्छत् । १०. भार्या सुधाम् अपिबत् । ११. बालिका ताराम् अपश्यत् । १२. गङ्गा यमुनां च अन्तरा प्रयागः अस्ति । १३. ज्ञानम् अन्तरेण न सुखम् । १४. मालाः जटाः च अत्र सन्ति । १५. गङ्गां यमुनां च पश्य । १६. वयं ग्रामम् अगच्छाम । १७. ते मालामरचन् । १८. युवां पत्राणि अलिखतम् ।

३. संस्कृत भाषेत भाषांतर करा -

क) १. तो गावाला गेला. २. तो येथे आला. ३. तो बागेकडे गेला. ४. तो हसला. ५. तो विद्या शिकला. ६. त्याने फळ खाल्ले. ७. त्याने धन चोरले. ८. त्याने देवाची पूजा केली. ९. त्याने माळा बनविली. १०. राजाने मुलीचे रक्षण केले.

ख) १. तू काय लिहिलेस? २. तू पुस्तक वाचलेस ३. तू घरी आलास. ४. तू तेज पाहिलेस ५. तू अमृत प्यालास ६. तू आज स्वयंपाक केला.

ग) १. मी पृथ्वीला नमस्कार केला. २. मी सूर्य पाहिला. ३. मी शाळेत गेलो. ४. मी वडिलांना नमस्कार केला. ५. मी पुस्तके वाचली. ६. मी तेव्हा मोहित झालो.

घ) १. तो सांगतो. २. तू माळा बनवितोस. ३. मी देवाची पूजा करतो. ४. बकरी घरी जाते. ५. शिष्य क्षमा इच्छितो. ६. मी सज्जनाला नमस्कार करतो.

४.

| अशुद्ध वाक्य | शुद्ध वाक्य | नियम |
|---|---|---|
| अहं देवस्य पूजयति । | अहं देवं पूजयामि । | कर्मणि द्वितीया । |
| अजा गृहे गच्छति । | अजा गृहं गच्छति । | गत्यर्थ कर्मणि द्वितीया.... । |

५. स्वाध्याय

अ = ३. क, ख, ग मधील वाक्यांना द्विवचनामध्ये व बहुवचनामध्ये परिवर्तित करा.
आ = ३ क, ख. ग मधील वाक्यांना लट् व लोट् लकारांमध्ये परिवर्तित करा.
इ = ३ घ. मधील वाक्यांना लोट् व लङ् लकारामध्ये परिवर्तित करा.
ई = कन्या, भार्या, क्षमा, सुधा या शब्दांची संपूर्ण विभक्तीरूपे लिहा.

६. रूपे ओळखा

मालया, अजाभ्याम्, वसुधायाम्, अभक्षयत्, अनमत् ।

७. रिकाम्या जागा भरा (लङ् लकार)

१. स वनम् ... (गम्) २. स फलम् .... (चुर्) ३. अहम् .... (खाद्) ४. शिष्यः क्षमाम्... (इष्)

* मराठी भाषेत भूतकाळामध्ये कर्ता प्रथम पुरुषी असल्यास कर्त्याला ने, नी असे प्रत्यय लावण्याची पद्धत आहे.

# पञ्चदशः पाठः

**नामानि** = कविः = कवी, कविता करणारा हरिः = विष्णु, सिंह, वानर, सूर्य इ. यतिः = सन्यासी
गिरिः = पर्वत, पहाड, कपिः = वानर भूपतिः = राजा सेनापतिः = सेनापती
मुनिः = मनन करणारा, मुनी रविः = सूर्य
अर्थः= द्रव्य, २. नफा, ३. प्रयोजन दण्डः = काठी कन्दुकः = चेंडू विवादः = वाद
प्रयोजनम् = प्रयोजन हसितम् = हसणे खनित्रम् = फावडे, कुदळ

**विशेषणम्** = हीन = रहित

**अव्ययानि** = सह = बरोबर सार्धम् = बरोबर साकम् = बरोबर समम = बरोबर अलम् = बस पुरे

**संकेत** = कविः ते रविः कविवत्, अर्थः ते विवादः देवचत्

**व्याकरण** (कवि शब्द, विधिलिङ् लकार करण कारक, तृतीया विभक्ती)

१. कवि शब्दाची संपूर्ण विभक्ती रूपे पाठ करा. पहा परिशिष्ट शब्द संख्या २.
२. हरि, रवि, गिरि इत्यादी काही 'इ'कारान्त पुल्लिंगी शब्दरूपांमध्ये मागील नियमानुसार 'न्' चा 'ण्' होईल.

**विधिलिङ् लकार** = लोट् लकारातील 'आशीर्वाद देणे' या अर्थाला सोडून इतर अर्थाच्या क्रिया व्यक्त करण्यासाठी तसेच इच्छा, संभव इत्यादी अर्थ व्यक्त करण्याकरिता विधिलिङ् लकाराचा प्रयोग करतात

| पठ्–विधिलिङ् = विध्यर्थ = शिकावे, वाचावे, शिकले पाहिजे या अर्थी | | | | लोट् – परस्मैपद संक्षिप्त प्रत्यये | | |
|---|---|---|---|---|---|---|
| पुरुष | एकवचन | द्विवचन | बहुवचन | एकवचन | द्विवचन | बहुवचन |
| प्रथम पुरुष | पठ् + एत्= **पठेत्** शिकावे/ वाचावे | पठ् + एताम् = **पठेताम्** त्या दोघांनी शिकावे/वाचावे | पठ् + एयुः = **पठेयुः** त्यांनी शिकावे / वाचावे | एत् | एताम् | एयुः |
| मध्यम पुरुष | पठ् + एः = **पठेः** तू शिकावे/ वाचावे | पठ् + एतम् = **पठेतम्** तुम्ही दोघांनी शिकावे/ वाचावे | पठ् + एत = **पठेत** तुम्ही शिकावे/ वाचावे | एः | एतम् | एत |
| उत्तम पुरुष | पठ्+एयम् = **पठेयम्** मी शिकावे/ वाचावे | पठ् + एव = **पठेव** आम्ही दोघांनी शिकावे/वाचावे | पठ् +एम = **पठेम** आम्ही शिकावे/वाचावे | एयम् | एव | एम |

याप्रमाणे विधिलिङ् लकाराची संक्षिप्त प्रत्यये लावून इतर धातुची रूपे बनवा
उदा. – वद्+एत् = वदेत् = बोलावे, बोलले पाहिजे, बोलो रक्षेत् = रक्षण करावे, रक्षण केले पाहिजे, रक्षण करो अपृच्छत् = विचारावे, विचारले पाहिजे, विचारो याप्रमाणे इतर धातुंची रूपे बनवून तिन्ही पुरुषांमध्ये चालवा.
दिवादिगणातील धातुंना 'य्' विशेष लागेल.
उदा. दीव् + य् + एत् = दीव्येत् = प्रकाशो, प्रकाशला पाहिजे नृत्येत् = नाचावे, नाचला पाहिजे या प्रमाणे दिवादिगणातील इतर धातुंची रूपे बनवून तिन्ही पुरुषांमध्ये चालवा.
चुरादि गणातील धातुंना अय् विशेष लागेल
उदा. चोर् + अय् + एत् = चोरयेत् = चोरावे, चोरले पाहिजे, चोरो या प्रमाणे चुरादिगणातील इतर धातुंची रूपे बनवून तिन्ही पुरुषांमध्ये चालवा.

**साधकतमं करणम्** = क्रियेच्या सिद्धिमध्ये सर्वात अधिक सहायक असणाऱ्या (साधन स्वरूप) कारकास 'करण' असे म्हणतात.

**कर्तृकरणयोस्तृतीया** = करण कारकाची तृतीया विभक्ती होते. कर्मणि व भावे प्रयोगात कर्त्याची तृतीया विभक्ती होते. उदा. – स दण्डेन चलति = तो काठीने चालतो

**सहयुक्तेऽप्रधाने** = सह या अव्ययाचा किंवा या अर्थाच्या इतर अव्ययांचा प्रयोग झाल्यास यांच्या संबंधातील शब्दाची तृतीया विभक्ती होते. उदा. – स जनकेन सह गच्छति = तो वडिलांबरोबर जातो
स जनकेन सार्धं गच्छति । स जनकेन साकं गच्छति । स जनकेन समं गच्छति ।

**उन् वारण प्रयोजनार्थेच** =
१. न्यूनताबोधक – हीनः, रहितः इत्यादी ऊन अर्थात न्यूनताबोधक शब्दांचा प्रयोग झाल्यास यांच्या संबंधित शब्दाची तृतीया विभक्ती होते. उदा. – ज्ञानेन हीनः = ज्ञानाने रहित
२. निषेधबोधक – अलम्, कृतम् इत्यादी वारण अर्थात निषेधबोधक शब्दांचा प्रयोग झाल्यास यांच्या संबंधीत शब्दाची तृतीया विभक्ती होते. उदा. – अलं हसितेन = हसु नका. कृतं हसितेन = हसु नका.
३. प्रयोजनबोधक – किम्, किं कार्यम्, किं प्रयोजनम्, कोऽर्थः इत्यादी प्रयोजनबोधक शब्दांचा प्रयोग झाल्यास त्यांच्या संबंधित शब्दांची तृतीया विभक्ती होते. उदा. दुर्जनेन किम् = दुर्जनापासून काय फायदा ?
दुर्जनेन् किं कार्यम्, किं प्रयोजनम्, कोऽर्थः वा ।

# पंधरावा पाठ

१. **उदाहरण वाक्ये**

१. स पठेत् = तो वाचो, त्याने वाचावे, त्याने वाचले पाहिजे २. स पुस्तकं पठेत् = तो पुस्तक वाचो, त्याने पुस्तक वाचावे, त्याने पुस्तक वाचले पाहिजे ३. त्वं ग्रामं गच्छेः = तू गावाला गेले पाहिजे. ४. अहं पुस्तकं पठेयम् = मी पुस्तक वाचले पाहिजे ५. कविः भूपतिना सह गच्छति = कवी सेनापत्याबरोबर जातो. ६. स खनित्रेण खनति = तो फावड्याने खणतो.

२. **मराठी भाषेत भाषांतर करा.**

१. स गच्छेत् । २. स ग्रामं गच्छेत् । ३. सः अद्य ग्रामं गच्छेत् । ४. त्वं फलं खादेः । ५. अहं तत्र गच्छेयम् । ६. त्वं दुर्जनेन सह न तिष्ठेः । ७. स कन्दुकेन क्रीडति ! ८. यतिना सह मुनिः तिष्ठति । ९. स ज्ञानेन हीनः अस्ति। १०. सेनापतिः भूपतिना सह गच्छति । ११. स हरिं नमेत् । १२. दुर्जनेन कोऽर्थः । १३. स गिरिं पश्यति । १४. रविः दीव्यति १५. अलं विवादेन । १६. युवां तुष्येतम् ।

३ - **संस्कृत भाषेत भाषांतर करा -**

**क)** १. तो वेद वाचो । २. तो हसला पाहिजे. ३. तो येथे आला पाहिजे. ४. त्याने तेथे जऊ नये. ५. त्याने काठीने चालावे. ६. त्याने वडिलांबरोबर तेथे जावे. ७. त्याने फळ खावे. ८. कवी बागेत जावो.

**ख)** १. तू आज गावाला गेले पाहिजे. २. तू फळे खाल्ली पाहिजेत. ३. तू पाणी प्यायला हवे. ४. तू हरि बरोबर खेळले पाहिजे. ५. तू मुनीला नमस्कार केला पाहिजे. ६. तू कुदळीने खणले पाहिजे.

**ग)** १. मी पत्र लिहिले पाहिजे. २. मी प्रश्न विचारला पाहिजे. ३. मी शहरात जायला पाहिजे. ४. मी कवीबरोबर येथे थांबले पाहिजे. ५. मी वडिलांना नमस्कार केला पाहिजे. ६. मी कविबरोबर गावाला जातो

**घ)** १. तू काठीने चालतोस. २. वानर शेतकऱ्याबरोबर वनात गेले. ३. हसु नका. ४. दुर्जनापासून काय लाभ? ५. आम्ही दोघांनी पत्र लिहिले पाहिजे. ६. तुम्ही गावाला गेले पाहिजेत. ७. ते दोघे येथे आले पाहिजे.

| ४. अशुद्ध वाक्य | शुद्ध वाक्य | नियम |
|---|---|---|
| त्वं कन्दुकं चरेः । | त्वं कन्दुकेन चरेः । | कर्तृकरणयोस्तृतीया |
| त्वं हरिं सह क्रीडेत् । | त्वं हरिणा सह क्रीडेत् । | सहयुक्तेऽप्रधाने |
| अलं हसितस्य । | अलं असितेन । | ऊनवारणप्रयोजनार्थच । |

**५. स्वाध्याय**

अ = ३. क, ख, ग मधील वाक्यांना बहुवचनामध्ये परिवर्तित करा.

आ = ३ क, ख, ग मधील वाक्यांना लट् व लङ् लकारामध्ये परिवर्तित करा

इ = हरि, मुनि, कवि, गिरि या शब्दांची संपूर्ण विभक्ती रूपे लिहा

ई = गम्, हस्, वद्, स्मृ या धातुंच्या विधिलिङ् लकाराची संपूर्ण रूपे लिहा.

**६. रूपे ओळखा**

हरिणा, कविभ्यः, मुनेः, नृत्येत्, तुदेयम् ।

**७. रिकाम्या जागा भरा (विधिलिङ् लकार)**

१. सः अद्य पुस्तकम्.... (पठ्) २. त्वं ग्रामम् .... (गम्) भूपति .... (रक्ष्)

# षोडशः पाठः

**नामानि** = भानुः = सूर्य, इषुः = बाण, शर इन्दुः = चन्द्र गुरुः * = गुरु शत्रुः = शत्रु = लहान/तान्हे मूल, पशुः = पशु, जनावर, तरुः = झाड, वृक्ष वायुः = वारा, हवा शिशुः = लहान/तान्हे मूल, साधुः = साधु, चांगला/ धार्मिक मनुष्य, कर्णः = कान पृष्ठः= पाठ २. पृष्ठभाग पादः = पाय नेत्रम् = डोळा

**विशेषणानि** = बधिरः = बहिरा कुब्जः= कुबडा खञ्जः = लंगडा काणः = काणा, तिरका

**क्रियापदानि** = भ्वादिगण : जीव् = जगणे, वाचणे गद् = बोलणे वस् = राहणे

☞ **संकेत** = भानुः ते साधुः भानुवत्; जीव् ते वस् पठतिवत्

☞ **व्याकरण** (भानु शब्द, लृट् लकार, तृतीया विभक्ती)

१. भानु शब्दाचे संपूर्ण विभक्तीरूपे पाठ करा. पहा परिशिष्ट शब्दरूपसंख्या ४.

२. गुरु, इषु, शत्रु, तरु इत्यादी काही उकारान्त पुल्लिंगी शब्दरूपांमध्ये न् चा ण् होईल.

**लृट् लकार** = भविष्य काळातील क्रिया व्यक्त करण्यासाठी लृट् लकाराचा प्रयोग करतात

| पठ्–लृट् लकार भविष्यकाळ = शिकेल/ वाचेल या अर्थी | | | | लृट्–परस्मैपद संक्षिप्त प्रत्यये | | |
|---|---|---|---|---|---|---|
| पुरुष | एकवचन | द्विवचन | बहुवचन | एकवचन | द्विवचन | बहुवचन |
| प्रथम पुरुष | पठ्+इ+ष्यति= पठिष्यति<br>शिकेल, शिकणार/वाचणार | पठ्+इ+ष्यतः= पठिष्यतः<br>ते दोघे शिकतील, शिकणार/वाचणार | पठ्+इ+ष्यन्ति = पठिष्यन्ति<br>सर्व शिकतील/शिकणार/वाचणार | (इ) स्यति<br>ष्यति | (इ) स्यतः<br>ष्यतः | (इ) स्यन्ति<br>ष्यन्ति |
| मध्यम पुरुष | पठ+इ+ष्यसि = पठिष्यसि<br>तू शिकशील/शिकणार/वाचणार | पठ्+इ+ष्यथः= पठिष्यथः<br>तुम्ही दोघे शिकाल, शिकणार/वाचणार | पठ्+इ+ष्यथ= पठिष्यथ<br>तुम्ही शिकाल, शिकणार/वाचणार | (इ) स्यसि<br>ष्यसि | (इ) स्यथः<br>ष्यथः | (इ) स्यथ<br>ष्यथ |
| उत्तम पुरुष | पठ्+इ+ष्यामि= पठिष्यामि<br>मी शिकेल, शिकणार/वाचणार | पठ्+इ+ष्यावः= पठिष्यावः<br>आम्ही दोघे शिकू/शिकणार/वाचणार | पठ्+इ+ष्यामः= पठिष्यामः<br>आम्ही शिकू, शिकणार/वाचणार | (इ) स्यामि<br>ष्यामि | (इ) स्यावः<br>ष्यावः | (इ) स्यामः<br>ष्यामः |

लृट् लकारामध्ये काही धातुंच्या पुढे येणाऱ्या संक्षिप्त प्रत्ययांना इडागम अर्थात् 'इ' आगम होतो. अशावेळी प्रत्ययातील 'स्य' चा 'ष्य' होतो.

**इडागम होणाऱ्या काही महत्त्वपूर्ण धातुंच्या लृट् लकाराच्या फक्त प्रथम पुरुष एकवचनाची रूपे**

पठ् = पठिष्यति, कृ= करिष्यति, खाद् = खादिष्यति, क्रीड् = क्रीडिष्यति, पत् = पतिष्यति, स्मृ=स्मरिष्यति, हृ=हरिष्यति, इष्=एषिष्यति, दिव् = देविष्यति, नश्=नशिष्यति, नृत्=नर्तिष्यति, भ्रम्=भ्रमिष्यति, लिख्=लेखिष्यति, चुर्=चोरयिष्यति, चिन्त्= चिन्तयिष्यति, कथ्=कथयिष्यति, रच्=रचयिष्यति, शुच्=शोचिष्यति, मुह्=मोहिष्यति, बुध्=बोधिष्यति, चर्=चरिष्यति, तृ=तरिष्यति, लुभ्=लोभिष्यति, प्रथ्=प्रथिष्यति, अर्द्= अर्दयिष्यति, क्षल्=क्षालयिष्यति, गण्=गणयिष्यति, घुष्=घोषयिष्यति, भूष्=भूषयिष्यति, अट्=अटिष्यति, वाञ्छ्=वाञ्छिष्यति, सृ=सरिष्यति, निन्द्=निन्दिष्यति, शंस्=शंसिष्यति, पूज्=पूजयिष्यति, जीव्=जीविष्यति, हृ=हरिष्यति, खन् = खनिष्यति. या धातुंची लृट् लकारांची इतर रूपे चालवा.

**इडागम न होणाऱ्या काही महत्त्वपूर्ण धातुंच्या लृट् लकाराच्या प्रथम पुरुष एकवचनाची रूपे**

पच्=पक्ष्यति, नम्=नंस्यति, सृज्=स्रक्ष्यति, यज्=यक्ष्यति, तुष्=तोक्ष्यति, शुष्=शोक्ष्यति, तप्=तप्स्यति, कृष्=कर्क्ष्यति, पुष्=पोक्ष्यति, भज्=भक्ष्यति, त्यज्=त्यक्ष्यति, वप्=वप्स्यति, दृश्=दृश्यति, स्था=स्थास्यति, पा=पास्यति, घ्रा=घ्रास्यति, सद्=सत्स्यति, जि=जेष्यति, नी=नेष्यति, तुद्=तोत्स्यति, प्रच्छ्=प्रक्ष्यति, स्पृश्=स्प्रक्ष्यति, विश्=वेक्ष्यति, वस्=वत्स्यति. राहिलेली रूपे चालवा.

**येनाङ्गविकारः** = शरीराच्या ज्या अवयवात विकृति असते, त्या विकृत अवयववाचक शब्दाची तृतीया विभक्ती होते. उदा. – **नेत्रेण काणः** = डोळ्याने काणा

**प्रकृत्यदिभ्यः उपसंख्यानम्** = प्रकृति, सुख इत्यादि काही क्रियाविशेषण शब्दांची तृतीया विभक्ती होते. उदा. प्रकृत्या ★ साधुः = स्वभावाने सरळ., **सुखेन जीवति** = सुखाने जगतो

★ * गुरु शब्द विशेषण म्हणून वापरला जातो तेव्हा त्याचा अर्थ 'श्रेष्ठ', 'मोठा' असा असतो.

★ 'प्रकृत्या' हे 'प्रकृति' या इकारान्त स्त्रीलिंगी शब्दाचे तृतीया विभक्ती एक वचन आहे.

# सोळावा पाठ

### १. उदाहरण वाक्ये

१. स पुस्तकं पठिष्यति = तो पुस्तक वाचेल. २. अहं पुस्तकं पठिष्यामि = मी पुस्तक वाचेल
३. स गुरुं नस्यति= तो गुरुंना नमस्कार करील. ४. रामः ग्रामं गमिष्यति = राम गावाला जाईल.
५. शिष्य गुरुणा सह आगच्छति = शिष्य गुरुंबरोबर येतो

### २. मराठी भाषेत भाषांतर करा.

१. स किं पठिष्यति? २. सः अद्य पुस्तकं पठिष्यति । ३. स नगरं गमिष्यति । ४. स बालकं रक्षिष्यति । ५. त्वं सत्यं वदिष्यसि । ६. अहं कार्य करिष्यामि. ७. बालकः भ्रमिष्यति । ८. स पक्ष्यति । ९. त्वं गुरुं नंस्यसि । १०. वयं तत्र स्थास्यामः । ११. स प्रश्नं प्रक्ष्यति । १२. त्वं पुष्पं स्प्रक्ष्यसि । १३. अहं जलं पास्यामि । १४. स पादेन खञ्ज अस्ति । १५. स सुखेन जीवति । १६. तौ सत्यं गदिष्यतः । १७. ते कुत्र वत्स्यन्ति ।

### ३ - संस्कृत भाषेत भाषांतर करा -

क) तो आज गावाला जाईल. २. राजा सज्जनाचे रक्षण करील. ३. तो खरे बोलेल. ४. तो स्मरण करील. ५. तो फळे खाईल, ६. तो तेथे खेळेल. ७. दुष्ट मनुष्य धन चोरेल. ८. धार्मिक मनुष्य वेद वाचेल. ९. तो राजा शत्रुला पाहिल. १०. तो झाडांची गणना करील.

ख) १. तू नेहमी देवाचे स्मरण करशील. २. तू धन चोरणार नाहीस. ३. तू विचार करशील. ४. तू पत्र लिहिशील. ५. तू तेथे फळे खाशील. ६. तू माळा बनवशील. ७. तू वडिलांना नमस्कार करशील. ८. तू नाचशील.

ग) १. मी स्वयंपाक करीन. २. मी प्रश्न विचारीन. ३. मी चंद्राला नमस्कार करीन.
४. मी शत्रुला जिंकेन. ५. मी घरात प्रवेश करीन. ६. मी खरे बोलेन.

घ) १. वारा वाहतो. २. शत्रू काय करीत आहे. ३. बाण कोठे आहेत. ४. तान्हे मूल झाडांना व पशूंना पाहते.
५. धार्मिक मनुष्य सूर्याला व चंद्राला नमस्कार करतो.
१. तो डोळ्याने काणा आहे. २. तो कानाने बहिरा आहे. ३. तो मुलगा दोन्ही कानांनी बहिरा आहे. ४. तो दुःखाने जगतो. ५. ते दोघे जातील. ६. आम्ही आज येणार.

### ४.

| अशुद्ध वाक्य | शुद्ध वाक्य | नियम |
|---|---|---|
| स कर्णस्य बधिरः अस्ति । | स कर्णेन बधिरः अस्ति । | येनाङ्ग विकार : । |
| स दुःखस्य जीवति | स दुःखेन जीवति । | प्रकृत्यादिभ्य उप... । |

### ५. स्वाध्याय

अ = ३. क, ख, ग मधील वाक्यांना द्विवचनामध्ये व बहुवचनामध्ये परिवर्तित करा.
आ = ३ क, ख, ग मधील लट्, लोट्, लङ् व विधिलिङ् लकारामध्ये परिवर्तित करा
इ = इषु, गुरु, शत्रु, वायु, साधु या शब्दांची संपूर्ण विभक्ती रूपे लिहा
ई = रक्ष्, वद्, गम्, हस्, नम्, तुष्, चिन्त् या धातुंच्या लृट् लकाराची संपूर्ण रूपे लिहा.

### ६. रूपे ओळखा

भानवे, गुरुभ्यः, वाय्वोः, भविष्यति, स्प्रक्ष्यन्ति ।

### ७. रिकाम्या जागा भरा (लृट् लकार)

१. स जलम् ... (पा) २. साधु धनम् .... (त्यज्) ३. सः ईश्वरम् .... (भज्)

# सप्तदशः पाठः

नामानि = पाठः = पाठ, धडा लेखः = लेख विप्रः = ब्राह्मण मल्लः = पहेलवान
मोदकम् = लाडू इन्द्रः = इंद्र, इंद्रदेव दुग्धम् = दूध
सर्वनामानि = सर्व = सर्व तत् = तो एतत् = हा यत् = जो किम् = कोण
क्रियापदानि = भ्वादिगण : दा (यच्छ्) = देणे धाव् = धावणे, पळणे चल् = चालणे रुच्* =आवडणे
अव्यये = नमः = नमस्कार स्वस्ति = आशीर्वाद , कल्याण स्वाहा = आहुती (देवांसाठी)
स्वधा = आहुती (पितरांसाठी) अलम् = पर्याप्त, समर्थ वषट् = साधुवाद
विशेषणानि = सुन्दरम् = सुंदर शोभनम् = चांगले, उत्तम समीचीनम् = चांगले मधुरम् = गोड

☞ **संकेत** = सर्व ते किम् सर्ववत्, दा ते चल् पठतिवत्

☞ **व्याकरण** (सर्वनाम - पुल्लिंग, संप्रदान कारक, चतुर्थी विभक्ती)

१. सर्व या सर्वनामाची पुल्लिंगी विभक्तीरूपे पाठ करा. पहा परिशिष्ठ शब्दरूपसंख्या ४१.
२. तत्, सर्वनामाच्या पुल्लिंगी प्रथमा विभक्ती एकवचनामध्ये सः असे रूप होते. इतर विभक्तीरूपांमध्ये 'त' होऊन त्याची पुल्लिंगी विभक्तीरूपे 'सर्व' या सर्वनामाच्या पुल्लिंगी विभक्तीरूपांप्रमाणे होतात.
उदा. सः, तौ, ते (प्रथमा) तम्, तौ, तान् (द्वितीया) एतत्, सर्वनामाच्या पुल्लिंगी प्रथमा विभक्ती एकवचनामध्ये एषः असे रूप होते. इतर विभक्तीरूपांमध्ये 'एत' होऊन त्याची पुल्लिंगी विभक्तीरूपे 'सर्व' या सर्वनामाच्या पुल्लिंगी विभक्तीरूपांप्रमाणे होतात.
उदा. एषः, एतौ, एते (प्रथमा) एतम्, एतौ, एतान् (द्वितीया)
यत् या सर्वनामाचा य होऊन त्याची पुल्लिंगी विभक्तीरूपांमध्ये 'सर्व' या सर्वनामाच्या पुल्लिंगी विभक्तीरूपांप्रमाणे होतात.
उदा. यः, यौ, ये (प्रथमा) यम्, यौ, यान् (द्वितीया)
किम् या सर्वनामाचा क होऊन त्याची पुल्लिंगी विभक्तीरूपांमध्ये 'सर्व' या सर्वनामाच्या पुल्लिंगी विभक्तीरूपांप्रमाणे होतात.
उदा. कः, कौ, के (प्रथमा) कम्, कौ, कान् (द्वितीया)
समजले नसल्यास पहा परिशिष्ट शब्दरूप संख्या ६४, ६७ , ७०, ७३.
५. लट् लकार प्रथम पुरुष एकवचनामध्ये दा धातुचे यच्छति, धाव्, धातुचे = धावति व चल् धातुचे चलति असे रूप होते. या धातुंची इतर राहिलेली लट् लकाराची रूपे चालवा.
६. लृट् लकार प्रथम पुरुष एकवचनामध्ये दा धातुचे दास्यति, धाव् धातुचे धाविष्यति व चल् धातुचे चलिष्यति असे रूपे होतात. या धातुंची राहिलेली लृट् लकाराची रूपे चालवा.

**गुणवचनम् अविशिष्टलिङ्गम्** = विशेषणांचे लिंग-विभक्ती-वचन हे विशेष्याच्या लिंग-विभक्ती-वचनाप्रमाणे असतात.

उदा. - सुन्दरः बालकः, सुन्दरा★ बालिका, सुन्दरं बालकम्, सुन्दरां बालिकाम्, सुन्दरं फलम्, सुन्दराणि फलानि, दुर्जनेन, पुत्रेण, सन्दरेषु गृहेषु, सः✿ बालकः, कः मनुष्यः, एषः मनुष्यः, तस्मै मनुष्याय, तस्य नरस्य, तस्मिन् गृहे

**कर्मणा यमभिप्रैति स सम्प्रदानम्**
दिल्या जाणाऱ्या वस्तूरूपादि कर्मानि देण्याची क्रिया ज्याच्यावर (पूर्णरूपाने) घडते त्यास **सम्प्रदान** असे म्हणतात.
उदा. - नृपः विप्राय धनं यच्छति । - राजा ब्राह्मणास धन देतो.

**सम्प्रदाने चतुर्थी** = संप्रदान कारकाची चतुर्थी विभक्ती होते

**नमःस्वस्तिस्वाहास्वधालंवषड्योगाच्च** = नमः, स्वस्ति स्वाहा स्वधा अलम् आणि वषट् अव्ययांचा प्रयोग झाल्यास यांच्या संबंधीत शब्दाची चतुर्थी विभक्ती होते.
उदा. - जनकाय नमः = वडिलांना नमस्कार पुत्राय स्वस्ति = मुलाला आशीर्वाद
इन्द्राय स्वाहा = इंद्र देवाला आहुती पितृभ्यः स्वधा = पितरांना आहुती
अलं मल्लः मल्लाय = पहेलवानासाठी पहेलवान समर्थ आहे. इन्द्राय वषट् = इंद्राला (इंद्रदेवाला) साधुवाद.

**रुच्यर्थानां प्रीयमाणः** = आवडणे या अर्थाच्या धातुंचा प्रयोग झाल्यास ज्याला आवडते त्याची चतुर्थी विभक्ती होते.

उदा. - बालकाय मोदकं रोचते = मुलाला लाडू आवडतो.

* हा धातु आत्मने पदातील आहे. याचे प्रथम पुरुष एकवचनामध्ये रोचते असे रूप होते.★ स्त्रीलिंगामध्ये कांही विशेषणांना शेवटील अ च्या जागी आ लागतो व त्याची रूपे माला शब्दाप्रमाणे चालतात.✿ नामाच्या अगोदर येणारे सर्वनाम "**सार्वनामिक विशेषण**" असते.

# सतरावा पाठ

## १. उदाहरण वाक्ये

१. स विप्राय धनं यच्छति = तो ब्राह्मणाला धन देतो. २. स कस्मै विप्राय धनं यच्छति = तो कोणत्या ब्राह्मणाला धन देतो ? ३. स तस्मै विप्राय धनं यच्छति = तो त्या ब्राम्हणाला धन देतो ४. स बालकः तस्मै विप्राय धनं यच्छति = तो मुलगा त्या ब्राह्मणाला धन देतो ५. सः एतास्मै विप्राय धनं यच्छति = तो ह्या ब्राह्मणाला धन देतो.

## २. मराठी भाषेत भाषांतर करा.

१. स मनुष्यः कस्मै विप्रायं धनं यच्छति? २. स मनुष्यः एतस्मै विप्राय धनं यच्छति । ३. स पुत्राय मोदकं यच्छति । ४. नृपः तेभ्यः धान्यं यच्छन्ति । ६. भूपतिः तस्मै सेनापतये धनं यच्छति । ७. एष बालकः चलति । ८. एषाः बालकाः धावति । ९. ते तान् बालकान् पृच्छन्ति । १०. तस्मै बालकाय मोदकं रोचते । ११. एष ग्रामः शोभनः अस्ति । १२. एषः विद्यालयः सुन्दरः अस्ति ।

## ३ - संस्कृत भाषेत भाषांतर करा -

क) १. तो ह्या ब्राह्मणाला धन देतो. २. तो मनुष्य ह्या मुलाला लाडू देतो. ३. राम सज्जनाला पाणी देतो. ४. हा मनुष्य विद्यार्थ्यांना पुस्तके देतो. ५. वडिल मुलाला फळे देतात. ६. गुरु कोणत्या शिष्याला फळे देतात? ७. गुरु ह्या शिष्याला फळे देतात. ८. त्या मुलाला दूध आवडते. ९. ह्या मुलाला फळे आवडतात. १०. त्या गुरुला नमस्कार. ११. ह्या शिष्याला आशीर्वाद. १२. इन्द्रदेवाला आहुती.

ख) १. हा मुलगा धडे वाचतो. २. तो मुलगा पाठ लिहितो. ३. हा लहान मुलगा चालतो. ४. ती मुले धावतात. ५. येथे लाडू आणि दूध आहे.

ग) हे विद्यालय आहे. २. हे विद्यालय सुन्दर आहे. ३. तेथे सुंदर फूल आहे. ४. येथे चांगली सावली आहे. ५. कोणता लेख चांगला आहे? ६. तेथे गोड फळ आहे.

## ४.

| अशुद्ध वाक्य | शुद्ध वाक्य | नियम |
|---|---|---|
| कं बालकाय दुग्धं रोचते । | कस्मै बालकाय दुग्धं रोचते । | सम्प्रदाने चतुर्थी । |
| तं गुरुं नमः । | तस्मै गुरवे नमः । | नमः स्वति स्वाहा...। |

## ५. स्वाध्याय

अ = ३. क, ख, मधील वाक्यांना द्विवचनामध्ये बहुवचनामध्ये परिवर्तित करा.

आ = सर्व तत्, एतत्, यत् व किम् या सर्वनामाची संपूर्ण पुल्लिंगी विभक्तीरूपे लिहा.

इ = दा, धाव् व चल् या धातुंच्या लट् लोट् व लृट् लकारांची संपूर्ण रूपे लिहा.

ई = रक्ष्, वद्, गम्, हस्, नम्, तुष्, चिन्त् या धातुंच्या लृट् लकाराची संपूर्ण रूपे लिहा.

## ६. रूपे ओळखा

सर्व, तस्मै, तस्मात्, येषु, दास्यन्ति

## ७. रिकाम्या जागा भरा (लट् लकार)

१. स शिष्याय फलम् ..... (दा) । २. सः ....... दुग्ध यच्छति (शिशु)

# अष्टादशः पाठः

नामानि = ब्राह्मणः = ब्राह्मण क्षत्रियः = क्षत्रिय वैश्यः = वैश्य शूद्रः = शूद्र वर्णः= वर्ण, जात २. रंग
मूर्खः = मूर्ख, मूढ चोरः = चोर मोक्षः = मोक्ष, मुक्ती, तारण स्नानम् = स्नान, आंघोळ
पठनम् = शिकणे, वाचणे, अभ्यास भक्षणम् = भक्षण करणे, खाणे
आभूषणम् = अलंकार, डागिना सुवर्णम् = सोने

क्रियापदानि = भ्वादिगण : क्रन्द् = रडणे, ईर्ष्य् = ईर्ष्या करणे, द्वेष करणे
दिवादिगण = क्रुध् = क्रोध करणे, रागावणे कुप् = कोपणे, रागावणे
द्रुह् = द्रोह करणे क्षुभ् = संतापणे, खवळणे
तुदादिगण = उप + दिश् = उपदेश करणे, सांगणे चुरादिगण = नि+वेद् = निवेदन करणे
कण्ड्वादिगण = असू (असूय्) = तिरस्कार करणे

अव्ययानि = अर्थम् = करीता, साठी कृते = करीता, साठी क्षिप्रम् = लगेच, जलदीने

संकेत = ब्राह्मण ते मोक्ष देववत्, स्नान ते सुवर्ण वनवत्

व्याकरण (सर्वनाम-नपुंसक लिंग, अस् धातु, चतुर्थी विभक्ती)

१. सर्व या सर्वनामाची नपुंसकलिंगी प्रथमा व द्वितीया विभक्तीमध्ये **सर्वम्, सर्वे, सर्वाणि (प्रथमा) [सर्वम्, सर्वे, सर्वाणि (द्वितीया)]** अशी रूपे होतात. सर्व सर्वनामाची तृतिया विभक्ती पासून सप्तमी विभक्तीपर्यंत असलेली नपुंसकलिंगी संपूर्ण विभक्तीरूपे त्याच्या पुल्लिंगी विभक्तीरूपांप्रमाणेच होतात. २. तत्, एतत्, यत् आणि किम् या सर्वनामांची तृतीया विभक्तीपासून सप्तमी विभक्तीपर्यंत असलेली नपुंसक लिंगी संपूर्ण विभक्तीरूपे त्यांच्या पुल्लिंगी विभक्ती रूपांप्रमाणेच होतात. नपुंसकलिंगी प्रथमा व द्वितीया विभक्तीमध्ये तत् सर्वनामाचे **तत्, ते, तानि;** एतत् सर्वनामाचे **एतत्, एते, एतानी; यत्** सर्वनामाचे **यत्, ये, यानी** व किम् सर्वनामाचे **किम्, के, कानि** अशी रूपे होतात. समजले नसल्यास पहा परिशिष्ट शब्दरूपसंख्या ४२,६५,६८,७१,७४. ४. अस् - असणे या धातुच्या लोट्, लङ्, विधिलिंङ् आणि लृट् लकारांची रूपे पाठ करा. पहा परिशिष्ट धातुरूपसंख्या ४८. ५. लट् लकार प्रथम पुरुष एकवचनामध्ये क्रन्द् धातुचे **क्रन्दति, ईर्ष्य्** धातुचे **ईर्ष्यति क्रुध्** धातुचे **क्रुध्यनि,** कुप् धातुचे **कुप्यति,** द्रुह् धातुचे **द्रुह्यति,** क्षुभ् धातुचे **क्षुभ्यति,** उप+दिश् धातुचे **उपदिशति** व नि+वेद् धातुचे **निवेदयति,** असू धातुचे **असूयति** असे रूप होते. या धातुंची इतर राहिलेली लट्, लोट्, लङ् व विधिलिङ् लकाराची रूपे चालवा. ६. लृट् लकार प्रथम पुरुष एकवचनामध्ये क्रन्द् धातुचे **क्रन्दिष्यति, ईर्ष्य्** धातुचे **ईर्षिष्यति क्रुध्** धातुचे **क्रोत्स्यति,** कुप् धातुचे **कोपिष्यति,** द्रुह धातुचे **द्रोहिष्यति,** क्षुभ् धातुचे **क्षोभिष्यति,** उप+दिश् धातुचे **उपदेक्ष्यति, नि+वेद्** धातुचे **निवेदयिष्यति,** व **असू** धातुचे **असूयिष्यति** असे रूप होते. या धातुंची इतर राहिलेली लृट् लकाराची रूपे चालवा.

**क्रुधद्रुहेर्ष्यासूयार्थानां यं प्रतिकोपः** = क्रुध्, द्रुह्, ईर्ष्य्, असू या धातुंचा किंवा या धातुंच्या अर्थाप्रमाणे अर्थ असणाऱ्या इतर धातुंचा प्रयोग झाल्यास ज्याच्यावर क्रोध वगैरे केले जातात त्याची चतुर्थी विभक्ती होते.

उदा. - रामः मुर्खाय क्रुध्यति = राम मूर्खावर रागावतो = रामः मुर्खाय कुप्यति ।
मुर्खः सज्जनाय असूयति = मुर्ख सज्जनाचा तिरस्कार करतो मुर्खः सज्जनाय ईर्ष्यति = मूर्ख सज्जनाची ईर्ष्या करतो,
मुर्खः सज्जनाय द्रुह्यति = मुर्ख सज्जनाचा तिरस्कार करतो

**क्रियया यमभिप्रैति ....** = कथ्, नि+वेद्, उप+दिश् इत्यादी कथनार्थक धातुंचा प्रयोग झाल्यास ज्याला कथन केले (सांगितले) जाते त्याची चतुर्थी विभक्ती होते.

उदा. - **स शिष्याय कथयति** = तो शिष्याला सांगतो **स जनकाय निवेदयति** = तो वडिलांना निवेदन करतो
**उपाध्याय शिष्याय** * उपदिशति = शिक्षक विद्यार्थ्याला उपदेश करतात

**तादर्थे चतुर्थी** = अ = एखादी वस्तु, एखादा पदार्थ ज्या प्रयोजनासाठी असतो तेव्हा त्या प्रयोजनवाचक शब्दाची चतुर्थी विभक्ती होते. उदा = **अभूषणाय सवर्णम्** = अलंकारी सोने
आ = एखादी क्रिया ज्या प्रयोजनासाठी घडते तेव्हा त्या प्रयोजनवाचक शब्दाची चतुर्थी विभक्ती होते.
उदा. = **स मोक्षाय हरिं भजति** = तो मोक्षासाठी हरीचे भजन करतो

**अर्थकृते चतुर्थ्यर्थे** = चतुर्थी विभक्तीचा अर्थ व्यक्त करण्यासाठी **अर्थम्** व **कृते** या अव्ययांचा प्रयोग करतात. 'अर्थम्' हे अव्यय समास घेऊन पूर्वपदात मिळते मात्र **कृते** या अव्ययाच्या संबंधी शब्दाची षष्ठि विभक्ती होते.
**उदा. - स पठनाय गच्छति = स पठनार्थं गच्छति =** तो शिकण्यासाठी जातो = **स पठनस्य कृते गच्छति ।**

* उप+दिश् या धातुचा प्रयोग झाल्यास चतुर्थीच्या ऐवजी द्वितीया विभक्तीसुद्धा होते. उदा. **उपाध्यायः शिष्यम् उपदिशति.**

# अठरावा पाठ

## १. उदाहरण वाक्ये

१. स दुर्जनाय क्रुध्यति = तो दुर्जनावर रागावतो २. स कस्मै दुर्जनाय क्रुध्यति = तो कोणत्या दुर्जनावर रागावतो. ३. तत् पुष्पं सुन्दरम् अस्ति = ते फुल सुंदर आहे ४. तानि पुष्पाणि सुन्दराणि सन्ति = ती फुले सुन्दर आहेत ५. कानि पुष्पाणि सुन्दराणि सन्ति = कोणती फूले सुंदर आहेत? ६. सः अत्र अस्तु, आसीत, स्यत्, भविष्यति = तो येथे असो, होता, असावा, असेल ७. स ज्ञानाय गच्छति = तो ज्ञानासाठी जातो. ८. स ज्ञानार्थं गच्छति = तो ज्ञानासाठी जातो. ९. स ज्ञानस्य कृते गच्छति = तो ज्ञानासाठी जातो.

## २. मराठी भाषेत भाषांतर करा.

१. स कस्मै दुर्जनाय कुप्यति? २. सः एतस्मै दुर्जनाय कुप्यति । ३. दुर्जनः सज्जनाय द्रुह्यति । ४. एष दुर्जनः तस्मै मनुष्याय ईर्ष्यति । ५. स मूर्खः एतस्मै सज्जनाय असूयति । ६. स रामाय कथयति । ७. पुत्रः जनकाय निवेदयति । ८. गुरुः शिष्याय उपदिशति । ९. जनकाः पुत्रेभ्यः उपदिशन्ति । १०. यूयं ज्ञानाय गुरुं नमथ । ११. स स्नानार्थं कुत्र गच्छति? १२. स स्नानार्थं तत्र गच्छति १३. त्वं भक्षणस्य कृते तत्र गच्छसि । १४. किं पुष्पं शोभनम् अस्ति? १५. तत् पुष्पं शोभनम् अस्ति । १६. कानि फलानि मधुराणि (सन्ति)? १७. सः अत्र अस्तु, त्वम् एधि, अहं च आसानि १८. स तत्र आसीत्, त्वम् असीः, अहं च आसम्। १९. स तत्र स्यात, त्वं तत्र स्याः, अहं च स्याम् । २०. सः अत्र भविष्यति, त्वम् अत्र भविष्यसि, अहं च भविष्यामि । २१. वयं क्षिप्रं स्नानार्थं गमिष्यामः ।

## ३ - संस्कृत भाषेत भाषांतर करा -

क) १. तो मुर्खावर रागावतो. २. तू चोरावर रागावतोस . ३. तो मनुष्य त्या चोरावर रागावतो. ४. मुर्ख सूज्ञ मनुष्याचा द्रोह करतो. ५. दुष्ट मनुष्य विद्वानाचा तिरस्कार करतो. ६. मुलगा वडिलांना सांगतो. ७. सेनापती राजाला निवेदन करतो. ८. मुनी विद्यार्थ्याला उपदेश करतात. ९. मी शिकण्यासाठी त्या शाळेत जातो. १०. तो जेवण्यासाठी घरी गेला. ११. तू अलंकारासाठी सोने नेतोस. १२. मुलगा दुधासाठी रडतो. १३. चार वर्ण आहेत – ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य आणि शूद्र. १४. ते लगेच शाळेत गेले.

ख) १. हे फळ गोड आहे. २. ते पुस्तक चांगले आहे. ३. कोणते कार्य चांगले आहे? ४. हे कार्य चांगले आहे. ५. जे कार्य चांगले आहे ते कार्य कर (कर=कुरु)

ग) १. तो तेथे असो. २. तू तेथे असावे. ३. मी येथे असावे. ४. तो कोठे होता? ५. तू कोठे होतास? ६. मी येथेच होतो. ७. तो येथे असावा. ८. तू येथे असावे. ९. मी सुद्धा येथे असावे. १०. तो तेथे असेल. ११. तू तेथे असशील. १२. मी सुद्धा असेल.

| ४. अशुद्ध वाक्य | शुद्ध वाक्य | नियम |
|---|---|---|
| मूर्खः प्राज्ञं द्रुह्यति । | मूर्खः प्राज्ञाय द्रुह्यति । | क्रुधद्रुहेर्ष्यासूयार्थानां ... । |
| सेनापतिः नृपं कथयति । | सेनापतिः नृपाय कथयति । | क्रियया यमभिप्रैति...। |
| स पुस्तकं सुन्दरः । | तत् पुस्तकं सुन्दरम् । | गुणवचनम् अविशिष्टलिङ्गम् । |

## ५. स्वाध्याय

अ = ३ ख मधील वाक्यांना द्विवचनामध्ये व बहुवचनामध्ये परिवर्तित करा.

आ = ३ ग मधील वाक्यांना द्विवचनामध्ये व बहुवचनामध्ये परिवर्तित करा.

इ = तत्, एतत्, यत् आणि किम् या सर्वनामांची नपुंसकलिंगी संपूर्ण रूपे लिहा.

ई = अस् धातुच्या लट्, लोट्, लङ्, विधिलिङ् आणि लृट् लकारांची संपूर्ण रूपे लिहा.

## ६. रिकाम्या जागी योग्य शब्द भरा.

१. सः ..... क्रुध्यति । २. मूर्ख.... ईर्ष्यति । ३. सः ..... कथयति । ४. भोजनार्थम् ....गच्छामि। ५. तानि पुष्पाणि...सन्ति ।

# एकोनविंशः पाठः

**नामानि** = **अश्वः** = घोडा **गजः** = हत्ती **रथः** = रथ **प्रासादः** = राजवाडा, हवेली
**शिखरः** = शिखर, पर्वताचा अग्रभाग **वृक्षः** = वृक्ष, झाड **सर्पः** = सर्प, साप,
**क्षेत्रपालकः**= शेताचा रक्षक **यवः** = जव (धान्य) **आसनम्** = आसन, बैठक,
**आकाशम्** = आकाश, गगन **तारकम्** = तारा, नक्षत्र **मित्रम्** = मित्र **क्षेत्रम्** = शेत

**क्रियापदानि** = **भ्वादिगण :** उद् +स्था (उत्तिष्ठ) = उठणे, उभे राहणे **आ + नी (आनय्)** = आणणे
**रुह् (रोह्)** = वाढणे **अव+रुह् (अवरोह्)** = उतरणे **पत्** = पडणे
**चुरादिगणे** = **वृ** (वार्) = हाकलणे, निवारण करणे, परावृत्त करणे

**अव्ययानि** = **अथवा** = किंवा, **वा** = अथवा , किंवा **अवश्यम्** = अवश्य, अवश्यक, जरुर

 **संकेत** = अश्वः ते यवः, देववत्, आसनम् ते क्षेत्रम् वनवत्

 **व्याकरण** (सर्वनाम – स्त्रीलिंग, कृ–धातु, अपादान कारक, पंचमी विभक्ती)

१. सर्व या सर्वनामाची स्त्रीलिंगी विभक्तीरूपे पाठ करा. पहा परिशिष्ठ शब्दरूपसंख्या **४३.**

२. **तत्**, सर्वनामाच्या स्त्रीलिंगी प्रथमा विभक्ती एकवचनामध्ये **सा** असे रूप होते. इतर विभक्तीरूपांमध्ये **'त'** होऊन त्याची स्त्रीलिंगी विभक्तीरूपे **'सर्व'** या सर्वनामाच्या स्त्रीलिंगी विभक्तीरूपांप्रमाणे होतात.

उदा. **सा, ते, ताः (प्रथमा) ताम्, ते, ताः (द्वितीया) एतत्**, सर्वनामाच्या स्त्रीलिंगी प्रथमा विभक्ती एकवचनामध्ये **एषा** असे रूप होते. इतर विभक्तीरूपांमध्ये 'एत' होऊन त्याची स्त्रीलिंगी विभक्तीरूपे **'सर्व'** या सर्वनामाच्या स्त्रीलिंगी विभक्तीरूपांप्रमाणे होतात.

उदा. **एषा, एते, एताः (प्रथमा) एताम्, एते, एताः (द्वितीया)**

**यत्** या सर्वनामाचा **य** होऊन त्याची स्त्रीलिंगी विभक्तीरूपांमध्ये **'सर्व'** या सर्वनामाच्या स्त्रीलिंगी विभक्तीरूपांप्रमाणे होतात.

उदा. **या, ये, याः (प्रथमा) याम्, ये, याः (द्वितीया)**

**किम्** या सवनामाचा **क** होऊन त्याची स्त्रीलिंगी वभक्तीरूपांमध्ये **'सर्व'** या सर्वनामाच्या स्त्रीलिंगी विभक्तीरूपांप्रमाणे होतात.

उदा. **का, के, काः (प्रथमा) काम्, के, काः (द्वितीया)** समजले नसल्यास पहा परिशिष्ट शब्दरूप संख्या **६६, ६९, ७२, ७५.** ४. **कृ**– धातुच्या लोट्, लङ्, लकारांची संपूर्ण रूपे पाठ करा. पहा परिशिष्ट धातुरूपसंख्या ४०.

५. लट् लकार प्रथम पुरुष एकवचनामध्ये **उद् + स्था** धातुचे **उत्तिष्ठति, आ+नी** धातुचे **आनयति, रुह्** धातुचे **रोहति, पत्** धातुचे **पतति**, **वृ** धातुचे **वारयति** असे रूप होते. या धातुंची राहिलेली **लट्** तसेच **लोट्, लङ्** व **विधिलिङ्** लकाराची संपूर्ण रूपे चालवा. ६. लृट्, लकार प्रथम पुरुष एकवचनामध्ये **उद्+स्था** धातुचे **उत्थास्यति, आ+नी** धातुचे **आनेष्यति, रुह्** धातुचे **रोक्ष्यति पत्** धातुचे **पतिष्यति** व **वृ** धातुचे **वारयिष्यति** असे रूप होते. या धातुंची राहिलेली लृट् लकाराची रूपे चालवा.

**ध्रुवमपायेऽपादानम्** = वियोग होणे अर्थात वेगळे होणे या अर्थाची क्रिया असल्यास जो पदार्थ स्थिर असतो त्यास (त्या कारकास) **अपादान** असे म्हणतात.

**अपादाने पंचमी** = अपादान कारकाची **पंचमी** विभक्ती होते.

उदा. **वृक्षात् पत्रं पतति** = झाडावरून पान पडते.

वरील वाक्यात वृक्ष (झाड) या स्थिर पदार्थापासून पानाचा वियोग होत आहे. त्यामुळे वृक्ष (वृक्ष शब्द) 'अपादान कारक' आहे. परिणामी त्याची पंचमी विभक्ती झालेली आहे.

याप्रमाणे **बालकः अश्वात् अपतत्** = मुलगा घोड्यावरून पडला.

**वारणार्थानामीप्सितः** = **वृ** = वारयति = या धातुचा किंवा या धातुच्या अर्थाप्रमाणे अर्थ असणाऱ्या इतर धातुंचा प्रयोग झाल्यास ज्या पदार्थापासून निवारण केले जाते त्याची पंचमी विभक्ती होते.

उदा. – **स क्षेत्रात् पशून् वारयति** = तो शेतातून पशूंना हाकलतो

**स मित्रं पापात् निवारयति** = तो मित्राला पापापासून परावृत्त करतो.

## संस्कृत वाक्यरचनेविषयी

स्पष्ट व बरोबर अर्थ समजण्यासाठी संस्कृत भाषेत शब्दांचा विशिष्ट क्रम (व्याकरणानुसार) अपेक्षित नसते. उदा. **'रामः ग्रामं गच्छति'** = या वाक्यातील पदांचा क्रम **'ग्रामं रामः गच्छति'** किंवा **'गच्छति ग्रामं रामः'** अथवा **'गच्छति रामः ग्रामम्'**= अशा कशाही प्रकारचा ठेवला तरी मूळ वाक्याचा अर्थ बदलत नाही किंवा मूळ अर्थ समजण्यास विशेष अडचण येत नाही. तरीही वाक्याचा अर्थ सुबोध रितीने आकलन व्हावा यासाठी नविनच संस्कृत शिकणाऱ्या पाठकांनी प्रथन कर्ता, त्यानंतर कर्म व शेवटी क्रियापद अशी वाक्यरचना ठेवावी. आणखी इतर कारक असल्यास त्याची अर्थानुसार कर्त्याच्या नंतर व क्रियापदाच्या अगोदर योजना करावी.

# एकोणिसावा पाठ

## १. उदाहरण वाक्ये

१. स अश्वात् पतति = तो घोड्यावरुन पडतो. २. तस्याः लतायाः एतानि पुष्पाणि पतन्ति = त्या वेलीवरून ही फूले पडतात. ३. सः आसनात् उतिष्ठति = तो आसनावरुन उठतो ४. जनकः कां कन्यां पृच्छति = वडील कोणत्या मुलीला विचारतात? ५. एतस्यै बालिकायै फलं यच्छ = ह्या मुलीला फळ दे. ६. स कार्यं करोतु = तो काम करो ७. स कार्यम् अकरोत् = त्याने काम केले ८. स तत्र अस्ति या न = तो तेथे आहे किंवा नाही?

## २. मराठी भाषेत भाषांतर करा.

१. प्रासादात् बालकः अपतत् । २. उपाध्यायः आसनात् उतिष्ठति । ३. गजाः शिखरात् पतन्ति । ४. स गृहात् पुस्तकम् आनयत् । ५. अजाः पर्वतात् अवरोहन्ति । ६. क्षेत्रपालकः यवेभ्यः पशून् वारयति । ७. रामः बालकं सर्पात् वारयति । ८. तस्याः लतायाः पुष्पाणि अपतन् । ९. एतां मालां पश्य । १०. जनकः तां कन्यां पृच्छति । ११. जनकः तस्यै बालिकायै फलानि यच्छति । १२. त्वं भोजनं करोषि अथवा पठसि? १४. सः अत्र कार्यं करोतु. त्वं करु, अहं च करवाणि १५. स तत् कार्यम् अकरोत्, त्वम् अकरोः अहं च अकरवम् । १३. त्वं विद्यालयं गच्छसि वा न? १४. वृक्षाः रोहन्ति । १५. वयमवरोहामः।

## ३ - संस्कृत भाषेत भाषांतर करा -

क) झाडावरुन पाने पडतात. २. तो मुलगा घोड्यावरुन पडला. ३. तो शेतातून घरी येतो. ४. ती मुलगी घरातून पुस्तके आणते. ५. आकाशातून तारे पडतात. ६. तो सेनापती रथावरुन पडला. ७. ती बकरी पर्वतावरुन उतरते. ८. तो आसनावरुन उठला. ९. तो मुलगा हवेलीवरुन पडला. १०. हा मुलगा शाळेतून घरी आला. ११. तो मित्राला पापापासून रोखतो. १२. त्या माळा सुंदर आहेत.

ख) १. ती माळा कुठे आहे? २. ती माळा आण.★ ३. ह्या मुलीला अलंकार दे. ४. हे फूल ह्या वेलीवरुन पडले. ५. जी मुलगी येथे आहे, तिला पुस्तके दे.

ग) १. हा मुलगा काम करतो. २. तो मुलगा अवश्य काम करो. ३. तू सुद्धा नेहमी काम कर. ४. नी काम करु? ५. त्याने काम केले. ६. तू काम केलस अथवा भोजन? ७. मी सुद्धा काम केले.

| ४. अशुद्ध वाक्य | शुद्ध वाक्य | नियम |
|---|---|---|
| वृक्षेण पत्राणि पतन्ति । | वृक्षात् पत्राणि पतन्ति । | अपादाने पंचमी । |
| एतां सुन्दरां कन्यां आभूषणं यच्छ । | एतस्यै सुन्दरायै कन्यायै आभूषणं यच्छ । | चतुर्थी संप्रदाने । |

## ५. स्वाध्याय

अ = ३ ख मधील वाक्यांना द्विवचनामध्ये व बहुवचनामध्ये परिवर्तित करा.

आ = ३ ग मधील वाक्यांना द्विवचनामध्ये व बहुवचनामध्ये परिवर्तित करा.

इ = कृ धातुच्या लट्, लोट् आणि लङ् लकाराची संपूर्ण रूपे लिहा.

ई = सर्व, तत्, एतत् आणि किम् या सर्वनामांची संपूर्ण स्त्रीलिंगी विभक्तीरूपे लिहा.

## ६. रिकाम्या जागी योग्य क्रियापद लिहा. (लट् लकार)

१. वृक्षात् पत्रम्.... । २. प्रासादात् बालकः.... । ३. स क्षेत्रात् पशून् .... । ४. एषा बालिका गृहात् पुस्तकम्.... । ५. अहं मित्रं पापात् ..... ।

★ अशा प्रकारच्या अज्ञार्थक वाक्यांमध्ये साधारणपणे मध्यम पुरुषी कर्ता असतो. उदा. तू ती माळा आण.

# विंशः पाठः

**नामानि** = स्वयम्भूः = स्वतः होणारा, ब्रह्मा, ब्रह्मदेव प्रतिभूः = जामीन तिल = तीळ माषः = उडिद वैद्यः = वैद्य, चिकित्सक तण्डुलः = तांदुळ रोगः = रोग, दुखणे, आजार गोधूमः = गहू गोदुग्धम् = गायीचे दूध महिषीदुग्धम् = म्हशीचे दूध बाल्यम् = बालपण

**सर्वनामानि** = अन्य = दुसरा, निराळा, इतर = दुसरा, वेगळा विश्व = सर्व

**क्रियापदानि** = भी = घाबरणे, भिणे त्रा = रक्षण करणे नी + ली = लपणे अधि+इ = शिकणे, अभ्यास करणे प्रति+दा= (प्रतियच्छ्) = बद्दल देणे, बदलणे

**अव्ययानि** = आरात्= जवळ, २. दूर ऋते = शिवाय बहिः = बाहेर प्रभृति = पासून (...उक्त वेळेपासून)

☞ **संकेत** = प्रतिभूः स्वयंभूवत्, अन्य ते विश्व सर्ववत्, प्रति+दा पठतिवत्

☞ **व्याकरण** (स्वयंभूः शब्द, कृ धातु, पंचमी विभक्ती)

१. स्वयम्भू शब्दाची संपूर्ण विभक्तीरूपे पाठ करा. पहा परिशिष्ट शब्दरूप संख्या ५. २. कृ धातुच्या विधिलिङ् व लट् लकाराची संपूर्ण रूपे पाठ करा. पहा परिशिष्ट धातुरूप संख्या ४०. ३. लट् लकार प्रथमपुरुष एकवचनामध्ये **भी** धातुचे **बिभेति, त्रा** धातुचे **त्रायते, नी+ली** धातुचे = **निलीयते, अधि+इ** धातुचे **अधीते** असे रूप होते. या धातुंच्या इतर रूपांचा विचार प्रसंगप्राप्त पुढे करण्यात येईल. ४. दा हा धातु भ्वादिगणातील असल्यामुळे लट् लकार प्रथम पुरुष एकवचनामध्ये **प्रति+दा** धातुचे **प्रतियच्छति** असे रूप होते व लृट् लकार प्रथमपुरुष एकवचनामध्ये **प्रतिदास्यति** असे रूप होते.

४. **भीत्रार्थाना भयहेतुः** = भीणे व रक्षण करणे या अर्थाच्या धातुंचा प्रयोग झाल्यास भीतीचे जे कारण असते त्याची पंचमी विभक्ती होते. (ज्याच्यापासून भीती होते त्याची पंचमी विभक्ती होते)

सः चोरात् बिभेति = तो चोराला घाबरतो, स चोरात् त्रायते = तो चोरापासून रक्षण करतो.

**अन्तर्धौ येनादर्शनमिच्छति** = लपणे या अर्थाच्या धातुचा प्रयोग झाल्यास ज्याच्यापासून लपले जाते त्याची पंचमी विभक्ती होते. उदा. – चोरः नृपात् निलीयते = चोर राजापासून लपतो.

.... **प्रतिदानेच यस्मात्** = ज्या पदार्थाच्या बदल्यात दिले जाते, त्याची पंचमी विभक्ती होते.

उदा. स तिलेभ्यः माषान् प्रतियच्छति = तो तिळाच्या बदल्यात उडीद देतो.

**अन्यारादितरर्ते** = अन्य, आरात् इतर आणि ऋते या शब्दांचा प्रयोग झाल्यास यांच्या संबंधीत शब्दाची पंचमी विभक्ती होते. उदा. – रामात् अन्यः * कः तत्र अस्ति = रामाशिवाय दुसरा कोण तेथे आहे.

स वृक्षात् आरात् आगच्छति = तो झाडाजवळून येतो. रामात् इतरः = रामाहून वेगळा.

ऋते ज्ञानात् न मोक्षः = ज्ञानात् ऋते मोक्षः न = ज्ञानाशिवाय मोक्ष नाही

**बहिःप्रभृतियोगे च** = बहिः आणि प्रभृति या अव्ययांचा प्रयोग झाल्यास यांच्या संबंधीत शब्दांची पंचमी विभक्ती होते. ग्रामात् बहिः पाठशाला अस्ति = गावाच्या बाहेर शाळा आहे.

स बाल्यात् प्रभृति★ अध्ययनं करोति = तो बालपणापासून अभ्यास करीतो.

**अख्यातोपयोगे च** = ज्याच्यापासून (नियमपूर्वक) अध्ययन केले जाते त्याची पंचमी विभक्ती होते.

उदा. – सः उपाध्यायात् अधीते पठति वा = तो शिक्षकांपासून शिकतो.

---

* अन्य शब्दाच्या अर्थासारखा अर्थ असणाऱ्या भिन्न, अतिरिक्त इत्यादी शब्दांबरोबरसुद्धा पंचमी विभक्ती होते. उदा. रामात् भिन्नः अतिरिक्तः वा कः अत्र अस्ति ।

★ 'प्रभृति' या अव्ययाच्या अर्थासारखा अर्थ असणाऱ्या इतर अव्ययांबरोबरसुद्धा पंचमी विभक्ती होते. उदा. – स बाल्यात् आरभ्य अध्ययनं करोति ।

# विसावा पाठ

## १. उदाहरण वाक्ये

स बालकः चोरात् बिभेति = तो मुलगा चोराला भितो / घाबरतो २. सः उपाध्यायात् विद्याम अधीते = तो गुरुंपासून विद्या शिकतो ३. स सेनापतेः निलीयते = तो सेनापत्यापासून लपतो. ४. स तिलेभ्यः माषान् प्रतियच्छति = तो तिळांच्या बदल्यात उडीद देतो (तो तिळांनी उडदांना बदलतो.) ५. सः एतत् कार्यं कुर्यात् = त्याने हे काम केले पाहिजे ६. सः एतत् कार्यं करिष्यति = तो हे काम करील

## २. मराठी भाषेत भाषांतर करा.

१. स बालकः दुर्जनात् बिभेति। २. स सर्पात् बिभेति । ३. नृपः बालकं चोरात् त्रायते । ४. सज्जनः तां बालिकां चोरात् त्रायते । ५. वैद्यः रोगेभ्यः त्रायते । ६. दुर्जनः नृपात् निलीयते । ७. स गो दुग्धात् महिषीदुग्धं प्रतियच्छति । ८. छात्रः गुरोः पठति । ९. रामात् अन्यः कः ग्रामं गच्छेत् । १०. स ग्रामात् आरात् आगच्छति । ११. रामात् इतर कः सत्यं वदेत् । १२. ऋते ज्ञानात् न मोक्षः । १३. ग्रामात् बहिः वृक्षाः सन्ति । १४. अद्य* प्रभृति अध्ययनं करिष्यामि । १५. स्वयंभूः सर्वान् रक्षति ।

## ३ - संस्कृत भाषेत भाषांतर करा -

**क)** १. तो विद्यार्थी शिक्षकांना घाबरतो. २. सज्जन मुलीचे चोरापूसन रक्षण करतो. ३. चोर सेनापत्यापासून लपतो. ४. तो मूर्ख गव्हाच्या बदल्यात तांदूळ देतो. ५. तो विद्यार्थी मुनींपासून विद्या शिकतो.

**ख)** १. रामाशिवाय दुसरा कोण येथे आहे. २. तो वडिलांजवळून आला. ३. ज्ञानाशिवाय सुख नाही. ४. गावाच्या बाहेर बगीचा आहे. ५. बालपणापासून अभ्यास करावा. ६. आजपासून अभ्यास करा.

**ग)** १. ब्रह्मा सर्वांना उत्पन्न करतो. २. तो जामीन खरे बोलतो. ३. जामीनाबरोबर सज्जन आहे. ४. ब्रह्मदेवाला नमस्कार. ५. तो ब्रह्मदेवाला नमस्कार करतो. ६. जामीनापासून ती विद्या शिक.

**घ)** १. त्याने काम करावे. २. तू सुद्धा काम करावे. ३. मी अभ्यास केला पाहिजे. ४. तो काम करील. ५. तू काम करशील. ६. मी तेथे स्नान करील.

| ४. अशुद्ध वाक्य | शुद्ध वाक्य | नियम |
|---|---|---|
| स शिष्यः गुरुं बिभेति । | स शिष्यः गुरोः बिभेति । | भीत्रार्थानां भयहेतुः । |
| स छात्रः मुनिं विद्यां पठति । | स छात्रः मुनेः विद्यां पठति । | आख्यातोपयोगे च । |
| स मूर्खः गोधूमैः तण्डुलान् प्रतियच्छति । | स मूर्खः गोधूमेभ्यः तण्डुलान् प्रतियच्छति। | ... प्रतिदाने च यस्मात् । |

## ५. स्वाध्याय

अ = ३ ग. मधील वाक्यांना द्विवचनामध्ये व बहुवचनामध्ये परिवर्तित करा.

आ = ३ घ. मधील वाक्यांना द्विवचनामध्ये व बहुवचनामध्ये परिवर्तित करा.

इ = स्वयंभू व प्रतिभू या शब्दांची संपूर्ण विभक्तीरूपे लिहा.

ई = कृ धातुच्या विधिलिङ् व लृट् लकाराची संपूर्ण रूपे लिहा.

## ६. योग्य शब्द वापरुन रिकाम्या जागा भरा.

१. छात्रः ... बिभोति । २. नृपः चोरात्.... । ३. सः .... अधीते ४. तिलेभ्यः माषान् ......। ५. नृपः ...... निलीयते ।

* प्रभृति या अव्ययाचा वापर कालवाचक अव्ययाबरोबर सुद्धा होतो.

# एकविंशः पाठः

**नामानि** = अङ्कुरः = अंकुर, कोंब लोकः = जग, जन गोमयः = शेण वृश्चिकः = विंचू
हिमालयः = हिमालय (पर्वत) श्रमः = प्रयत्न२. थकवा प्रजापतिः = प्रजापति, ब्रह्मदेव
बीजम् = बीज, बी प्रजा = प्रजा, रयत

**सर्वनाम** = युष्मद् = तू

**विशेषणानि** = गुरुः = श्रेष्ठ, मोठा गुरुतरः = त्यापेक्षा अधिक श्रेष्ठ, त्यापेक्षा अधिक मोठा पटुः = चतुर, हुशार पटुतरः = त्यापेक्षा अधिक चतुर दूरम् = दूर, लांब,
समीपम् = जवळ पार्श्वम् = जवळ, निकटम् = जवळ

**क्रियापदानि** = उद् + भू (उद्भव्) = उत्पन्न होणे, उगम पावणे, प्र+भू (प्रभव्) = उत्पन्न होणे, उगम पावणे
उद्+गम् (उद्गच्छ्) = उगम पावणे, उत्पन्न होणे जन् = उत्पन्न होणे

**अव्ययानि** = पृथक् = निराळा, वेगळा विना = शिवाय, खेरीज नाना = अनेक प्रकारे, निरनिराळे, शिवाय वाचून इव = सारखा चेत् = जर (तर) नोचेत् = नाहीतर

☞ **संकेत** = उद्+भू ते उद्+गम् पठतिवत्

☞ **व्याकरण** (युष्मद् सर्वनाम, पंचमी विभक्ती)

१. युष्मद् सर्वनामाची संपूर्ण विभक्ती रूपे पाठ करा. पहा परिशिष्ट शब्दरूपसंख्या ७६. २. 'जन्' हा दिवादिगणातील आत्मनेपदी धातु आहे. त्याचे प्रथम पुरुषी एकवचन, द्विवचन व बहुवचनाची रूपे अनेक्रमे **जयते, जायते** व **जायन्ते** अशी होतात. इतर रूपांचा विचार प्रसंगप्राप्त पुढील पाठांमध्ये करण्यात येईल.

**भुवः प्रभवः** = उत्पन्न होण्याच्या क्रियेमध्ये जे उत्पत्तीस्थान असते त्याची पंचमी विभक्ती होते.
उदा. = हिमालयात् गङ्गा प्रभाविति = हिमालयात गंगा उगम पावते.

**जनिकर्तुः प्रकृतिः** = उत्पन्न होण्याच्या क्रियेमध्ये जे मूळ कारण (उपादान कारण) त्याची पंचमी विभक्ती होते. बीजात् अङ्कुरः जायते = बीजापासून अंकूर उत्पन्न होतो.

**पञ्चमी विभक्तेः** = दोन वस्तु, व्यक्ति, पदार्थ इत्यादींमध्ये तुलना करतांना ज्यापेक्षा श्रेष्ठ किंवा कनिष्ठ अशा प्रकारचा भेद दर्शविला जातो, त्याची पंचमी विभक्ती होते.
उदा. = रामात् कृष्णः पटुतरः अस्ति = रामापेक्षा कृष्ण चतुर आहे.
धनात् ज्ञानं गुरुतरम् अस्ति = धनापेक्षा ज्ञान श्रेष्ठ आहे.

**पृथग्विनानाभिस्तृतीयान्यतरस्याम्** = पृथक्, विना आणि नाना या अव्ययांचा प्रयोग झाल्यास यांच्या संबंधीत शब्दांची पंचमी, तृतीया किंवा द्वितीया यापैकी कोणतीही एक विभक्ती होते.
स जनकात् पृथक् वसति – स जनकेन पृथक् वसति – स जनकं पृथक् वसति = तो वडिलांपासून वेगळा राहतो
श्रमात् विना न विद्या – श्रमेण विना न विद्या – श्रमं विना न विद्या = प्रयत्नाशिवाय विद्या नाही.
श्रमात् श्रमेण श्रमं वा नाना न विद्या = श्रमाशिवाय विद्या नाही

**दूरान्तिकार्थेभ्यो द्वितीया च** = दूर आणि जवळ या अर्थाच्या शब्दांची सप्तमी, पंचमी, तृतीया आणि द्वितीया यापैकी कोणतीही एक विभक्ती होते.

उदा. –ग्रामस्य दूरे – ग्रामस्य दूरात् – ग्रामस्य दूरेण – ग्रामस्य दूरम् = गावाच्या दूर
ग्रामस्य समीपे – ग्रामस्य ससमीपात् – ग्रामस्य समीपेन – ग्रामस्य समीपम् = गावाच्या जवळ (गावाजवळ)
ग्रामस्य निकटे, निकटात्, निकटेन, निकटं वा विद्यालयम् अस्ति = गावाच्या जवळ विद्यालय आहे. (गावाजवळ)
जनकस्य पार्श्वे, पार्श्वात्, पाश्वेन, पार्श्वम्, वा आगच्छामि = मी वडिलांजवळ येत आहे

# एकविसावा पाठ

## १. उदाहरण वाक्ये

**१. हिमालयात् गङ्गा उद् गच्छति** = हिमालयात गंगा उगम पावते. **२. बलरामात् कृष्णः पटुतरः** = बलरामापेक्षा कृष्ण अधिक चतुर आहे. **३. रामः कृष्णः इव पटुः अस्ति** = राम कृष्णासारखा चतुर आहे. **४. त्वं पठसि चेत् पठ नोचेत् इतः गच्छ** = तू शिकशील तर शिक नाहीतर येथून जा. **५. त्वां पश्यामि** = मी तुला पाहतो. **६. त्वया सह तत्र कः अस्ति** = तुझ्याबरोबर तेथे कोण आहे? **७. तुभ्यं किं रोचते** = तुला काय आवडते. **८. त्वत् रामः पटुतरः अस्ति** = तुझ्यापेक्षा राम अधिक चतुर आहे. **९. तव गृहं कुत्र अस्ति** = तुझे घर कोठे आहे?

## २. मराठी भाषेत भाषांतर करा.

१. बीजेभ्यः अङ्कुराः जायन्ते । २. गोमयात् वृश्चिकः जायते । ३. हिमालयात् गङ्गा प्रभवति । ४. दुर्जनात् सज्जनः गुरुतरः । ५. धनात् ज्ञानं गुरुतरम् । ६. धनात् विद्या गुरुतरा । ७. रामः कृष्णः इव पटुः गुरुःच अस्ति । ८. स जनकात् पृथक् न वसति । ९. श्रमं विना न धनम् । १०. जनकस्य समीपात् आगच्छामि । ११. ग्रामस्य समीपे विद्यालयः अस्ति । १२. त्वं तत्र किं करोषि? १३. अहं युष्मान् पश्यामि । १५. त्वया सह एषः कः अस्ति? १६. तुभ्यं फलं रोचते । १७. युष्मभ्यं किं रोचते? १८. तव गृहं तत्र अस्ति । १९. युष्माकं पुस्तकानि तत्र सन्ति । २०. कृषीवलः बीजानि वपति ।

## ३ - संस्कृत भाषेत भाषांतर करा -

**क)** १. प्रजापतिपासून प्रजा उत्पन्न होते. २. हिमालयात कोण उगम पावते? ३. देवदत्त यज्ञदत्तापेक्षा अधिक चतुर आहे. ४. असत्यापेक्षा सत्य श्रेष्ठ आहे. ५. रमापेक्षा उमा श्रेष्ठ आहे. ८. राम वडिलापेक्षा वेगळे बोलत नाही. ९. प्रयत्नाशिवाय विद्या नाही आणि विद्येशिवाय सुख नाही. १०. त्या गावाजवळ अरण्य आहे. ११. तू जेवण करशील तर कर नाहीतर जा. १२. तुम्ही थांबाल तर थांबा नाही तर लगेच जा.

**ख)** १. तू येथे आलास. २. मी तुला नेहमी पाहतो. ३. तुझ्या बरोबर तेथे कोण आहे? ४. तुझ्या बरोबर तेथे एक मुलगा आहे. ५. तुला फळ आवडते अथवा लाडू ? ६. तुला लाडू आवडतो. ७. तुझ्यापेक्षा कोण अधिक हुशार आहे? ८. त्याच्यापेक्षा कृष्ण अधिक हुशार आहे. ९. तुझे पुस्तक कोठे आहे? १०. त्याचे पुस्तक तेथे आहे.

| ४. अशुद्ध वाक्य | शुद्ध वाक्य | नियम |
|---|---|---|
| हिमालये गङ्गा प्रभवति । | हिमालयात् गङ्गा प्रभवति । | भुवः प्रभवः । |
| रमायाः उमा गुरुतरम् । | रमायाः उमा गुरुतरा । | गुणवचनम् अविशिष्टलिङ्गम् । |
| प्रजापतिः प्रजाः जायन्ते । | प्रजापतेः प्रजाः जायन्ते । | जनिकर्तुः प्रकृतिः । |

## ५. स्वाध्याय

अ = ३ ख. मधील वाक्यांना द्विवचनामध्ये व बहुवचनामध्ये परिवर्तित करा.

आ = युष्मद् सर्वनामाची संपूर्ण विभक्तीरूपे लिहा.

## ६. रूपे ओळखा

त्वम्, त्वया, युष्मासु, कुर्यात्, ते

# द्वाविंशः पाठः

नामानि = कालिदासः = कालिदास (एक कवी) स्थावरः = पर्वत, स्थिर राहणारा. अन्नम् = अन्न
कारणम् = कारण,उद्देश्य,निमित्त निमित्तम्=निमित्त, कारण, हेतु हेतुः=निमित्त, कारण, प्रयोजन

सर्वनाम = अस्मद् = मी

विशेषणानि = श्रेष्ठः= श्रेष्ठ श्रेष्ठतमः= सर्वात श्रेष्ठ पटुतमः = सर्वात चतुर

अव्ययानि = उत्तरतः = उत्तरेकडे दक्षिणतः = दक्षिणेकडे २. उजवीकडे पुरः = पुढे, समोर. २. पूर्वी
पुरस्तात् = पुढे, समोर. २. प्रथम उपरि = वर, वरती उपरिष्टात् = वरच्या दिशेने, वरतीकडे
अधः = खाली अधस्तात् = खालच्या दिशेने नीचैः = खाली पश्चात् = नंतर, पाठीमागून
अग्रे = आरंभी २. मागाहून अग्रतः = प्रारंभी, मागाहून समक्षम् = प्रत्यक्ष, नजरेसमोर
मध्ये = मध्ये, मध्यभागी अन्तरे = आत अन्तः = आत, मध्ये

**☞ व्याकरण (अस्मद् - सर्वनाम, षष्ठी विभक्ती)**

अस्मद् सर्वनामाची संपूर्ण विभक्तीरूपे पाठ करा. पहा परिशिष्ट शब्दरूपसंख्या ७७.

**षष्ठी शेषे** = कर्ता कर्म करण सम्प्रदान अपादान अधिकरण यापैकी कोणत्याही कारकाची प्राप्ती नसतांना दोन शब्दामध्ये परस्पर असलेले वेगवेगळ्या प्रकारचे संबंध व्यक्त करण्याकरीता षष्ठी विभक्तीचा प्रयोग करतात.

उदा. - कृष्णस्य गृहम् = कृष्णाचे घर पशोः पादः = प्राण्याचा पाय.

**षष्ठी हेतु प्रयोगे** = हेतु शब्दाचा प्रयोग झाल्यास हेतु शब्दाची व त्याच्या संबंधित शब्दाची षष्ठी विभक्ती होते.
उदा. सः अध्ययनस्य हेतोः वसति = तो अभ्यासाच्या निमित्ताने राहतो.

**निमित्तपर्यायप्रयोगे सर्वासां प्रायदर्शनम्** = निमित्त तसेच निमित्त असा अर्थ असणाऱ्या कारण, प्रयोजन इत्यादि शब्दांचा प्रयोग झाल्यास या शब्दाच्या सबंधित शब्दांच्या (तसेच या शब्दांच्या) जवळ जवळ सर्व विभक्त्या (पर्यायाने) होतात.

उदा. - स किं निमित्तम् पठति = तो कोणत्या निमित्ताने शिकतो
स केन निमित्तेन पठति = तो कोणत्या निमित्ताने शिकतो ?
स कस्मै निमित्ताय पठति = तो कोणत्या निमित्ताने शिकतो?

याप्रमाणे कस्मात् निमित्तात्, कस्मिन् नमित्ते, किं कारणम्, केन कारणेन, कस्मै कारणाय, कस्मै प्रयोजनाय, कस्मात् कारणात्, अध्ययनम् निमित्तम्, अध्ययने निमित्ते इत्यादी

**यतश्च निर्धारणम्** = एखाद्या वस्तु, व्यक्ति इत्यादींची विशिष्टता दाखवून, ज्या समुदायातून वस्तू, व्यक्ती वेगळी दर्शविली जाते त्याची (त्या समुदायवाचक शब्दाची) षष्ठी किंवा सप्तमी विभक्ती होते.
उदा. = छात्राणां रामः श्रेष्ठः = विद्यार्थ्यांमध्ये राम श्रेष्ठ आहे = छात्रेषु रामः श्रेष्ठ

**षष्ठ्यतसर्थप्रत्ययेन** = उपरि, उपरिष्ठात्, अधः, अधस्तात्, पुरः पुरस्तात्, पश्चात्, अग्रे, दक्षिणतः, उत्तरतः या शब्दांच्या संबंधित शब्दांची षष्ठी विभक्ती होते.
उदा. वृक्षस्य उपरि = झाडावर, वृक्षस्य उपरिष्टात् = झाडाच्या वरच्या दिशेने, वृक्षस्य अधः, अधस्तात्, पुरः, पुरस्तात्, नीचैः, पश्चात्, अग्रे, दक्षिणतः, उत्तरतः वा ।

**समक्षमध्येऽन्तरेऽन्तः** = समक्ष, मध्ये, अन्तरे व अन्तः या अव्ययांचा प्रयोग झाल्यास यांच्या संबंधित शब्दांची षष्ठी विभक्ती होते.

उदा. गृहस्य समक्षम् = घरासमोर गृहस्य मध्ये, अन्तरे, अन्तःवा = घरामध्ये

**युष्मदस्मत्समं त्रिषु** = युष्मद व अस्मद् सर्वनामाची रूपे तिन्ही लिंगामध्ये समान म्हणजे एकच असतात.
उदा. - त्वम् = तू, (पु.), तू (स्त्री.); युवाम् = तुम्ही दोघे / तुम्ही दोघी ; यूयम् = तुम्ही (पु.), तुम्ही (स्त्री.); त्वाम् = तुला (पु.), तुला (स्त्री); युवाम् = तुम्हा दोघांना / तुम्हा दोघींना; युष्मान् = तुम्हाला (पु.), तुम्हाला (स्त्री) या प्रामाणे अस्मद् सर्वनामाचेही जाणावे. उदा. - आवाम् = आम्ही दोघे/ आम्ही दोघी.

# बाविसावा पाठ

## १. उदाहरण वाक्ये

एतत् कृष्णस्य गृहम् अस्ति = हे कृष्णाचे घर आहे. २. स किं निमित्तं तत्र गच्छति = तो कोणत्या निमित्ताने तेथे जातो ३. स भोजनेन निमित्तेन तत्र गच्छति = तो जेवणाच्या निमित्ताने तेथे जातो = स भोजनस्य हेतोः तत्र गच्छति ५. छात्राणां रामः पटुः = विद्यार्थ्यांमध्ये राम चतुर आहे= छात्रेषु रामः पटुः ।

## २. मराठी भाषेत भाषांतर करा.

१. एतत् रामस्य पुस्तकमस्ति । २. भोजनस्य हेतोः आगच्छ । ३. कस्मात् कारणात् हससि ? ४. बालकः कस्मै प्रयोजनाय क्रन्दति? ५. शिष्याणां रामः श्रेष्ठः पटुतमः च अस्ति । ६. अहं स्थावराणां हिमालयः (अस्मि) । ७. ग्रामस्य पुरः, पुरस्तात् वा वनमस्ति । ८. विद्यालयस्य अग्रे अग्रतः वा उद्यानमस्ति । ९. ग्रामस्य उत्तरतः, दक्षिणतः वा वृक्षाः सन्ति । १०. वृक्षस्य अधः पर्णानि सन्ति । ११. वृक्षस्य अधस्तात् पर्णानि पतन्ति । १२. गृहस्य उपरि, पुरः च के सन्ति? १३. गृहस्य मध्ये बालकाः पठन्ति । १४. मां स्मर । १५. मया सह रामः अस्ति । १६. मह्यं मोदकं रोचते १७. मत् कः श्रेष्ठः अस्ति । १८. मम एतत् पुस्तकम् अस्ति । १९. अस्माभिः सह एष कः अस्ति । २०. अस्माकमुपाध्यायाः निपुणाः (सन्ति) ।

## ३ - संस्कृत भाषेत भाषांतर करा -

क) १. रामाचे पुस्तक कोठे आहे? २. रामाचे पुस्तक येथे आहे. ३. गंगेचे पाणी मधुर आहे. ४. ह्या झाडाची फळे पडतात. ५. हे सुशीलाचे घर आहे. ६. तो कोणत्या निमित्ताने गावाला जातो. ७. तू कोणत्या निमित्ताने शाळेत येत नाहीस? ८. कवीमध्ये कालिदास श्रेष्ठ आहे. ९. विद्यार्थ्यांमध्ये कृष्ण सर्वात श्रेष्ठ आणि चतुर आहे. १०. झाडाच्या वरच्या दिशेने माकड धावत आहे. ११. झाडाखाली कोण आहे? १२. हे लहान मूल वडिलांच्या नजरेसमोर खेळते. १३. घराच्या वर आणि समोर मुले आहेत. १४. घरामध्ये काय आहे? १५. घरामध्ये अन्न आहे. १६. हे त्या शेतकऱ्याचे शेत आहे.

ख) १. मी खेळतो. २. मला पहा. ३. माझ्याबरोबर कोण येईल? ४. मला फळ आवडते. ५. माझ्यापेक्षा राम अधिक श्रेष्ठ आहे. ६. हे माझे घर आहे.

| ४. अशुद्ध वाक्य | शुद्ध वाक्य | नियम |
|---|---|---|
| कवीन् कालिदासः श्रेष्ठः । | कवीनां कविषु वा कालिदासः श्रेष्ठः । | यतश्च निर्धारणम् । |
| एतं वृक्षं फलानि पतन्ति । | एतस्य वृक्षस्य फलानि पतन्ति । | षष्ठी शेषे । |
| एतं वृक्षं फलानि पतन्ति । | एतस्मात् वृक्षात् फलानि पतन्ति । | अपादाने पञ्चमी । |

## ५. स्वाध्याय

अ = ३ ख. मधील वाक्यांना द्विवचनामध्ये व बहुवचनामध्ये परिवर्तित करा.

आ = अस्मद् सर्वनामाची संपूर्ण विभक्तीरूपे लिहा.

## ६. रूपे ओळखा

वयम्, मम, अस्मत्, कव्योः उद्गच्छति.

## जोड्या जुळवा

| अ गट | ब गट |
|---|---|
| तव | प्रथमा विभक्ती बहुवचन |
| अस्मासु | तृतीया विभक्ती द्विवचन |
| युवाभ्याम् | पंचमी विभक्ती बहुवचन |
| वयम् | षष्ठी विभक्ती एकवचन |
| अस्मत् | सप्तमी विभक्ती बहुवचन |

# त्रयोविंशः पाठः

**नामानि** = कर्तृ = कर्ता, करणारा श्रोतृ = श्रोता, ऐकणारा गन्तृ = गन्ता जाणारा द्रष्टृ = द्रष्टा, पाहणारा द्वेष्टृ = द्वेष्टा, द्वेष करणारा धर्तृ = धर्ता, धारक, धारण करणारा नप्तृ = नातु नेतृ = नेता, नेणारा सवितृ = सूर्य दातृ = दाता, दान देणारा रक्षितृ = रक्षण करणारा हर्तृ = हरण करणारा अग्निः = अग्नि, विस्तव पाकः = पचन, परिपक्व दशा दानम् = दान गमनम् = जाणे भाषणम् = भाषण शयनम् = झोपणे, झोप भ्रमणम् = फिरणे आयुष्यम् = कल्याण, सुख भद्रम् = कल्याण, सुख कुशलम् = कल्याण, सुख

**क्रियापदे** = भ्वादिगण = ज्वल् = जळणे दह् = जाळणे

**अव्ययम्** = स्म = भूतकाळबोधक अव्यय

☞ **संकेत** = कर्तृ ते हर्तृ कर्तृवत्, ज्वल् व दह् पठतिवत्

☞ **व्याकरण** (कर्तृ शब्द, षष्ठी विभक्ती)

१. कर्तृ शब्दाची संपूर्ण विभक्तीरूपे पाठ करा. पहा परिशिष्ट शब्दरूपसंख्या ६.

२. श्रोतृ, गन्तृ इत्यादि ऋकारान्त पुलिंगी शब्द कर्तृ शब्दाप्रमाणे चालवा.

३. लृट्, लकार, प्रथम पुरुष एकवचनामध्ये ज्वल् धातुचे ज्वलिष्यति, दह् धातुचे धक्ष्यति असे रूप होते. या धातुंची लृट् लकाराची इतर रुपे चालवा.

४. धातुच्या लट् लकाराच्या (वर्तमानकाळी) रूपाबरोबर 'स्म' हे अव्यय जोडल्यास त्या वाक्याचा अर्थ भूतकाळ बोधक होतो

उदा. – स पठति स्म = तो शिकला, तो शिकत होता.

**कर्तृकर्मणोः कृति** = कृदन्त शब्दाच्या कर्त्याची आणि कर्माची षष्ठी विभक्ती हो ते. धातुंना तृ (तृच) ति (क्तिन्) अ (अच्) अ (घञ्) अन (ल्युट्) इत्यादि प्रत्यये लागून बनलेल्या शब्दांना 'कृदन्तं शब्द' म्हणतात.

उदा. – बालकस्य शयनम् = मुलाचे झोपणे पुस्तकस्य पठनम् = पुस्तकाचे वाचन

पुस्तकं पठति = पुस्तक वाचतो या वाक्याचे संस्कृत भाषेतील भाषान्तर पुढील प्रकारेही करतात.

पुस्तकस्य पठनं करोति = तो पुस्तकाचे वाचन करतो.

**अधीगर्थदयेशां कर्मणि** = स्मरणार्थक धातुंचा प्रयोग झाल्यास कर्म कारकाची षष्ठी विभक्ती होते.

स मातुः* स्मरति = तो आईचे (खेदपूर्वक) स्मरण करतो.

**दूरान्तिकार्थैः षठ्यन्यतरस्याम्** = दूर आणि जवळ या अर्थाच्या शब्दांचा प्रयोग झाल्यास यांच्या संबंधित शब्दाची पंचमी किंवा षष्ठी विभक्ती होते.

ग्रामात् दूरम्, समीपम्, पार्श्वम्, निकटम्, वा । ग्रामस्य दूरम्, समीपम्, पार्श्वम्, निकटम्, वा ।

**चतुर्थी चाशिष्यायुष्यमद्रभद्रकुशलसुखार्थहितैः** = आशीर्वाद सूचक आयुष्यम्, मद्रम्, भद्रम्, कुशलम्, सुखम्, अर्थः हितम्, शम्, पथ्यम् इत्यादि शब्दांचा प्रयोग झाल्यास यांच्या संबंधित शब्दाची षष्ठी किंवा चतुर्थी विभक्ती होते.

रामस्य भद्र भूयात् = रामाचे कल्याण होवो (भूयात = होवो). रामाय भद्रं भूयात् = रामाचे कल्याण होवो.

रामस्य रामाय वा आयुष्यम्, मद्रम्, भद्रम्, कुशलम्, सुखं वा, भूयात् ।

**समं त्रिषु क्रियापदम्** = संस्कृत भाषेत तिन्ही लिंगामध्ये क्रियापदाचे रूप सारखेच (एकच) असते.

उदा. – तो शिकतो, ती शिकते या प्रमाणे मराठी भाषेत पुल्लिंगामध्ये 'शिकतो' व स्त्रीलिंगामध्ये 'शिकते' असे क्रियापदाचे वेगवेगळे रूप आहे. संस्कृत भाषेमध्ये मात्र शिकतो व शिकते यासाठी पठति असे एकच रूप राहील.

**स पठति = तो शिकतो, सा पठति = ती शिकते**

* मातुः हे मातृ या ऋकारान्त स्त्रीलिंगी शब्दाची षष्ठी विभक्ती एकवचनन्त रुप आहे. पहा परिशिष्ट शब्दरूप संख्या – २३.

# तेविसावा पाठ

## १. उदाहरण वाक्ये

१. बालकस्य शयनं पश्य = मुलाचे झोपणे पहा. २. पुस्तकस्य पठनं मह्यं रोचते = पुस्तकाचे वाचन मला आवडते. ३. बालकः मातुः स्मरति = मुलगा आईचे (खेदपूर्वक) स्मरण करतो. ५. अहं ग्रामं गच्छामि स्म = मी गावाला गेलो / गेलो होतो.

## २. मराठी भाषेत भाषांतर करा.

१. शिशोः शयनं पश्य । २. धनस्य दाता तत्र गच्छति । ३. कार्यस्य कर्ता कुत्र अस्ति? ४. धनस्य दाता कुत्र गच्छति? ५. धनस्य हर्ता अत्र न अस्ति । ६. भाषणस्य श्रोता सत्यं वदति । ७. राज्यस्य रक्षिता राज्यं रक्षति. ८. सज्जनस्य द्वेष्टा कुत्र गच्छति? ९. विद्यालयस्य द्रष्टा भोजनस्य भोक्ता च एतस्मिन् नगरे स्तः । १०. ग्रामस्य गन्ता नराणां नेता धनस्य दाता च अत्र सन्ति । ११. कार्यस्य कर्तारम् अत्र आनय । १२. रक्षित्रा सह धर्ता अस्ति । १३. नप्ता श्रोतृभ्यः रक्षितृभ्यः च फलं यच्छति । १४. दातुः दानं कस्मै न रोचते ? १५. सविता दीव्यति स्म । १६. अग्निः ज्वलति । १७. अग्निः नगरं दहति स्म । १८. स गृहस्य अग्रे वसुधां खनति । १९. एते द्रष्टारं सत्यं वदन्ति. २०. रक्षितृन् पश्य ।

## ३ - संस्कृत भाषेत भाषांतर करा -

क) १. मुलाचे शिक्षण वडिलांना आवडते. २. अन्नाची परिपक्व दशा पहा. ३. पुस्तकाचे वाचन त्याला आवडते. ४. पुस्तकाचे वाचन चांगले आहे. ५. धनाचे दान सुद्धा चांगले आहे. ६. तो वडिलांच्या जवळून येथे आला. ७. फिरण्यासाठी घरापासून दूर जा. ८. तान्हे मूल आईचे (खेदपूर्वक) स्मरण करते. ९. माझ्याजवळ पुस्तके आहेत. १०. शिष्याचे कल्याण होवो. ११. ह्या श्रोत्यांना पहा.

ख) १. कार्याचा कर्ता तेथे आहे. २. पुस्तक हिरावणारा तिकडे जातो. ३. सत्याचा श्रोता सत्य बोलतो. ४. गावाला जाणारा गावाला जातो. ५. नेत्याबरोबर माणसे आहेत. ६. जेवण करणाऱ्याला फळे द्या. ७. धन देणाऱ्यापेक्षा ज्ञान देणारा श्रेष्ठ आहे. ८. ह्या दात्याचे दान चांगले आहे. ९. सूर्याचे तेज पहा.

ग) १. अग्नि जळतो. २. अग्नि झाडे जाळतो. ३. तो कोठे खनतो.

## ४. अशुद्ध वाक्य

| अशुद्ध वाक्य | शुद्ध वाक्य | नियम |
|---|---|---|
| पुत्रं पठनं जनकांय रोचते । | पुत्रस्य पठनं जनकाय रोचते । | कर्तृकर्मणोः कृति । |
| शिशुः मातरं स्मरति । | शिशुः मातुः स्मरति । | अधीगर्थदयेशां कर्मणि । |

## ५. स्वाध्याय

अ = ३ ख. मधील वाक्यांना बहुवचनामध्ये परिवर्तित करा.

आ = ३. ग मधील वाक्यांना लोट् , लङ्, विधिलिङ् आणि लृट् लकारांमध्ये परिवर्तित करा.

इ = ३. ग मधील वाक्यांना द्विवचनामध्ये व बहुवचनामध्ये परिवर्तित करा.

ई = ३. कर्तृ, श्रोतृ, धर्तृ, भोक्तृ, हर्तृ, या शब्दांची संपूर्ण विभक्तीरूपे लिहा.

उ = खन्, दह, ज्वल् ह्या धातुंच्या लोट्, लङ् व लृट् लकाराची संपूर्ण रूपे लिहा.

## ६. रूपे ओळखा

कर्तारम्, नेत्रा, रक्षितृभ्यः, हर्तारम्, धक्ष्यति

# चतुर्विंशः पाठः

**नामानि** = पितृ = वडिल भ्रातृ = भाऊ जामातृ = जावई देवृ = दीर प्रातःकालः = सकाळ
मध्याह्नः = दुपार सायंकालः = संध्याकाळ स्नेहः = प्रेम, प्रीति आदरः = आदर
अभिलाषः = इच्छा मृगः = हरिण, बाणः = बाण, शर मार्गः = रस्ता दिनम् = दिवस
वस्त्रम् = कापड, कपडा शिला = पाषाण, मोठा दगड निशा = रात्र

**क्रियापदानि** = भ्वादिगण = अभि+लष् = इच्छिणे, इच्छा करणे
दिवादिगण = स्निह् = प्रेम करणे
तुदादिगण = क्षिप् = फेकणे, टाकणे मुच् (मुञ्च्) = मुक्त करणे, सोडणे

**अव्ययानि** = प्रातः = सकाळी, सायम् = संध्याकाळी नक्तम् = रात्री अधिकम् = अधिक, जास्त

**संकेत** = पितृ ते देवृ पितृवत्

**व्याकरण** (पितृ शब्द, अधिकरण कारक, सप्तमी विभक्ती)

१. पितृ शब्दाची संपूर्ण विभक्तीरूपे पाठ करा. पहा परिशिष्ट शब्दरूप संख्या–७. २. भ्रातृ, जामातृ, देवृ इत्यादी काही ऋकारान्त पुल्लिंगी शब्द पितृ शब्दाप्रमाणे चालतात. ३. लट्, लकार, प्रथम पुरुष एकवचनामध्ये अभि+लष् धातुचे अभिलषति, क्षिप् धातुचे क्षिपति व मुच् धातुचे मुञ्चति असे रूप होते. या धातुंची राहिलेली लट् लकाराची तसेच लोट्, लङ् व विधिलिङ् या लकारांची रूपे चालवा. ४. लृट् लकार प्रथम पुरुष एकवचनामध्ये अभि+लष् धातुचे अभिलषिष्यति, स्निह् धातुचे स्नेहिष्यति, क्षिप् धातुचे क्षेप्स्यति व मुच् धातुचे मोक्ष्यति असे रूप होते. या धातुंची राहिलेली लृट् लकाराची रूपे चालवा.

**आधारोऽधिकरणम्** = क्रियेचा आधार असणाऱ्या कारकास 'अधिकरण' असे म्हणतात. अधिकरणाचे दोन प्रकार पुढील प्रमाणे.

१. स्थलाधिकरण = क्रिया ज्या ठिकाणी घडते ते 'स्थलाधिकरण'
उदा. रस्त्यावर मुले खेळतात. या वाक्यात 'रस्ता' हे स्थलाधिकरण आहे.

२. कालाधिकरण = क्रिया ज्या वेळी घडते ते 'कालाधिकरण'.
उदा. तो सकाळी पुस्तक वाचतो. या वाक्यात 'सकाळ' हे कालाधिकरण आहे.

**सप्तम्यधिकरणेच** = अधिकरण कारकाची सप्तमी विभक्ती होते.
उदा.– मार्गे बालकाः क्रीडन्ति = रस्त्यावर मुले खेळतात. स प्रातःकाले पुस्तकं पठति = तो सकाळी पुस्तक वाचतो.

**वैषयिक आधार सप्तमी** = १. स्निह् = 'प्रेम करणे' या धातुंचा किंवा या धातुपासून बनलेल्या कृदन्त 'स्नेह' शब्दाचा प्रयोग झाला असता ज्याच्यावर प्रेम केले जाते किंवा ज्याच्या विषयी प्रेम असते त्याची सप्तमी विभक्ती होते.
उदा. – जनकः पुत्रे स्निह्यति = वडिल मुलांवर प्रेम करतात. तस्य मयि स्नेहः अस्ति = त्याचे माझ्यावर प्रेम आहे.

२. अभि+लष् = 'इच्छिणे' या अर्थाच्या धातुंचा किंवा या धातु बनलेल्या कृदन्त अभिलाष शब्दाचा प्रयोग झाल्यास ज्याच्या विषयी इच्छा असते त्याची सप्तमी विभक्ती होते. उदा. स मोक्षे अभिलषति * = तो मोक्षाविषयी इच्छा करतो. तस्य मोक्षे अभिलाषः★ अस्ति = त्याची मोक्षाविषयी इच्छा आहे. (त्याला मोक्षाची इच्छा आहे.)

३. आदरसूचक शब्दांचा किंवा धातुंचा प्रयोग झाल्यास ज्याचा आदर असतो किंवा ज्याचा आदर केला जातो त्याची सप्तमी विभक्ती होते. उदा. मम गुरौ आदरः अस्ति = माझा गुरुंविषयी आदर आहे. (मला गुरुंबद्दल आदर आहे.)

लक्षात असू द्या : प्रातः सायम्, नक्तम् ही अव्यये असल्यामुळे यांची रूपे चालत नाहीत. प्रातःकाले च्या ऐवजी प्रातः, सायंकाले च्या ऐवजी सायम् निशायाम् च्या ऐवजी नक्तम् ह्या अव्ययांचा प्रयोग करतात.
उदा. – स प्रातःकाले पुस्तकं पठति = तो सकाळी पुस्तक वाचतो.=स प्रातः पुस्तकं पठति ।

**आधारसप्तमी** – १ – फेकणे, टाकणे, सोडणे या अर्थाच्या धातुंचा प्रयोग झाला असता ज्याच्यावर फेकले, टाकले, सोडले जाते त्याची सप्तमी विभक्ती होते. उदा. – मृगे बाणं क्षिपति मुञ्चति वा = तो हरणावर बाण टाकतो ।

* अशा प्रसंगी अभि+लष् धातुबरोबर काही वेळेला द्वितीया विभक्ति सुद्धा होते. उदा. – स मोक्षम् अभिलषति .

★ 'अभिलाष' असा अर्थ असणाऱ्या इच्छा वगैरे शब्दांबरोबरसुद्धा सप्तमी विभक्ती होते. उदा. तस्य मोक्षे इच्छा अस्ति.

# चोविसावा पाठ

## १. उदाहरण वाक्ये

१. स विद्यालये पठति = तो शाळेत शिकतो. २. गृहे वस्त्रम् अस्ति = घरात कपडा आहे. ३. पिता पुत्रे स्नेहं करोति = वडिल मुलावर प्रेम करतात. ४. स सायंकाले ईश्वरं नमति = तो संध्याकाळी देवाला नमस्कार करतो ५. बालकस्य मोक्षे अभिलाषः अस्ति = मुलाची मोक्षाविषयी इच्छा आहे.

## २. मराठी भाषेत भाषांतर करा.

१. गृहे बालकाः सन्ति । २. मार्गे नराः तिष्ठन्ति । ३. निशायां तारकानि दीव्यन्ति । ४. गृहे वस्त्राणि सन्ति । ५. वसुधायां गङ्गा यमुना च स्तः । ६. नगरे मनुष्याः सन्ति । ७. छात्राः विद्यालये पठन्ति । ८. स शत्रौ बाणं मुञ्चति । ९. प्रातःकाले सायंकाले च ईश्वरं नमत । १०. पिता पुत्रम् उपदिशति । ११. स पितरं पश्यति । १३. पित्रा सह भ्राता गच्छति । १४. पिता दुहित्रे फलं यच्छति । १५. तस्याः दीरः सज्जनः अस्ति । १६. तस्य पितरि आदरः अस्ति. १७. यूयं गुरौ स्निह्यथ । १८. अस्माकं मोक्षे इच्छा अस्ति ।

## ३ - संस्कृत भाषेत भाषांतर करा -

क) १. राम शाळेत शिकतो. २. ह्या शाळेत दहा मुले शिकतात. ३. घरात कपडे आणि पुस्तके आहेत. ४. माणसे गावात राहतात. ५. वडिल मोठ्या मुलावर प्रेम करतात. ६. सज्जन मोक्षाची इच्छा करतात. ७. त्यांची मोक्षाविषयी इच्छा आहे. ८. तो हरणावर बाण सोडतो. ९. तो मोठ्या दगडावर बसला. १०. राजा दुर्जनांवर बाण सोडतो. ११. सकाळी व संध्याकाळी गुरुंना नमस्कार करावा. १२. तो दिवसा अभ्यास करतो. १३. रात्री अधिक अभ्यास करु नये.

ख) १. वडिल सकाळी शेतात जातात. २. वडिलांना नमस्कार कर. ३. वडिलांबरोबर भाऊ सुद्धा आहे. ४. वडिलांना पाणी दे. ५. तो वडिलांकडेच विद्या शिकला. ६. हे वडिलांचे पुस्तक आहे. ७. त्याचे वडिलांवर प्रेम आहे. ८. त्या मुलीचा दीर सज्जन आहे.

| ४. अशुद्ध वाक्य | शुद्ध वाक्य | नियम |
|---|---|---|
| नृपः दुर्जनं बाणं क्षिपति । | नृपः दुर्जने बाणं क्षिपति । | आधारसप्तमी १ । |
| पित्रे सह भ्राता अपि अस्ति । | पित्रा सह भ्राता अपि अस्ति । | सहयुक्तेऽप्रधाने । |

## ५. स्वाध्याय

अ = ३ पितृ, जामातृ व देवृ या शब्दांची संपूर्ण विभक्तीरूपे लिहा.

आ = क्षिप्, मुञ्च् व अभि+लष् या धातुंच्या लङ् व विधिलङ् लकाराची संपूर्ण रूपे लिहा.

## ६. रूपे ओळखा

जामाता, पित्रे, देवृभ्यः, धक्ष्यामि, क्षेप्स्यावः

## ७. जोड्या लावा

| 'अ' गट | 'ब' गट |
|---|---|
| स | क्षिपन्ति |
| ते | मुञ्चामः |
| अहं | स्निह्यति |
| त्वम् | प्रतियच्छामि |
| वयम् | दहसि |

# पञ्चविंशः पाठः

**नामानि** = भूभृत् = राजा २. पहाड मरुत् = वायु, वारा, वायुदेव दिनकृत् = सूर्य विश्वासः = विश्वास
श्रद्धा = श्रद्धा निष्ठा = श्रद्धा, निष्ठा गीतम् = गाणे शास्त्रम् = शास्त्र

**विशेषणानि** = आसक्तः = आसक्त, अनुरक्त, लागलेला युक्तः = जुळलेला, तल्लीन, लागलेला
लग्नः = चिकटलेला, मग्न, लागलेला तत्परः = दक्ष, तयार चतुरः = हुशार, तीक्ष्ण बुद्धिचा
कुशलः = कुशल, प्रवीण निपुणः = चतुर, पारंगत गतः = गेलेला, गेला
आगतः = आलेला, आला कृतः = केलेला, केला

**क्रियापदानि** = भ्वादिगण = गै (गाय्) = गाणे, वर्णन करणे आ+ह्वे (आह्वय्) = बोलावणे, हाक मारणे
दिवादिगण = अस् = टाकणे अस्यन्

☞ **संकेत** = भूभृत् ते दिनकृत् भूभृत् प्रमाणे

☞ **व्याकरण** (भूभृत् शब्द, सप्तमी विभक्ती)

१. **भूभृत्** शब्दाची संपूर्ण विभक्तीरूपे पाठ करा. पहा परिशिष्ट शब्दरूपसंख्या ... २. **मरुत्, दिनकृत्** हे (त् कारान्त) शब्द **भूभृत्** शब्दाप्रमाणे चालवा. उदा. – मरत् मरुतौ मरुतः मरुतम् इत्यादी. ३. **लट्** लकार प्रथम पुरुष एकवचनामध्ये **गै** धातुचे **गायति, आ+ह्वे** धातुचे **आह्वयति** व **अस्** धातुचे **अस्यति** असे रूप होते. या धातुंची राहिलेली **लट्** लकाराची तसेच **लोट्, लङ्, विधिलिङ्** या लकाराची रूपे चालवा. ४. **लृट्** लकार प्रथम पुरुष एकवचनामध्ये **गै** धातुचे **गास्यति, आ+ह्वे** धातुचे **आह्वास्यति** व **अस्** धातुचे **असिष्यति** असे रूप होईल. या धातुंची राहिलेली **लृट्** लकाराची रूपे चालवा.

**आधारसप्तमी** = २ **'विश्वास'** असा अर्थ असणाऱ्या शब्दांचा किंवा विश्वास ठेवणे, विश्वास करणे या अर्थाच्या धातुंचा * प्रयोग झाल्यास ज्याच्यावर विश्वास असतो त्याची सप्तमी विभक्ती होते.

उदा. – **तस्य ईश्वरे विश्वासः अस्ति** = त्याचा देवावर विश्वास आहे.

३. **'श्रद्धा'** असा अर्थ असणाऱ्या शब्दांचा किंवा श्रद्धा करणे, श्रद्धा ठेवणे या अर्थाच्या धातुंचा★ प्रयोग झाल्यास ज्याच्यावर श्रद्धा असते त्याची सप्तमी विभक्ती होते.

**तस्य ईश्वरे श्रद्धा अस्ति** = त्याची देवावर श्रद्धा आहे **तस्य ईश्वरे निष्ठा अस्ति** = त्याची देवाववर श्रद्धा आहे.

**आयुक्तकुशलाभ्याम्..... साधुनिपुणाभ्याम्....** संलग्नार्थक (आसक्त, युक्त, लग्न, तत्पर इत्यादि) तसेच चतुरार्थक (कुशल, चतुर, निपुण, प्रवीण, दक्ष इ.) शब्दाचा प्रयोग झाल्यास यांच्या संबंधीत शब्दाची सप्तमी विभक्ती होते.

उदा. – **स कार्ये युक्तः** = तो कामत लागलेला आहे. **स कार्ये आसक्तः, लग्नः, तत्परः वा ।**
**स शास्त्रे निपुणः** = तो शास्त्रात पारंगत आहे. **स शास्त्रे चतुरः, कुशलः, प्रवीणः, दक्षः वा ।**

**यस्य च भावेन भावलक्षणम् ॥** = एका क्रियेनंतर दुसरी क्रिया होते तेव्हा पहिली क्रियाबोधक शब्दाची सप्तमी विभक्ती होते.

कर्तरि प्रयोगात कर्ता व कृदन्त (पहिली क्रियाबोधक शब्द) यांची सप्तमी विभक्ती होते.

**उदा. रामे वनं गते भरतः आगतः** = राम वनात गेल्यावर भरत आला.

कर्मणि प्रयोगात कर्म व कृदन्त (पहिली क्रियाबोधक शब्द) यांची सप्तमी विभक्ती होते.

उदा. – **मया कार्ये कृते गुरुः आगतः** = माझ्याकडून काम केले गेल्यावर गुरु आले.

☞ एखाद्याला संबोधन करताना संबोधन विभक्तीचा प्रयोग करतात. उदा. हे राम ! हे कृष्ण ! इत्यादी

* **सःईश्वरे विश्वसीति** = तो देवावर विश्वास करतो

★ **सःईश्वरे श्रद्दधति** = तो देवावर श्रद्धा ठेवतो.

श्रद्दधाति.

# पंचविसावा पाठ

## १. उदाहरण वाक्ये

१. बालकस्य ईश्वरे श्रद्धा अस्ति = मुलाची देवावर श्रद्धा आहे. २. तस्य प्राज्ञस्य ईश्वरे विश्वासः अस्ति = त्या सूज्ञ मनुष्याचा देवावर विश्वास आहे. ३. भृत्यः कार्ये लग्नः अस्ति = सेवक कामात लागलेला आहे. ४. भूभृत् प्रजासु स्निह्यति = राजा प्रजेवर प्रेम करतो. ५. स गीतं गायति = तो गीत गातो. ६. हे राम! त्वम् अत्र आगच्छ = हे रामा तू इकडे ये.

## २. मराठी भाषेत भाषांतर करा.

१. मम ईश्वरे विश्वासः अस्ति । २. कस्य ईश्वरे विश्वासः न अस्ति? ३. दुर्जनस्य ईश्वरे विश्वासः न अस्ति । ४. तस्य बालकस्य ईश्वरे श्रद्धा अस्ति । ५. सर्वेषाम् ईश्वरे श्रद्धा स्यात्. ६. एषः बालकः पठने लग्नः अस्ति । ७. स बालकः कार्ये आसक्तः अस्ति । ८. कः शास्त्रे निपुणः अस्ति? ९. रामः शास्त्रे निपुणः अस्ति । १०. मयि गृहे आगते जनकः आगतः । ११. रामे वनं गते सीता अपि गता । १२. तया पठने कृते भ्राता आगच्छत् । १३. अध्ययने कृते भजनं कुरु । १४. बालिका गीतं गायति । १५. भूभृत् सेनापतिम् आह्वयति । १६. एष भूभृत् मृगे बाणम् अस्यति । १७. दिनकृते नमः । १८. हे देवदत्त! अत्र आगच्छ ।

## ३ - संस्कृत भाषेत भाषांतर करा -

क) १. त्या मनुष्याचा देवावर विश्वास आहे. २. आमचा सुद्धा देवावर विश्वास आहे. ३. त्या मुलीची देवावर श्रद्धा आहे. ४. तो मनष्य कामात तल्लीन आहे. ५. कोण कामात कुशल आहे? ६. तो नेहमी अभ्यासात दक्ष असतो. ७. हा विद्यार्थी विद्येत प्रवीण आहे. ८. युधिष्ठिर वनात गेल्यावर अर्जून सुद्धा गेला. ९. मी घरी आल्यावर राम सुद्धा आला. १०. त्याच्याकडून जेवण केले गेल्यावर त्याचा मित्र आला.

ख) १. राजा जातो. २. सेनापति राजाला नमस्कार करतो. ३. राजाबरोबर कोण आहे? ४. राजाला फळे द्या. ५. राजापासून विद्या शिक. ६. हा राजाचा सेनापति आहे. ७. ह्या सेनापत्याला राजाविषयी आदर आहे. ८. वारा वाहतो. ९. सूर्य प्रकाशला. १०. तो वायुदेवाला नमस्कार करतो.

ग) १. रमा गाणे गाते. २. तो मला बोलावतो. ३. तो बाण टाकतो. ४. तू मला का बोलावले. ५. मी तुला जेवणासाठी बोलावले.

## ४. अशुद्ध वाक्य

| अशुद्ध वाक्य | शुद्ध वाक्य | नियम |
| --- | --- | --- |
| मम गृहे आगते रामः अपि आगतः । | मयि गृहं आगते रामः अपि आगतः । | यस्य च भावेन.... । |
| अस्माकम् ईश्वरं विश्वासः अस्ति । | अस्माकम् ईश्वरे विश्वासः अस्ति । | आधार सप्तमी २ । |

## ५. स्वाध्याय

अ = ३ ख. मधील वाक्यांना द्विवचनामध्ये व बहुवचनामध्ये परिवर्तित करा.

आ = ३ ग. मधील वाक्यांना द्विवचनामध्ये व बहुवचनामध्ये परिवर्तित करा.

इ = ३ ग. मधील वाक्यांना लोट्, विधिलिङ् व लृट् लकारामध्ये परिवर्तित करा.

ई = भूभृत्, मरुत् , दिनकृत् या शब्दांची संपूर्ण विभक्तीरूपे लिहा.

उ = गै, आ+ह्वे, अस् (दिवादि) ह्या धातुंच्या विधिलिङ् लकाराची संपूर्ण रूपे लिहा.

## ६. रूपे ओळखा

मरुता, दिनकृतः, भूभृत्सु, गायन्ति, आह्वयामि

# षड्विंशः पाठः

**नामानि** = भगवत् = भगवान, ईश्वर , देव, सर्वशक्तिमान भाग्यवत् = सुदैवी भवत् = आपण, महाराज धनवत् = धनवान, श्रीमन्त बलवत् = बलवान्, शक्तिसंपन्न बुद्धिमत् = बुद्धिमान, हुशार श्रीमत् = श्रीमन्त, भरभराटीचा

**क्रियापदानि** = भ्वादिगण आत्मनेपद = सेव् = सेवा करणे, वन्द् = नमणे, वन्दन करणे, नमस्कार करणे मुद् (मोद्) = आनंदित होणे, हर्ष वाटणे त्रप् = लाजणे याच् = मागणे, भिक्षा मागणे, याचना करणे शिक्ष् = शिकणे कम्प् = कम्पित होणे,हालणे, थरारणे वृध् (वर्ध्) = वाढणे, लभ् = मिळविणे सह् = सहन करणे

**अव्ययानि** = इयत्=एवढा,इतका यावत्=जेवढा,जितका,जोपर्यन्त तावत्=तेवढा, तितका,तोपर्यन्त कियत् = केवढा, किती

☞ **संकेत** = भगवत् ते श्रीमत् भगवत् प्रमाणे, सेव् ते सह सेवतेवत्

☞ **व्याकरण** (भगवत् शब्द, लट्-आत्मनेपद दीघादेश संधी, द्वितीया विभक्ती)

१. भगवत् शब्दाची संपूर्ण विभक्तीरूपे पाठ करा. पहा परिशिष्ट शब्दरूपसंख्या-१०.

२. भाग्यवत्, भवत् इत्यादी वत् प्रत्ययान्त किंवा बुद्धिमत्, श्रीमत् इत्यादी मत् प्रत्ययान्त शब्द भगवत् शब्दाप्रमाणे चालतील. उदा.- भाग्यवान्, भाग्यवन्तौ, भाग्यन्तः इत्यादी.

पाठक बन्धुंनो ! आतापर्यन्त आपण परस्मैपदी धातु व परस्मैपदी धातुंच्या लट्, लोट्, लङ्, विधिलिङ् व लृट् या लकारांबद्दल बरेचकाही शिकलो आहोत. ह्या पाठापासून आपल्याला आत्मनेपदी धातुंच्याही लट्, लोट्, लङ्, विधिलिङ् व लृट् लकारांचा अभ्यास करायचा आहे. त्यापैकी प्रस्तुत पाठामध्ये शिकू या--आत्मनेपदी लट् लकार

| सेव-लट् = आत्मनेपद-वर्तमानकाळ = सेवा करणे | | | | लट् - परस्मैपद संक्षिप्त प्रत्यये | | |
|---|---|---|---|---|---|---|
| पुरुष | एकवचन | द्विवचन | बहुवचन | एकवचन | द्विवचन | बहुवचन |
| प्रथम पुरुष | सेव्+अते= **सेवते** सेवा करतो | सेव्+ एते = **सेवेते** दोघे सेवा करतात | सेव्+ अन्ते = **सेवन्ते** (सर्व) सेवा करतात | अते | एते | अन्ते |
| मध्यम पुरुष | सेव्+असे = **सेवसे** तू सेवा करतोस | सेव्+ एथे = **सेवेथे** तुम्ही दोघे सेवा करतात | सेव् + अध्वे = **सेवध्वे** तुम्ही सेवा करतात | असे | एथे | अध्वे |
| उत्तम पुरुष | सेव्+ए= **सेवे** मी सेवा करतो | सेव्+आवहे = **सेवावहे** आम्ही दोघे सेवा करतो. | सेव्+आमहे = **सेवामहे** आम्ही सेवा करतो | ए | आवहे | आमहे |

भ्वादिगणातील सर्व आत्मनेपदी धातुंच्या लट् लकाराची रूपे सेव् धातुच्या लट् लकाराच्या रूपाप्रमाणे चालतात. लट् लकार प्रथमपुरुष एकवचनामध्ये वन्द् धातुचे वन्दते, मुद् धातुचे मोदते, त्रप् धातुचे त्रपते, याच्* धातुचे याचते, शिक्ष् धातुचे शिक्षते, कम्प् धातुचे कम्पते, वृध् धातुचे वर्धते, लभ् धातुचे लभते व सह् धातुचे सहते असे रूप होते. या धातुंची राहिलेली लट् लकाराची रूपे सेव् धातुप्रमाणे चालवा.

४. नवव्या, दहाव्या, तेराव्या व चौदाव्या पाठामध्ये दिलेल्या द्वितीया विभक्तीच्या नियमांचा पुन्हा अभ्यास करा.

**५. द्विकर्मक धातु** = प्रच्छ्, याच् इत्यादी काही सकर्मक धातुंचा प्रयोग झाल्यास कधी-कधी दोन कर्मे प्रयोग केले जातात. अशा धातुंना 'द्विकर्म धातु' असे म्हणतात. उदा. स गुरुं पृच्छति = तो गुरुंना विचारतो - या वाक्यात 'गुरु' कर्म आहे. स प्रश्नं पृच्छति = तो प्रश्न विचारतो - या वाक्यात 'प्रश्न' कर्म आहे. स गुरुं प्रश्नं पृच्छति = तो गुरुंना प्रश्न विचारतो - या वाक्यात 'गुरु' व 'प्रश्न' हे दोन्ही कर्म आहेत. म्हणून प्रच्छ् हा धातु 'द्विकर्मक धातु' आहे.

**संधी-अकः सवर्णे दीर्घः** = (१) अ किंवा आ यांच्यापुढे अ किंवा आ आल्यास त्या दोहोबद्दल 'आ' होतो. उदा. तत्र+अस्ति = तत्रास्ति । तव+आसनम् = तवासनम् । माला + अस्य = मालास्य । सीता+आगता = सीतागता (२) इ किंवा ई यांच्या पुढे इ किंवा ई आल्यास त्या दोहोंबद्दल 'ई' होतो. उदा. - पठामि+इदानीम् = पठामीदानीम् । गिरि+ईशः = गिरीशः । दासी+इच्छति=दासीच्छति । पार्वती+ईशः=पार्वतीशः
(३) उ किंवा ऊ यांच्या पुढे उ किंवा ऊ आल्यास त्या दोहोंबद्दल 'ऊ' होतो उदा. साधु+उपदेशः= साधूपदेशः । लघु+ऊर्णा=लघूर्णा । भू+उध्दारः=भूध्दारः । वधू+ऊहा=वधूहा (४) ऋ किंवा ॠ यांच्यापुढे ऋ किंवा ॠ आल्यास त्या दोहोंबद्दल 'ॠ' होतो. उदा. पितृ+ऋण=पितॄण वरीलप्रमाणे होणाऱ्या संधीस 'दीर्घादेश संधी' असे म्हणतात.

*'याच्' हा धातु उभयपदी आहे. त्यामुळे त्याची परस्मैपदी रूपे सुद्धा बनतात. उदा. याचति, याचतु, अयाचत, याचेत्, याचिष्यति.

# सव्विसावा पाठ

## १. उदाहरण वाक्ये

१. स जनकं सेवते = तो वडिलांची सेवा करतो. २. धनवान् भगवन्तं वन्दते = धनवान् भगवन्ताला नमस्कार करतो. ३. बलवता सह धनवान् अस्ति = बलवानाबरोबर धनवान आहे. स कियत् धनम् इच्छति = तो किती धन इच्छितो? ५. यावत् गुरुः अत्रास्ति तावत् अत्र तिष्ठ = यावत् गुरुः अत्र अस्ति तावत् अत्र तिष्ठ = जोपर्यन्त गुरु येथे आहेत तोपर्यन्त येथे थांबा.

## २. मराठी भाषेत भाषांतर करा.

१. बलवान् कुत्रास्ति? २. बुद्धिमान् गुरुं सेवते । ३. बुद्धिमन्तः बलवन्तः धनवन्तः च एतस्मिन् नगरे सन्ति । ४. सज्जनः दुःख सहते. ५. धनवान् धनं लभते । ६. त्वं सुखेन वर्धसे. ७. अहं विद्यया मोदे । ८. ते कुत्र शिक्षन्ते? ९. युवामीश्वरं वन्देथे । १०. वयं तत्र शिक्षामहे । ११. कन्या त्रपते. १२. वृक्षाः कम्पन्ते । १३. त्वं किं शिक्षसे? १४. स श्रीमन्तं धनं याचते। १५. यावत् इच्छासि तावत् पठ । १६. वन्दे मातरम् ।*

## ३ - संस्कृत भाषेत भाषांतर करा -

क) १. बुद्धिमान येथे राहतो. २. बलवानाला पहा. ३. भाग्यवान् इकडे येत आहे. ४. भाग्यवान सज्जनांची सेवा करतो. ४. तो गुरुजींना वन्दन करतो आणि ज्ञान मिळवितो. ५. आपण आनन्दित होतात. ५. धनवानाबरोबर बलवान जातो. ७. भगवन्ताला नमस्कार. ८. त्या बुद्धिमानापासून विद्या शिक. ९. हे त्या भाग्यवानाचे घर आहे. १०. त्याचा भगवन्तावर विश्वास आहे. ११. तो धनवानाला धन मागतो. १२. जेवढे इच्छितोस तेवढे खा. १३. तू किती धन इच्छितोस? १४. मी एवढे धन इच्छितो. १५. जोपर्यन्त गुरु सांगत नाहीत तो पर्यत येथून जाऊं नको.

ख) १. श्रीमंताच्या दोन्हीकडे सेवक आहेत. २. बुद्धिमानाच्या चहुकडे विद्यार्थी आहेत. ३. भाग्यवान वनात जातो. ४. धनवान् व बुद्धिमान यांच्यामध्ये बलवान् आहे. ५. गुरुशिवाय ज्ञान होत नाही.

ग) १. तो गुरुंची सेवा करतो. २. मी वडिलांची सेवा करतो. ३. तो वडिलांना वन्दन करतो. तू सुद्धा वडिलांना वन्दन करतोस. ४. तो आनंदित होतो. ५. मी आनंदित होतो. ६. तो नेहमी लाजतो. ७. तू सुद्धा लाजतोस. ८. तो राजाला धन मागतो. ९. तो शिकतो (शिक्ष्) १०. वृक्ष हालतो. ११. मी धन मिळवितो. १२. तू वाढतोस. १३. तो नेहमी दुःख सहन करतो.

## ४.

| अशुद्ध वाक्य | शुद्ध वाक्य | नियम |
|---|---|---|
| स धनवत् धनं याचते । | स धनवन्तं धनं याचते । | कर्मणि द्वितीया (द्विकर्मक धातु) |
| बुद्धिमतः परितः छात्रा सन्ति । | बुद्धिमन्तं परितः छात्राः सन्ति । | अभितःपरितः ..... । |
| धनवति बुद्धिमति च अन्तरा बलवान् अस्ति । | धनवन्तं बुद्धिमन्तं च अन्तरा बलवान् अस्ति। | अनन्तरान्तरेण युक्ते । |

## ५. स्वाध्याय

अ = ३ क. मधील वाक्यांना बहुवचनामध्ये परिवर्तित करा.

आ = ३ ग. मधील वाक्यांना द्विवचनामध्ये व बहुवचनामध्ये परिवर्तित करा.

इ = भगवत्, धनवत्, बुद्धिमत्, श्रीमत् या शब्दांची संपूर्ण विभक्तीरूपे लिहा.

ई = सेव्, वन्द्, मुद्, त्रप्, याच्, शिक्ष्, कम्प्, वर्ध्, लभ्, सह् या धातुंच्या लट् लकाराची संपूर्ण रूपे लिहा.

**६. संधी करा - मम+अपि । विद्या+आलयः । यदि+इच्छा । श्री+ईशः । भानु+उदयः । पितृ+ऋगम्**

**७. संधी विच्छेद करा - नास्ति ।★ यतीन्द्रः । शत्रूपदेशः । भातृणम्**

*मातरम् हे मातृ ह्या ऋकारान्त स्त्रीलिंगी शब्दाचे द्वितीया विभक्ती एकवचनान्त रूप आहे. पहा परिशिष्ट शब्दरूप संख्या-२३

★ उदा. नास्ति = न+अस्ति - याप्रमाणे इतर संधीयुक्त शब्दांचा विच्छेद करा.

# सप्तविंशः पाठः

**नामानि** = **योगिन्** = योगी, साधु, जोगी **दण्डिन्** = संन्यासी, दण्डधारी २. यम
**मन्त्रिन्** = मन्त्री, प्रधान २. मान्त्रिक **शूलिन्** = महादेव २. ससा
**विद्यार्थिन्** = विद्यार्थी, शिष्य **पक्षिन्**= पक्षी २. बाण **ज्ञानिन्** = ज्ञानी, २. ज्योतिषी
**धनिन्** = धनी, धनवान मनुष्य **स्वामिन्** = स्वामी, मालक, पती **त्यागिन्** = त्यागी
**वचनम्** = वाक्य, उच्चार

**क्रियापदानि** = भ्वादिगण आत्मनेपद = **ईक्ष्** = पाहणे **वृत्(वर्त्)**=असणे **भाष्**=बोलणे,सांगणे,संभाषण करणे
**रम्** = रमणे, रममाण होणे २. खेळणे **डी (डय्)** = उडणे **ध्वंस्** = नष्ट होणे
**कूर्द्** = उडी मारणे २. खेळणे **यत्** = प्रयत्न करणे

**अव्ययानि** = **सकृत्** = एकदा, एकेकाळी, एकाच वेळी **असकृत्** = अनेकदा, **प्रतिदिनम्**= दररोज

☞ **संकेत** = योगिन् ते त्यागिन् योगिन् प्रमाणे, ईक्ष् ते यत् सेवतेवत्

☞ **व्याकरण** (योगिन् शब्द, लोट्-आत्मनेपद, गुणादेश-संधी, तृतीया विभक्ती)

१. योगिन् शब्दाची संपूर्ण विभक्तीरूपे पाठ करा. पहा परिशिष्ट शब्दरूपसंख्या-१२.

२. दण्डिन्, मन्त्रिन्, इत्यादी इन्नन्त पुल्लिंग शब्द योगिन शब्दाप्रमाणे चालवा. प्रसंगविशेषी 'न्' चा 'ण्' होईल. उदा. मन्त्रिणा

| सेव-लोट् = आत्मनेपद-आज्ञार्थ = सेवा करो | | | | लोट् - परस्मैपद संक्षिप्त प्रत्यये | | |
|---|---|---|---|---|---|---|
| पुरुष | एकवचन | द्विवचन | बहुवचन | एकवचन | द्विवचन | बहुवचन |
| प्रथम पुरुष | सेव्+अताम्=**सेवताम्** सेवा करो | सेव्+ एताम्= **सेवेताम्** दोघे सेवा करोत | सेव्+ अन्ताम्=**सेवन्ताम्** (सर्व) सेवा करोत | अताम् | एताम् | अन्ताम् |
| मध्यम पुरुष | सेव्+अस्व= **सेवस्व** तू सेवा कर | सेव्+ एथाम् = **सेवेथाम्** तुम्ही दोघे सेवा करा | सेव्+अध्वम् = **सेवध्वम्** तुम्ही सेवा करा | अस्व | एथाम् | अध्वम् |
| उत्तम पुरुष | सेव्+ऐ= **सेवै** मी सेवा करु | सेव्+आवहै = **सेवावहै** आम्ही दोघे सेवा करू. | सेव्+आमहै = **सेवामहै** आम्ही सेवा करु | ऐ | आवहै | आमहै |

याप्रमाणे आत्मनेपदी लोट् लकाराची संक्षप्त प्रत्यये लागून भ्वादिगणातील इतर आत्मनेपदी धातुंच्या लोट् लकाराच्या प्रथम पुरुष एकवचनाची रूपे पुढील प्रमाणे. वन्द् = वन्दताम्, ईक्ष् = ईक्षताम्, मुद् = मोदताम्, त्रप्=त्रपताम्, याच्=याचताम्, शिक्ष्=शिक्षताम्, कम्प्=कम्पताम्, वृध्=वर्धताम्, लभ्=लभताम्, सह्=सहताम्, वृत्=वर्तताम्, भाष्=भाषताम्, रम्=रमताम्, डी=डयताम्, यत्=यतताम् या धातुंची राहिलेली लोट लकारांची रूपे चालवा. वरील धातुंची राहिलेली लोट् लकाराची रूपे चालवा.

४. पंधराव्या व सोळाव्या पाठात दिलेल्या तृतीया विभक्तीच्या नियमांचा पुन्हा अभ्यास करा.

**अदेङ् गुणः** = अ, ए, ओ यांना पाणिनीय व्याकरण शास्त्रात 'गुण' असे म्हणतात
अ चा गुण अ, इ किंवा ई चा गुण ए ,उ किंवा ऊ चा गुण ओ, ऋ किंवा ॠ चा गुण अर् व ऌ चा गुण अल् होतो.

**संधी-आद् गुण : (१)** अ किंवा आ ह्या स्वरांपुढे इ किंवा ई आल्यास मागील व पुढील दोन्ही स्वरांबद्दल **'ए'** होतो.
उदा. तव+इच्छा = तवेच्छा । ज्ञान+ईश्वरः=ज्ञानेश्वरः । वसुधा + इच्छति = वसुधेच्छति । रमा+ईशः = रमेशः

**(२)** अ किंवा आ ह्या स्वरांपुढे उ किंवा ऊ आल्यास मागील व पुढील दोन्ही स्वरांबद्दल **'ओ'** होतो.
उदा. सूर्य+उदयः=सूर्योदयः । नव+ऊढा = नवोढा । महा + उत्सवः = महोत्सवः गङ्गा+ऊर्मयः=गङ्गोर्मयः।

**(३)** अ किंवा आ ह्या स्वरांपुढे ऋ किंवा ॠ आल्यास मागील व पुढील दोन्ही स्वरांबद्दल **'अर्'** होतो.
उदा. - देव+ऋषिः = देवर्षिः । महा+ऋषिः = महर्षिः ।

**(४)** अ किंवा आ ह्या स्वरांपुढे ऌ आल्यास मागील व पुढील दोन्ही स्वरांबद्दल 'अल्' होतो.
उदा. - तव+ऌकारः = तवल्कारः

वरीलप्रमाणे होणाऱ्या संधीस 'गुणादेश संधी' असे म्हणतात.

# सत्ताविसावा पाठ

## १. उदाहरण वाक्ये

१. पक्षी आकाशे डयते = पक्षी आकाशात उडतो. २. विद्यार्थी योगिनं वन्दते = विद्यार्थी योग्याला नमस्कार करतो. ३. धनी योगिना सह गच्छति = धनवान् मनुष्य योग्याबरोबर जातो. ४. स गुरुं सेवताम् = तो गुरुंची सेवा करो. ५. स प्रतिदिनं विद्यां शिक्षताम् = तो दररोज विद्या शिको.

## २. मराठी भाषेत भाषांतर करा.

१. योगी कुत्र गच्छति? २. विद्यार्थिनः, ज्ञानिनः, धनिनः, चात्र सन्ति । ३. स विद्यार्थी योगिनं सेवते । ४. स शूलिनं वन्दते । ५. पक्षिणः आकाशे डयन्ते । ६. स मन्त्री धनं लभते । ७. स विद्यार्थी धनिनं धनं याचते । ८. त्यागी वने वसति । ९. योगिना सह विद्यार्थिनः सन्ति । १०. योगिने भोजनं यच्छ । ११. योगिनः विद्यां पठ । १२. ज्ञानी वचनं भाषताम् । १३. त्वं गुरुं वन्दस्व, ज्ञानं लभस्व च । १४. स पुत्रमीक्षताम् , यतताम्, रमतां च । १५. सः अत्र वर्तताम् । १६. एतत् गृहं ध्वंसताम् । १७. योगी सकृत् भोजनं करोति । १८. एष धनी असकृत् भोजनं करोति । १९. तत्रेक्षस्व । २०. सदेश्वरं वन्दामहे ।

## ३ - संस्कृत भाषेत भाषांतर करा -

**क)** १. योगी इकडे येत आहे. २. ह्या पक्ष्यांना पहा. ३. मन्त्री कोठे जातो? ४. हा विद्यार्थी योग्याची आणि ज्ञान्यांची सेवा करतो. ५. हे विद्यार्थी उड्या मारतात. ६. योगी दुःख सहन करतो. ७. मन्त्री धन प्राप्त करतो. ८. त्यागी आनन्दित होतो. ९. योग्याबरोबर त्यागी आहे. १०. योग्याला फळे द्या. ११. योग्यापासून शास्त्र शिक. १२. धनवानाचे घर कोठे आहे? १३. त्यांची योग्यावर श्रद्धा आहे.

**ख)** १. तो धनवान् मनुष्य काठीने चालतो. २. ह्या ज्ञान्याबरोबर त्यागी आहे. ३. तो बलवान् डोळ्याने काणा आहे. ४. हा विद्यार्थी स्वभावाने सरळ आहे. ५. हा धनवान ज्ञानाने रहित आहे. ६. मूर्ख विद्यार्थ्यापासून काय लाभ? ७. भाषण पुरे (भाषण करु नका) ८. तुम्ही वडिलांची सेवा करा.

**ग)** १. तो मुलगा आकाशाला पाहो. २. तो वडिलांची सेवा करो. ३. तो धन मिळवो. ४. तो गुरुंना नमस्कार करो. ५. तो खरे बोलो. ६. तू कामात रम. ७. पक्षी आकाशात उडो. ८. घर नष्ट होवो. ९. तू उडी मार. १०. मी प्रयत्न करु.

**घ)** १. ते दोघे प्रयत्न करोत. २. तुम्ही दोघे प्रयत्न करा. ३. तीं घरे नष्ट होवोत. ४. आम्ही संन्याशाला पाहू. ५. आम्ही दोघे आज सेवा करु. ६. तुम्ही उड्या मारु नका.

| ४. अशुद्ध वाक्य | शुद्ध वाक्य | नियम |
|---|---|---|
| एतान् पक्ष्यान् पश्य । | एतान् पक्षिणः पश्य । | शब्दरूप । |
| त्वं कार्ये रम । | त्वं कार्ये रमस्व । | धातुरूप । |
| अलं भाषणस्य । | अलं भाषणेन । | ऊनवारणप्रयोजनार्थे च । |

## ५. स्वाध्याय

अ = ३ ग. मधील वाक्यांना एकवचनामध्ये व द्विवचनामध्ये परिवर्तित करा.

आ = ३ ग. मधील वाक्यांना लट् लकारामध्ये परिवर्तित करा.

इ = दण्डिन्, मन्त्रिन्, त्यागिन्, शूलिन् या शब्दाची संपूर्ण विभक्तीरूपे लिहा.

ई = सेव्, सह्, याच्, ईक्ष्, रम्, कूर्द, यत् या धातुंच्या लोट् लकाराची रूपे लिहा.

**६. रूपे ओळखा** - ज्ञानिनम्, विद्यार्थी, वचनम्, वर्तताम्, ईक्षे

**७. संधी करा** - चन्द्र+उदयः । सुर+ईशः । गङ्गा+उदकम् । महा+ऋषिः ।

**८. संधी विच्छेद करा** - परमेश्वरः । ज्ञानोदयः । देवर्षिः । तवल्कारः ।

# अष्टाविंशः पाठः

**नामानि** = राजन् = राजा तक्षन् = सुतार, देवाचा कारागिर मूर्धन् = शिर, डोके, मस्तक धर्मः = धर्म
कपिः = वानर, मर्कट आज्ञा = आज्ञा, हुकूम

**विशेषणानि** = स्वकीयः = स्वतःचा, आपला परकीयः = दुसऱ्याचा, परका त्वदीयः = तुझा मदीयः = माझा

**क्रियापदानि** = भ्वादिगण आत्मनेपद = आ+लम्ब् = आलम्ब् = आधार घेणे, आश्रय घेणे, लोंबणे
परा+अय् = पलाय् = पळणे, पळून जाणे
दिवादिगण आत्मनेपद = युध् = युध्द करणे, लढने जन् (जा) = उत्पन्न होणे
चुरादिगण * = पाल् = पालन करणे

**अव्ययानि** = अन्यथा = निराळ्या रीतीने, नाहीतर, एरवी शीघ्रम् = लवकर, वेगाने सहसा = अचानक, एकाएकी, अविचाराने
ह्यः = काल परह्यः = परवा (गेलेला दिवस) श्वः = उद्या परश्वः = परवा (येणारा दिवस)

☞ **संकेत** = राजन् ते मूर्धन् राजन् प्रमाणे आ+लम्ब् ते परा+अय् सेवतेवत्

☞ **व्याकरण** (राजन् शब्द, लङ्– आत्मनेपद, वृद्ध्यादेश संधी, चतुर्थी विभक्ती)

१. राजन् शब्दाची संपूर्ण विभक्तीरूपे पाठ करा. पहा परिशिष्ट शब्दरूपसंख्या १५. २. तक्षन् व मूर्धन् हे शब्द राजन् शब्दाप्रमाणे चालतील. ज्या विभक्तींमध्ये राजन् शब्दाचे राज्ञः असे रूप होते, त्या विभक्तीरुपांमध्यें तक्षन् शब्दाचे तक्ष्णः व मूर्धन् शब्दाचे मूर्ध्नः असे रूप होईल. सप्तमी विभक्ती एकवचनामध्ये तक्षन् शब्दाचे तक्षणि व तक्ष्णि तसेच मुर्धन् शब्दाचे मूर्धनि व मूर्ध्नि असे रूप होईल. ३. युध् व जन् हे धातू दिवादिगणातील आहेत. लट्, लोट्, लङ् व विधिलिङ् या लकारांची प्रत्यये लागतांना दिवादिगणातील धातुंना 'य' व चुरादिगणातील धातुंना 'अय्' लागतो हे चौथ्या व पाचव्या पाठात सांगितलेले आहेच. लट् लकार प्रथमपुरुष एकवचनामध्ये युध् धातुचे युध्यते व जन् धातुचे जायते असे रूप होईल. लोट् लकार प्रथम पुरुष एकवचनामध्ये युध् धातुचे (युध्+य्+अताम्=) युध्यताम्= व जन् धातुचे जायताम् असे रूप होईल. युध् व जन् धातुंची राहिलेली लट्, व लोट् या लकारांची रूपे चालवा.

| सेव–लङ्★ = आत्मनेपद–अनद्यतन भूतकाळ = सेवा केली | | | | लङ्–आत्मनेपद संक्षिप्त प्रत्यये | | |
|---|---|---|---|---|---|---|
| पुरुष | एकवचन | द्विवचन | बहुवचन | एकवचन | द्विवचन | बहुवचन |
| प्रथम | अ+सेव्+अत=असेवत<br>सेवा केली | अ+सेव्+एताम्=असेवेताम्<br>दोघांनी सेवा केली | अ+सेव्+अन्त=असेवन्त<br>सेवा केली | अत | एताम् | अन्त |
| मध्यम | अ+सेव्+अथाः=असेवथाः<br>तू सेवा केलीस | अ+सेव्+एथाम्=असेवेथाम्<br>तुम्ही दोघांनी सेवा केली | अ+सेव्+अध्वम्=असेवध्वम्<br>तुम्ही सेवा केली | अथाः | एथाम् | अध्वम् |
| उत्तम | अ+सेव्+ए=असेवे<br>मी सेवा केली | अ+सेव्+आवहि=असेवावहि<br>आम्ही दोघांनी सेवा केली | अ+सेव्+आमहि=असेवामहि<br>आम्ही सेवा केली. | ए | आवहि | आमहि |

याप्रमाणे आत्मनेपदी लङ् लकाराची संक्षिप्त प्रत्यये लागून इतर धातुंची आत्मनेपदी लङ् लकार प्रथमपुरुष एकवचनामध्ये होणारी रूपे पुढीलप्रमाणे – वन्द् = अवन्दत, मुद् = अमोदत, याच्= अयाचत त्रप् = अत्रपत, शिक्ष् = अशिक्षत, कम्प्=अकम्पत, लभ्=अलभत, सह्=असहत, वृत्=अवर्तत, भाष्=अभाषत, रम्=अरमत, डी=अडयत, यत्=अयतत, ईक्ष् ✿=ऐक्षत, आ+लम्ब्=आलम्बत, परा+अय् =परा+अयत=पलायत , युध्=अयुध्यत, जन्=अजायत, पाल्=अपालयत
वरील धातुंची राहिलेली लङ् लकाराची रूपे चालवा.

६. सतराव्या व आठराव्या पाठात दिलेल्या चतुर्थी विभक्तीच्या नियमांचा पुन्हा अभ्यास करा.

**वृद्धिरादैच्** = आ, ऐ, औ यांना पाणिनीय व्याकरण शास्त्रात 'वृद्धि' असे म्हणतात
अ ची वृध्दि 'आ', इ किंवा ई ची वृद्धि 'ऐ' उ किंवा ऊ ची वृद्धि ''औ' ऋ किंवा ॠ ची वृद्धि 'आर्' व ऌ ची वृद्धि 'आल्' होते.

**संधी वृद्धिरेचि** (१) अ किंवा आ ह्या स्वरांपुढे ए किंवा ऐ आल्यास मागील व पुढील दोन्ही स्वराबद्दल 'ऐ' होतो. उदा. तव+एव = तवैव। तव+ऐश्वर्यम्=तवैश्वर्यम् । सदा+एव = सदैव । यथा+ऐश्वर्यम्=यथैश्वर्यम् ।
(२) अ किंवा आ ह्या स्वरांपुढे ओ किंवा औ आल्यास मागील व पुढील दोन्ही स्वरांबद्दल 'औ' होतो.
उदा. मधुर+ओदनः = मधुरौदनः । तव+औदार्यम् =तवौदार्यम् । गङ्गा+ओघः=गंङ्गौघः । दिव्या+औषधिः=दिव्यौषधि (३) काही थोड्या शब्दात अ ह्या स्वरापुढे ऋ आल्यास मागील व पुढील दोन्ही स्वरबद्दल 'अर्' होतो. प्र+ऋणम्=प्रार्णम् । सुख+ऋतः=सुखार्तः । कम्बल+ऋणम्=कम्बलार्णम् । वसन+ऋणम् = वसनार्णम् ।
वरीलप्रमाणे होणाऱ्या संधीस 'वृध्द्यादेश संधी' असे म्हणतात.

* साधारणपणे चुरादिगणातील धातु उभयपदी म्हणजे परस्मैपदी व आत्मनेपदी असतात. उदा. पालयति प.प., पालयते आ.प.

★ लङ् लकाराची प्रत्यये लागतांना व्यंजनादि धातुंच्या अगोदर 'अ' व स्वरादि धातुंच्या अगोदर 'आ' लागतो हे चौदाव्या पाठात सांगितलेले आहेच.

✿ चौदाव्या पाठात इच्छ् चे जसे ऐच्छ् होते तसे 'ईक्ष्' चे 'ऐक्ष्' होईल. आ+ईक्ष्+अत=ऐक्ष्+अत=ऐक्षत

# अठ्ठाविसावा पाठ

## १. उदाहरण वाक्ये

१. राजा कुत्र गच्छति = राजा कोठे जातो? २. राजानम् आलम्बस्व = राजाचा आश्रय घे. ३. तस्य मुर्ध्नि फलम् अपतत् = त्याच्या डोक्यावर फळ पडले. ४. एष तस्य स्वकीयः अश्वः अस्ति = हा त्याचा स्वतःचा घोडा आहे. ५. स गुरुम् असेवत विद्यां चालभत = त्याने गुरुंची सेवा केली आणि विद्या मिळविली.

## २. मराठी भाषेत भाषांतर करा.

१. राजा राज्यं करोति । २. राजानम् ईक्षस्व । ३. राजा सह मन्त्री वर्तते । ४. राज्ञः विद्यां पठ । ५. राज्ञः आज्ञा पालय अन्यथा स कोपिष्यति । ६. बालकस्य मूर्ध्नि फलमपतत् । ७. तक्षा किं करोति । ८. स्वकीयं वस्त्रमानय । ९. परकीयमश्वं नानय । १०. मदीयः भ्राता तत्र अस्ति । ११. त्वदीया भार्या ग्रामं गच्छति । १२. स ह्यः अगच्छत् श्व आगमिष्यति च । १३. स परह्यः नगरमगच्छत् । १४. परश्वः आगमिष्यामि । १५. स गुरुम्, अेसवत, अवर्धत, अमोदत च. १६. त्वं दुःखम् असहथाः, पक्षिणः ऐक्षथा;च । १७. अहं धर्मम् आलम्बे । १८. वयं सत्यम् अभाषामहि ।

## ३ - संस्कृत भाषेत भाषांतर करा -

क) १. राजा येत आहे. २. राजाला नमस्कार कर. ३. राजाबरोबर सेनापति आहे.
४. राजाला धन द्या. ५. ह्या राजाकडे विद्या शिक. ६. राजाचे राज्य वाढो.
७. ह्या सेनापत्याचे, राजावर प्रेम आहे. ८. सुतार इकडे येत आहे. ९. गुरुंच्या डोक्यावर फुले पडोत.

ख) १. तो राजाचा आश्रय घेतो. २. वानर झाडाचा आश्रय घेवो. ३. तो अचानक युद्ध करतो.
४. लवकर इकडे ये नाहीतर तेथेच थांब. ५. स्वतःचे पुस्तक वाच. ६. दुसऱ्याची पुस्तके ने.
७. तू पळू नकोस. ८. राम परवा गेला आणि उद्या येईल. ९. त्याने ही पुस्तके काल वाचली.
१०. तू तेथे कसा गेलास? ११. आम्ही दोघे खरे बोललो. १०. तुम्ही आज्ञा पालन केली.

ग) १. राजाला जेवण द्या. २. ह्या सुताराल फळे आवडतात. ३. राजाला नमस्कार.
४. राजाला लाडू आवडतात. ५. सुतारापासून विद्या शिक. ६. हा राजाचा राजवाडा आहे.

घ) १. तो पळाला. २. तो धन मिळविता झाला. ३. त्याने धन मिळविले.
४. तू वडिलांना नमस्कार केलास (वन्द्) ५. मी प्रयत्न केला. ६. मी आज्ञा पालन केली.
७. तो खरे बोलला (भाष्) ८. त्याने युद्ध केले.

| ४. अशुद्ध वाक्य | शुद्ध वाक्य | नियम |
|---|---|---|
| राजाम् वन्द । | राजानम् वन्दस्व । | शब्दरूप व धातुरूप । |
| राजानं भोजनं यच्छ । | राज्ञे भोजनं यच्छ । | चतुर्थी सम्प्रदाने । |

## ५. स्वाध्याय

अ = ३ क ख ग घ मधील वाक्यांना द्विवचनामध्ये व बहुवचनामध्ये परिवर्तित करा.

आ = राजन्, तक्षन्, व मूर्धन् या शब्दांची संपूर्ण विभक्तीरूपे लिहा.

इ = सेव्, वृध्, लभ्, वन्द्, सह्, युध्, पालय्, परा+अय् या धातुच्या लङ् लकाराची रूपे लिहा.

**६. संधी करा -** माला + एव । मम+ऐश्वर्यम् । भव+औषधिः । रमा+औदार्यम् ।

**७. संधी विच्छेद करा -** तवैव । प्रजैश्वर्यम् । तस्यौदार्यम् । वनौषधिः ।

# एकोनत्रिंशः पाठः

ानि = अजः = बोकड २. जन्मरहित उष्ट्रः = उंट वृषभः = बैल कुक्कुरः = कुत्रा माहिषः = रेडा
षण्डः = सांड २. नपुंसक बिडालः= मांजर, बोका गर्दभः = गाढव मूषकः = उंदीर मेषः = मेंढा

ेषणानि = गच्छत् = जाणारा पठत् = शिकणारा कुर्वत् = करणारा लिखत् = लिहिणारा धावत् = धावणारा

ापदानि = भ्वादिगण परस्मैपद = भुक्ष = भुंकणे
तुदादिगण आत्मनेपद = मृ (म्रिय् )= मरणे विद् (विन्द) = मिळविणे

ययानि = अति = फार, अत्यंत ऋतम् = सत्य यत् = की, कारण की एकत्र = एकत्र, एके ठिकाणी

☞ **संकेत** = अजः ते मेषः देववत्, गच्छत् ते धावत् गच्छत् प्रमाणे

☞ **व्याकरण** (गच्छत् शब्द, विधिलिङ् - आत्मनेपद यण् - संधी, पंचमी विभक्ती)

च्छत् शब्दाची संपूर्ण विभक्तीरूपे पाठ करा. पहा परिशिष्ट शब्दरूपसंख्या ११७७.
थमा विभक्ती एक वचन बाजूला सोडले तर गच्छत् शब्द भगवत् शब्दाप्रमाणे चालतो. गच्छत् शब्दाचे प्रथमा
े एकवचना मधे गच्छन् असे रूप होते. पठत्, कुर्वत् इत्यादि शब्द गच्छत् शब्दाप्रमाणे चालवा.
च्छत्, पठत् इत्यादि शब्द वर्तमान कालवाचक धातुसाधित विशेषणे* आहेत.
काळातील क्रिया व्यक्त करण्यासाठी काही विद्वज्जन सुध्दा अशाप्रकारच्या वर्तमानकालवाचक धातुसाधित
गाचा उपयोग करतात. अशा प्रसंगी त्यांच्या बरोबर 'अस्' धातुचे यथायोग्य रूप वापरतात. **उदा.** स
् अस्ति = तो जात आहे. स गच्छन् आसीत् = तो जात होता स गच्छन् भविष्यति = तो जात असेल.
ठन् आसीत् = राम शिकत होता.
् लकार प्रथम पुरुष एकवचनामध्ये मृ धातुचे म्रियते व विद् धातुचे विन्दते असे रूप होते.
वेद् धातुंची राहिलेली लट् लकाराची तसेच लोट् व लङ् लकारांची रूपे चालवा.

| व-विधिलिङ् = आत्मनेपद-विध्यर्थ = सेवा करावी / केली पाहिजे | | | | विधिलिङ्- आत्मनेपद संक्षिप्त प्रत्यये | | |
|---|---|---|---|---|---|---|
| | एकवचन | द्विवचन | बहुवचन | एकवचन | द्विवचन | बहुवचन |
| | सेव्+एत= सेवेत<br>सेवा करावी | सेव्+एयाताम्= सेवेयाताम्<br>दोघांनी सेवा करावी. | सेव्+ एरन्= सेवेरन्<br>सर्वांनी सेवा करावी | एत | एयाताम् | एरन् |
| । | सेव्+एथाः= सेवेथाः<br>तू सेवा करावी | सेव्+एयाथाम्= सेवेयाथाम्<br>तुम्ही दोघांनी सेवा करावी | सेव् + एध्वम्= सेवेध्वम्<br>तुम्ही सेवा करावी. | एथाः | एयाथाम् | एध्वम् |
| । | सेव्+एय= सेवेय<br>मी सेवा करावी | सेव्+एवहि = सेवेवहि<br>आम्ही दोघांनी सेवा करावी. | सेव्+एमहि = सेवेमहि<br>आम्ही सेवा करावी. | एय | एवहि | एमहि |

ी आत्मनेपदी विधिलिङ् लकाराची संक्षिप्त प्रत्यये लागून इतर धातुंची आत्मनेपदी विधिलिङ् लकाराची रूपे
. आत्मनेपदी विधिलिङ् लकाराच्या प्रथम पुरुष एकवचनामध्ये होणारी काही धातुंची रूपे पुढील प्रमाणे.
वन्देत, मुद् = मोदेत, याच् = याचेत, त्रप् = त्रपेत शिक्ष् = शिक्षेत, कम्प् = कम्पेत, लभ् = लभेत,
सहेत, वृत्=वर्तेत, भाष् = भाषेत, मृ = म्रियेत, युध् = युध्येत, विद् = विन्देत या धातुंची राहिलेली
ङ् लकारांची रूपे चालवा (पूर्ण करा)
ावविसाव्या व विसाव्या पाठात दिलेल्या पंचमी विभक्तीच्या नियमांचा पुन्हा अभ्यास करा.
श = ऱ्हस्व किंवा दीर्घ इ उ ऋ ऌ यांच्या जागी अनुक्रमे य् व् र् ल् होतात. यास यणादेश असे म्हणतात.
**इको यणचि (१)** इ किंवा ई यांच्यापुढे इ किंवा ई यांच्या व्यतिरिक्त कोणताही स्वर आल्यास इ
बद्दल 'य्' होतो. उदा. प्रीति+अर्थम् = प्रीत्यर्थम् । नदी+अम्बु = नद्यम्बु । पठति+एव= पठत्येव ।
। किंवा ऊ यांच्या पुढे उ किंवा ऊ यांच्या व्यतिरिक्त कोणताही स्वर आल्यास उ किंवा ऊ बद्दल 'व्' होतो.
ठतु+अत्र = पठत्वत्र । मधु+अरिः = मध्वरिः । चमू+ऐक्यम् = चम्वैक्यम् ।
ऋ किंवा ॠ यांच्या पुढे ऋ किंवा ॠ यांच्याव्यतिरिक्त कोणताही स्वर आल्यास ऋ किंवा ॠ बद्दल 'र्' होतो.
- पितृ+आ=पित्रा । धातृ+अंशः= धात्रंशः । मातृ+अर्थम् = मात्रर्थम्
ऌ ह्या स्वरापुढे ऌ ह्या स्वराव्यतिरिक्त कोणताही स्वर आल्यास ऌ बद्दल 'ल्' होतो.
- ऌ+आकृतिः = लाकृतिः
माणे होणाऱ्या संधीस 'यणादेश संधी' असे म्हणतात.

नकालवाचक धातुसाधित विशेषणे कशी बनतात याचा विचार चौतीसाव्या पाठात केलेला आहे.



१. उदा
१. सः प
पश्य = उ
छात्राय पु
घोड्यावरु
अभाषत र
फार दूर र
२. मरा
१.
वृ
धा
क
क्षे
"
३ - सं
क) १.
धा
क
अ
१
ख) १
क
ग) १
स
पा
४. अशु
निशायां
स बालव
५. स्वा
अ = ३
आ = ग
इ = सेव
६. रूपे
७. संध
८. संध

# एकोणतिसावा पाठ

## १. उदाहरण वाक्ये

१. सः पठन् अस्ति = तो शिकत आहे. २. बालकः गच्छन् अस्ति = मुलगा जात आहे. ३. गच्छन्तं बालकं पश्य = जाणाऱ्या मुलाला पहा. ४. पठता बालकेन सह रामः वर्तते = शिकणाऱ्या मुलाबरोबर राम आहे. ५. पठते छात्राय पुस्तकं यच्छ = शिकणाऱ्या मुलाला पुस्तक दे. ६. गच्छतः अश्वात् बालकः अपतत् = जाणाऱ्या घोड्यावरुन मुलगा पडला. ७. स गुरुं सेवेत, ज्ञानं विन्देत च = तो गुरुची सेवा करो आणि ज्ञान मिळवो. ९. सः अभाषत यत्, "अहं न आगमिष्यामि" = तो म्हणाला की, "मी येणार नाही." १०. सः अति दूरं गच्छति = तो फार दूर जातो.

## २. मराठी भाषेत भाषांतर करा.

१. बालकः लिखन् अस्ति । २. स मनुष्यः कार्यं कुर्वन् अस्ति । ३. स बालकः पठन् आसीत् । ४. गच्छतं वृषभं पश्य । ५. गच्छता अश्वेन सहः गर्दभः अपि गच्छति । ६. पठते छात्राय मोदकानि यच्छ । ७. धावतः अश्वात् बालकः अपतत् । ८. लिखतः शिष्यस्य लेखं पश्य । ९. अजः गच्छन् अस्ति । १०. कार्यं कुर्वन्तं वृषभं पश्य । ११. मेषः अजेन सह भ्राम्यति । १२. मूषकः बिडालात् बिभेति । १३. स क्षेत्रात् वृषभान् वारयति । १४. महिषः वृषभं षण्डात् त्रायते । १५. पठाम्यहम् १६. सः अभाषत यत्, "अहं सदा सत्यं वदिष्यामि ।" १७. ऋतं वदिष्यामि । मूर्खाय कुक्कुरः बुक्कति ।

## ३ - संस्कृत भाषेत भाषांतर करा -

**क)** १. विद्यार्थी जात आहे. २. राम लिहित आहे. ३. तो मुलगा लिहित होता. ४. एक उंट जात आहे. ५. तो धावणाऱ्या रेड्याला पाहतो. ६. त्या जाणाऱ्या मनुष्याबरोबर बैल आहे. ७. शिकणाऱ्या मुलाला दूध द्या. ८. काम करणाऱ्या सेवकाचे काम पहा. ९. उंट, बैल, गाढव आणि बोकड एकत्र राहतात. १०. मांजर, उंदीर आणि कुत्रा एकत्र राहत नाहीत. ११. तो म्हणाला की "मी गावाला जाईल" १२. तो मनुष्य धन मिळवितो. १३. कुत्रा भुंकतो. १४. कुत्रे हत्तीला भुंकतात.

**ख)** १. रात्री वानर झाडावरुन पडले. २. तो मुलगा कुत्र्याला घाबरतो. ३. तो मनुष्य कुत्र्यापासून मांजरीचे रक्षण करतो. ४. राम देवदत्तापेक्षा अधिक चतुर आहे. ५. तो गावापासून फार दूर गेला.

**ग)** १. शिष्य गुरुंची सेवा करो, ज्ञान मिळवो आणि आनन्दित होवो. २. तू दुःख सहन केले पाहिजे. देवाचे स्मरण केले पाहिजे आणि धन मिळविले पाहिजे. ३. मी गुरुंना वन्दन केले पाहिजे आणि खरे बोलले पाहिजे.

| ४. अशुद्ध वाक्य | शुद्ध वाक्य | नियम |
|---|---|---|
| निशायां कपिः वृक्षम् अपतत् । | निशायां कपिः वृक्षात् अपतत् । | अपादाने पञ्चमी । |
| स बालकः कुक्कुरं बिभेति । | स बालकः कुक्कुरात् बिभेति । | भीत्रार्थानां भयहेतुः । |

## ५. स्वाध्याय

अ = ३ ग.मधील वाक्यांना बहुवचनामध्ये परिवर्तित करा.

आ = गच्छत्, कुर्वत्, पठत्, धावत् या शब्दांची संपूर्ण विभक्तीरूपे लिहा.

इ = सेव्, वर्ध्, लभ्, मुद्, सह्, याच्, ईक्ष्, विद्, पाल् या धातुच्या विधिलिङ् लकाराची संपूर्ण रूपे लिहा.

**६. रूपे ओळखा -** राज्ञे, कुर्वतः, अम्रियत, पठति, गच्छत्सु

**७. संधी करा -** गच्छति+अस्तम् । भवतु+इति । पितृ+अर्थम् । लृ+आकृतिः ।

**८. संधी विच्छेद करा -** पठत्यत्र । आगच्छत्वतः । स्मरत्यपि । मात्रर्थम्

# त्रिंशः पाठः

**जामानि** = मतिः = बुद्धि २. मत धृतिः = धैर्य उक्तिः = गोष्ट, वाक्य, कथन कृतिः = कार्य, काम युक्तिः = युक्ती
मुक्तिः = मुक्ती, मोक्ष भक्तिः = भक्ति श्रुतिः = श्रुति, वेद २. कान ३. ध्वनि
स्मृतिः = स्मृति, आठवण, न्याय पुस्तक, ग्रंथ शान्तिः = शान्ति, मनाची स्वस्थता भूमिः = पृथ्वी, जमीन
प्रकृतिः = स्वभाव, प्रधान मंडळी अङ्गुलिः= बोट, २. अंगठी भूतिः = भरभराट, ऐश्वर्य बुद्धिः = बुद्धि
शक्तिः = शक्ति, सामर्थ्य समृद्धिः = विपुलता, भरभराट गतिः = गति, चाल, जाण्याची तऱ्हा

**क्रियापदे** = चुरादिगण = मृग् = शोधणे अव+धीर् = तिरस्कार करणे

☞ **संकेत** = मतिः ते गतिः मतिवत्

☞ **व्याकरण** (मति शब्द, लृट्-आत्मनेपद, अयादि-आदेश संधी षष्ठी विभक्ती)

१. मति शब्दाची संपूर्ण विभक्तीरूपे पाठ करा. पहा परिशिष्ट शब्दरूपसंख्या १८.
२. धृति, कृति इत्यादि इकारान्त स्त्रीलिंगी शब्द मति शब्दाप्रमाणे चालवा. ३. चुरादिगणातील धातु उभयपदी असतात हे आपण अठ्ठाविसाव्या पाठात पाहिले आहेच. लट् लकार प्रथम पुरुष एकवचनामध्ये **मृग्** धातुचे रूप परस्मैपदात **मृगयति** व आत्मनेपदात मृगयते असे होईल. **लट् लकार** प्रथम पुरुष एकवचनामध्ये **अव्+धीर्** धातुचे रूप परस्मैपदात **अवधीरयति** व आत्मनेपदात **अवधीरयते** असे होईल. मृग् व **अव+धीर्** या धातुंना संक्षिप्त प्रत्यये लावून राहिलेली **लट्** लकाराची व इतर लकारांची रूपे चालवा. ४. बाविसाव्या व तेविसाव्या पाठामध्ये दिलेल्या षष्ठी विभक्तीच्या नियमांचा पुन्हा अभ्यास करा.

**सकर्मक धातु** = ज्या धातुंचा (क्रियावाचक शब्दांचा ) प्रयोग झाला असता कर्माची अपेक्षा असते त्यास 'सकर्मक धातु' असे म्हणतात. उदा. 'रामः जलं पिबति' = (राम पाणी पितो) या वाक्यात **'जलम्'** किंवा इतर कोणतेतरी कर्म अपेक्षित आहे. म्हणून **पा (पिबति)** हा 'सकर्मक धातु' आहे.

**अकर्मक धातु** = ज्या धातुचा प्रयोग झाला असता कर्माची अपेक्षा नसते त्यास **'अकर्मक धातु'** असे म्हणतात. उदा. – वृक्षः वर्धते = (झाड वाढते) बालकः हसति (मुलगा हसतो)
वरील वाक्यांमध्ये कर्माची अपेक्षा नाही म्हणून वर्ध् व हस् हे 'आकर्मक धातु' आहेत.

| सेव-लृट् = आत्मनेपद-भविष्यकाळ = सेवा करील | | | | लृट्-आत्मनेपद संक्षिप्त प्रत्यये | | |
|---|---|---|---|---|---|---|
| पुरुष | एकवचन | द्विवचन | बहुवचन | एकवचन | द्विवचन | बहुवचन |
| प्रथम | सेव्+इ+ष्यते=सेविष्यते सेवा करेल | सेव्+इ+ष्येते=सेविष्येते दोघे सेवा कराल | सेव्+इ+ष्यन्ते=सेविष्यन्ते सेवा करतील | (इ) स्यते ष्यते | (इ) स्येते ष्येते | (इ) स्यन्ते ष्यन्ते |
| मध्यम | सेव्+इ+ष्यसे=सेविष्यसे तूं सेवा करशील | सेव्+इ+ष्येथे=सविष्येथे तुम्ही दोघे सेवा कराल | सेव्+इ+ष्यध्वे=सेविष्यध्वे तुम्ही सेवा कराल | (इ) स्यसे ष्यसे | (इ) स्येथे ष्येथे | (इ) स्यध्वे ष्यध्वे |
| उत्तम | सेव्+इ+ष्ये=सेविष्ये मी सेवा करील | सेव्+इ+ष्यावहे=सेविष्यावहे आम्ही दोघे सेवा करणार | सेव्+इ+ष्यामहे=सेविष्यामहे आम्ही सेवा करणार | (इ) स्ये ष्ये | (इ) स्यावहे ष्यावहे | (इ) स्यामहे ष्यामहे |

परस्मैपदाप्रमाणेच आत्मनेपदी **लृट्** लकारामध्येसुद्धा काही धातुंच्या प्रत्ययांना **इडागम** अर्थात 'इ' आगम होतो. अशाप्रसंगी ज्यावेळी प्रत्ययाला इडागम होतो, त्यावेळी प्रत्ययातील स्य चा 'ष्य' होतो.

**इडागम होणाऱ्या काही महत्त्वपूर्ण आत्मनेपदी धातुंच्या लृट् लकाराच्या प्रथम पुरुषाच्या एकवचनाची रूपे** =
वन्द् = वन्दिष्यते, याच् = याचिष्यते, त्रप् = त्रपिष्यते, शिक्ष् = शिक्षिष्यते कम्प् = कम्पिष्यते, सह् = सहिष्यते, वृत् = वर्तिष्यते डी = डयिष्यते, यत् = यतिष्यते, ईक्ष् = ईक्षिष्यते, आ+लम्ब् = आलम्बिष्यते, परा+अय् = पलायिष्यते, जन् = जनिष्यते पाल् = पालयिष्यते, मृ = मरिष्यति *, विद् = वेदिष्यते, मृग् = मृगयिष्यते, अव+धीर् = अवधीरयिष्यते
वरील धातुंची राहिलेली लृट् लकाराची रूपे चालवा.

**इडागम न होणाऱ्या काही महत्वपूर्ण आत्मनेपदी धातुंच्या लृट् लकाराच्या प्रथमपुरुषी एकवचनाची रूपे** -
रम् = रंस्यते युध् = योत्स्यते लभ् = लप्स्यते
वरील धातुंची राहिलेली लृट् लकाराची रूपे चालवा.

**संधी-एचोऽयवायावः (१)** ए, ओ, ऐ आणि औ यांच्या पुढे कोणताही स्वर आला असता ए बद्दल अय्, ओ बद्दल अव्, ऐ बद्दल आय् व औ बद्दल आव् असे आदेश होतात.
उदा. ने+अनम् = नयनम् । नै + अकः = नायकः । भो+अतिः= भवति । पौ+अकः = पावकः

* लृट् लकारामध्ये 'मृ' धातुला परस्मैपदाची संक्षिप्त प्रत्यये लागतात.

# तिसावा पाठ

१. **उदाहरण वाक्ये**

१. श्रुतिं पठ = श्रुति वाच २. युक्त्या कार्यं कुरु = युक्तिने काम कर ३. स मधुराम् उक्तिं भाषते = तो मधुरवाक्य बोलतो ४. स नृपं सेविष्यते = तो राजाची सेवा करील ५. अहं दुःखं सहिष्ये = मी दुःख सहन करील.

२. **मराठी भाषेत भाषांतर करा.**

१. स श्रुतिं पठति । २. त्वं शक्तिम् इच्छसि । ३. बुध्द्या कार्यं कुरु ।
४. पक्षिणः गतिम् ईक्षस्व । ५. युक्त्याध्ययनं कुर्यात् । ६. रामे भूतिः, शक्तिः, भक्तिः, शान्तिः च सन्ति ।
७. तस्य कृति शोभना अस्ति. ८. मधुराम् उक्तिं भाषेथाः ९. भूमौ युक्त्या वर्तेथाः ।
१०. श्रुतिं स्मृतिं च पठ । ११. भक्त्या ईश्वरम् ईक्षस्व । १२. स गुरुं वन्दिष्यते, भाषिष्यते, ईक्षिष्यते च.
१३. त्वं मधुराम् उक्तिं भाषिष्यसे, मोदिष्यसे च ।
१४. अहं योत्स्ये, धनं लप्स्ये, रंस्ये च । १५. वयं सत्यं मृगयामहे ।

३. **संस्कृत भाषेत भाषांतर करा -**

क) १. तो मुलगा श्रुति वाचतो. २. ह्या मुलाची गति पहा.
३. बुद्धिने काम करावे. ४. दुःखामध्ये धैर्य धारण कर (धारय)
५. रघुवंश कालिदासाची कृति आहे. (रघुवंशः) ६. ह्या श्रीमंताची भरभराट पहा.
७. यति भक्तिने मोक्ष मिळवितो. ८. भक्ति शिवाय ज्ञान होत नाही.
९. मनाच्या स्वस्थतेमध्ये श्रुति आणि स्मृति वाच। १० त्याचा स्वभाव चांगला आहे.
११. जमिनीवर बसा. १२. मुनिकडून श्रुति आणि स्मृति शिक.
१३. तो स्वतःचे बोट पाहतो. १४. दुष्ट मनुष्य सज्जनाच्या चांगल्या कार्याचा तिरस्कार करतो.

ख) १. भक्तिची शक्ति पहा. २. लहान मुलगा आईचे स्मरण करतो.
३. धर्माचे पालन कर. ४. सज्जनाचे कल्याण होवो.
५. पोथ्यांमध्ये वेद श्रेष्ठ आहे.

ग) १. राम नेहमी गुरुंची सेवा करील. खरे बोलेल, धन मिळविल आणि आनंदित होईल.
२. तू वडिलांची सेवा करशील, विद्या शिकशील, धर्माचा आश्रय घेशील आणि ज्ञान मिळवशिल.
३. मी खरे बोलेल, धन मिळविल, प्रयत्न करील आणि आनन्दित होईल.

४.

| अशुद्ध वाक्य | शुद्ध वाक्य | नियम |
|---|---|---|
| पुस्तकेभ्यः वेदः श्रेष्ठः अस्ति । | पुस्तकेषु वेदः श्रेष्ठः अस्ति । | यतश्च निर्धारणम् । |
| धनं लभिष्ये, रमिष्ये । | धनं लप्स्ये, रंस्ये । | धातुरूप। |

५. **स्वाध्याय**

अ = ३ ग मधील वाक्यांना द्विवचनामध्ये व बहुवचनामध्ये परिवर्तित करा.

आ = ३ ग मधील वाक्यांना लट् व लङ् लकारामध्ये परिवर्तित करा

इ = मति, बुद्धि, गति, कृति, युक्ति, समृध्दि या शब्दांची संपूर्ण विभक्तीरूपे लिहा.

६. **रूपे ओळखा** - मतेः, प्रकृत्या, भक्त्याम्, वर्तिष्यते, लप्स्यते

७. **संधी करा** - मुने+ए । जे+अति । पो+अनः । द्वौ + अत्र । द्वावत्र

८. **संधी विच्छेद करा** - द्रावेतौ । नायकः ।

द्वौ + एतौ नै + अकः

# एकत्रिंशः पाठः

**नामानि** = नदी = नदी वापी = विहीर मही = पृथ्वी पुरी = शहर ब्राह्मणी = ब्राह्मण स्त्री, ब्राह्मणाची पत्नी
भवती = आपण बाईसाहेब बुद्धिमती = बुद्धिमान स्त्री श्रीमती=ऐश्वर्य शालीनी स्त्री कमलिनी = कमळाची वेल
गौरी = पार्वती, लहान मुलगी वाणी = भाषण, वचन रजनी = रात्र राज्ञी = राणी नारी = स्त्री सखी = मैत्रीण
सरस्वती = विद्येची देवता, वाग्देवी कौमुदी = चांदणी परीक्षा = परीक्षा गीता = गीता

**विशेषणानि** = उत्तीर्ण : = उत्तीर्ण अनुत्तीर्णः = अनुत्तीर्ण, न तरलेला अवतीर्णः = खाली उतरलेला, अवतार घेतलेला

☞ **संकेत** = नदी ते कौमुदी नदीवत् , परीक्षा व गीता मालावत्

☞ **व्याकरण** (नदी शब्द, क्त प्रत्यय, पूर्वरूप संधी, सप्तमी विभक्ती)

१. नदी शब्दाची संपूर्ण विभक्तीरूपे पाठ करा. पहा परिशिष्ट शब्दरूपसंख्या १९.
२. वापी, मही इत्यादि ईकारान्त स्त्रीलिंगी शब्द नदी शब्दाप्रमाणे चालवा.
३. चोविसाव्या व पंचविसाव्या पाठामध्ये दिलेल्या सप्तमी विभक्तीच्या नियमांचा पुन्हा अभ्यास करा.

**क्तक्तवतू निष्ठा** = भूतकाळात घडलेली क्रिया व्यक्त करण्यासाठी धातुंना क्त आणि क्तवतु प्रत्यय लागून बनलेल्या भूतकाळवाचक धातुसाधित विशेषणांचा सुद्धा प्रयोग करतात. क्त प्रत्ययाचा त शिल्लक राहतो व क्तवतु प्रत्ययाचा तवत् शिल्लक राहतो. उदा. कृ + त = कृतः (केला) तसेच कृ+तवत्= कृतवत् (केला)
प्रस्तुत तिसाव्या व पुढच्या एकतिसाव्या पाठात आपल्याला त (क्त) प्रत्ययाबाबत विचार करावयाचा आहे.

▯ काही धातुंना लागणाऱ्या त प्रत्ययास इडागम अर्थात त च्या अगोदर 'इ' येतो.

उदा. – पठ्+इ+त = पठितः = शिकला,वाचला,वाचलेला लिख्+इ+त=लिखितः = लिहिला, लिहिलेला
हस्+इ+त = हसितः = हसला, हसलेला रक्ष्+इ+त= रक्षितः = रक्षण केले/ केलेला
खाद्+इ+त = खादितः = खाल्ला, खाल्लेला ईक्ष्+इ+त=ईक्षितः = पाहिले, पाहिलेला

▯ काही नकारान्त किंवा मकारान्त धातुंना त (क्त) प्रत्यय लागतांना न् व म् यांचा लोप होतो.

उदा. – हन् = (मारणे) = हतः (मारला) जन् = जातः (उत्पन्न झाला, जन्मला)
गम् = गतः (गेला) नम् = नतः (नमस्कार केला)

भूतकाळात घडलेली क्रिया व्यक्त करण्यासाठी धातुंना त (क्त) आणि तवत् (क्तवतु) प्रत्यये लावून जे शब्द तयार होतात, ते विशेषणे असतात. विशेषणे विशेष्याप्रमाणे चालतात. अर्थात विशेष्याचे जे लिंग–विभक्ती–वचन असते. तेच लिंग–विभक्ती–वचन विशेषणाचे असते हे आपण सतराव्या पाठात शिकलोच आहोत.
त (क्त) प्रत्ययान्त भूतकाळवाचक धातुसाधित विशेषणे पुल्लिंगामध्ये देव शब्दाप्रमाणे स्त्रीलिंगामध्ये (शेवटी आ लागून) माला शब्दाप्रमाणे व नपुंसकलिंगामध्ये वन शब्दाप्रमाणे चालतात.
उदा. – पठितः (पुल्लिंग) पठिता (स्त्रीलिंग) पठितम् (नपुंसकलिंग)

## त (क्त) प्रत्ययान्ते भूतकालवाचक धातुसाधित विशेषणाचा प्रयोग

**(१)** सकर्मक धातुंपासून बनलेल्या त (क्त) प्रत्ययान्त भूतकालवाचक धातुसाधित विशेषणाचा प्रयोग झाल्यास वाक्यरचनेत कर्मणि प्रयोग होतो. अर्थात कर्त्याची तृतीया व कर्माची प्रथमा विभक्ती होते आणि कर्माच्या लिंग–विभक्ती–वचनाप्रमाणे त्या त (क्त) प्रत्ययान्त भूतकालवाचक धातुसाधित विशेषणाचे लिंग–विभक्ती–वचन असतात. म्हणून अशा विशेषणांना 'कर्मणि भूतकालवाचक धातुसाधित विशेषणे' म्हणतात.
उदा. – तेन वेदः पठितः = त्याच्याकडून वेद वाचला गेला
तेन गीता पठिता = त्याच्याकडून गीता वाचली गेली
तेन पुस्तकं पठितम् = त्याच्याकडून पुस्तक वाचले गेले.

**(२)** अकर्मक धातुंपासून बनलेल्या त (क्त) प्रत्ययान्त भूतकालवाचक धातुसाधित विशेषणाचा प्रयोग झाल्यास वाक्यरचनेत भावे प्रयोग होतो. अर्थात कर्त्याची तृतीया विभक्ती होते आणि ते त (क्त) प्रत्ययान्त भूतकालवाचक धातुसाधित विशेषण नपुंसकलिंगी प्रथमा विभक्ती एकवचनी राहते. म्हणून अशा विशेषणांना 'भावे भूतकालवाचक धातुसाधित विशेषणे' म्हणतात.
उदा. = तेन हसितम् = त्याच्याकडून हसले गेले. तैः हसितम् = त्यांच्याकडून हसले गेले.

**संधी - एङः पदान्तादति** = पदाच्या अर्थात शब्दरूपाच्या किंवा धातुरूपाच्या शेवटी ए किंवा ओ असून त्यापुढे अ आल्यास तो अ मागील स्वरात (ए किंवा ओ) मध्ये मिळून जातो म्हणजे त्याचा उच्चार होत नाही. तसेच त्यास लिहितही नाहीत; त्याच्याबद्दल 'ऽ' असे चिन्ह (द्विखण्ड चिन्ह) बहुधा लिहितात. ह्या संधीस पूर्वरूप संधी असे म्हणतात. उदा. एते + अत्र = एतेऽत्र । देवो + अयम् = देवोऽयम् ।

# एकतिसावा पाठ

१. **उदाहरण वाक्ये**

१. ब्राह्मणी गच्छति = ब्राह्मणी जाते २. तौ पुरीम् अगच्छतः = ते दोघे शहरात गेले २. परीक्षायां पञ्च छात्राः उत्तीर्णाः अन्येच अनुत्तीर्णाः (सन्ति) = परीक्षेमध्ये पाच विद्यार्थी उत्तीर्ण व इतर अनुत्तीर्ण आहेत. ३. तेन कार्यं कृतम् = त्याच्याकडून काम केले गेले. ४. ताभ्यां कार्यं कृतम् = त्या दोघांकडून काम केले गेले. ५. तैः कार्यं कृतम् = त्याच्याकडून काम केले गेले. ६. मया वेदः पठितः = माझ्याकडून वेद वाचला गेला. ७. अस्माभिः वेदः पठितः = आमच्याकडून वेद वाचला गेला. ८. अस्माभिः पुस्तकानि पठितानि = आमच्याकडून पुस्तके वाचली गेली. ९. मया गीता पठिता = माझ्याकडून गीता वाचली गेली १०. बालकैः गीता पठिता = मुलांकडून गीता वाचली गेली

२. **मराठी भाषेत भाषांतर करा.**

१. बुद्धिमती कुत्रास्ति? २. रमा गौरीं वन्दिष्यते । ३. ब्रह्मण्यौ नद्यां स्नानार्थं गच्छतः । ४. सरस्वती वाणीं भाषते । ५. राज्ञी सखिभिः सह पुर्यां भ्राम्यति । ६. श्रीमती दास्यौ पृच्छति । ७. एताः नार्यः सत्यं वदन्ति. ८. भवत्याविदानीं कुत्र भ्राम्यतः? ९. नार्यौ सखीः आह्वयतः । १०. परीक्षायां नव छात्राः उत्तीर्णाः अन्ये चानुत्तीर्णाः । ११. तेन किं कृतम् ? १२. तेन भोजनं कृतम् । १३. तेन पत्रं लिखितम् . १४. युष्माभिः पत्राणि लिखितानि । १५. तैः भोजनं कृतम् १६. मया पत्रे लिखिते । १७. त्वया कार्यं कृतम् । १८. मया बालकाः रक्षिताः । १९. युवाभ्यां पक्षिणः ईक्षिताः । २०. अस्माभिः गीता पठिता । २१. तेन ग्रामं गतम् । २२. बालकेन हसितम् . २३. ईश्वरः भूमिं (भूमौ) अवतीर्णः

३. **संस्कृत भाषेत भाषांतर करा -**

क) १. नदी कोठे आहे. २. नदीला पहा. ३. दोन नद्या वाहतात. ४. ह्या नद्या नेहमी वाहतात. ५. ह्या नदीचे पाणी गोड आहे. ६. त्या दोन्ही नद्यांचे पाणी गोड नाही. ७. त्या नदीजवळ जाऊ नको. ८. ह्या नदीपेक्षा ती नदी श्रेष्ठ आहे. ९. सर्व नद्यांमध्ये गंगा श्रेष्ठ आहे. १०. ह्या नदीमध्ये स्नान कर. ११. पाण्यासाठी नदीवर जा. १२. राणी पार्वतीला वन्दन करते. १३. जमीनवर कोण बसला? १४. उठा, खाली बसु नका, हे आसन घ्या (घ्या=गृह्णातु) १५. ही स्त्री पाण्यासाठी विहिरीवर जाते. १६. राणी दासीबरोबर आणि मैत्रणींबरोबर रात्री शहरात फिरते.

ख) १. ह्या परीक्षेमध्ये दहा विद्यार्थी उत्तीर्ण व इतर अनुत्तीर्ण आहेत. २. सज्जनांचे देवावर प्रेम आहे. ३. त्यांचा (त्यांना) साधुविषयी आदर आहे. ४. ही मुले खेळण्यात निपुण आहेत. ५. राम व लक्ष्मण शत्रुवर बाण टाकतात. ६. ते दररोज सकाळी वडिलांना नमस्कार करतात. ७. तुम्ही दोघे सुद्धा दररोज वडिलांना व देवाला नमस्कार करा.

ग) आज त्याच्याकडून वेद वाचला गेला. २. त्या दोघांकडून सुद्धा वेद वाचला गेला. ३. तुझ्याकडून फळ खाल्ले गेले. ४. तुझ्याकडून दोन फळे खाल्ली गेली. ३. तुम्हा दोघांकडून फळे खाल्ली गेली. ४. माझ्याकडून पुस्तक वाचले गेले. ५. हे काम आमच्याकडून केले गेले. ६. त्यांच्याकडून दोन फळे खाल्ली गेली. ७. मुलांकडून पुस्तक वाचले गेले. ९. तुझ्याकडून काम केले गेले. १०. माझ्याकडून लेख लिहिला गेला. ११. त्या दोघांकडून लेख लिहिले गेले. १२. माझ्याकडून जेवण केले गेले. १३. सेनापत्याकडून मुलाचे रक्षण केले गेले. १४. तुझ्याकडून फळे खाल्ली गेली. १५. त्याच्याकडून गावाला जाईले गेले. १६. त्याच्याकडून तेथे हसले गेले.

४.

| अशुद्ध वाक्य | शुद्ध वाक्य | नियम |
|---|---|---|
| अहं पुस्तकानि पठितम् । | मया पुस्तकानि पठितानि । | त प्रत्ययाना भू.धा. विशेषणाचा प्रयोग। |
| सेनापतिः बालकस्य रक्षितम् । | सेनापतिना बालकः रक्षितः । | त प्रत्ययाना भू. धा. विशेषणाचा प्रयोग। |

५. **स्वाध्याय**

अ = नदी, गौरी, कौमुदी, दासी, कमलिनी या शब्दांची संपूर्ण विभक्तीरूपे लिहा

आ = पठ्, गम्, हस्, रक्ष्, लिख्, खाद्, कृ ह्या धातुंची क्त प्रत्ययान्त रूपे लिहा.

६. **रूपे ओळखा** - नद्यः, दासीभिः, मह्यम्, मह्याम्, पठितम्, रक्षिता

७. **संधी करा** - एते+अपि । गृहे+अत्र । बाले+अस्मिन् । वने +अधुना

# द्वात्रिंशः पाठः

**नामानि** = धेनुः = गाय, दुभती गाय रज्जुः = दोरी, दोर रेणुः = धुळ, रजःकण तनुः = शरीर २. त्वचा कोकिलः = कोकिळ मयूरः = मोर कपोतः = कबुतर काकः = कावळा बकः = बगळा उलूकः = घुबड २. इन्द्र टिट्टिभः = टिटवी चातकः = चातक पक्षी हंसः = हंस कक्षा = वर्ग, इयत्ता, खोली

**विशेषणानि** = उपस्थितः = हजर अनुपस्थितः = गैरहजर व्यवस्थितः = सुव्यस्थित, निटनेटका, चांगल्या प्रकारचा

**क्रियापदानि** = जुहोत्यादिगण * = दा= देणे

**संकेत** = धेनुः ते तनुः धेनुवत्

**व्याकरण** = (धेनु शब्द, क्त प्रत्यय, दा धातु, श्चुत्व संधी, ष्टुत्व संधी)

१. धेनु शब्दाची संपूर्ण विभक्तीरूपे पाठ करा. पहा परिशिष्ट शब्दरूपसंख्या २१.

२. रज्जु, रेणु इत्यादि उकारान्त स्त्रीलिंगी शब्द धेनु शब्दाप्रमाणे चालवा.

३. जुहोत्यादिगणातील 'दा' धातुच्या लट्, लोट् आणि लङ् लकारांची संपूर्ण रूपे पाठ करा. पहा परिशिष्ट धातुरूपसंख्या २८.

**गत्यर्थाकर्मक.** = जाणे, चालणे, फिरणे इत्यादी गती अर्थ असणारे गत्यर्थक धातु तसेच अकर्मक धातुंपासून बनलेल्या त (क्त) प्रत्ययान्त धातुसाधित विशेषणाचा प्रयोग झाल्यास वाक्यरचनेत कर्तरिप्रयोगसुद्धा होतो. अर्थात कर्त्याची प्रथमा व कर्माची द्वितीया विभक्ती होते आणि कर्त्याच्या लिंग–विभक्ती–वचनाप्रमाणे त्या त (क्त) प्रत्ययान्त भूतकालवाचक धातुसाधित विशेषणाचे लिंग–विभक्ती–वचन असतात.

| | | | |
|---|---|---|---|
| उदा.– गत्यर्थक – | स गृहं गतः = तो घरी गेला. | तौ गृहं गतो = ते दोघे घरी गेले. | ते गृहं गताः = ते घरी गेले. |
| अकर्मक | स हसितः = तो हसला | तौ हसितौ = ते दोघे हसले | ते हसिताः = ते हसले |
| अकर्मक | स मृतः = तो मरण पावला | तौ मृतौ = ते दोघे मरण पावले | ते मृताः = ते मरण पावले |

## त (क्त) प्रत्ययान्त काही महत्त्वाची भूतकालवाचक धातुसाधित विशेषणे

| | | | |
|---|---|---|---|
| अस् = टाकणे – अस्त | छिद् = छेदणे –छिन्न | पठ् = शिकणे/वाचणे –पठित | वद् = बोलणे – उदित |
| आप् = मिळविणे – आप्त | ज्ञा = जाणणे –ज्ञात | पा = पिणे – पीत | वस् = राहणे– उषित |
| प्र+आप्=प्राप्त करणे,जाणे–प्राप्त | डी = उडणे–डयित | प्रच्छ् = विचारणे – पृष्ट | वह् = वाहणे/नेणे –ऊढ |
| ईक्ष् =पाहणे – ईक्षित | त्यज् = त्याग करणे –त्यक्त | बध् = बांधणे – बध्द | श्रु = ऐकणे – श्रुत |
| कथ् =सांगणे –कथित | दृश् = पाहणे –दृष्ट | बुध् = जाणणे – बुध्द | स्था = थांबणे – स्थित |
| कृ = करणे – कृत | धृ= धारण करणे –धृत | ब्रू = बोलणे – उक्त | स्ना = स्नान करणे–स्नात |
| क्रीड् = खेळणे – क्रीडित | नम् = नमस्कार करणे– नत | भक्ष् = भक्षण करणे– भक्षित | स्वप् = झोपणे – सुप्त |
| गद् = बोलणे– गदित | नश्= नष्ट होणे – नष्ट | मृ = मरणे – मृत | हु = हवन करणे – हुत |
| चुर् = चोरणे – चोरित | नी = नेणे– नीत | आ+रभ्=आरंभ करणे–आरब्ध | हृ= हरणे करणे– हृत |

**संधी - स्तोः श्चुना श्चुः =**

१) 'स्' च्या अगोदर किंवा नंतर 'श्' किंवा च वर्गातील कोणतेही व्यंजन आले तर 'स्' बद्दल 'श्' होतो. उदा. – रामस्+शेते=रामश्शेते । कस्+चित्+कश्चित् । वृक्षस्+छादयति=वृक्षश्छादयति ।

२) त वर्गातील (त् थ् द् ध् न् या) कोणत्याही व्यंजनाच्या अगोदर किंवा नंतर श किंवा च वर्गाचील (च्, छ्, ज्, झ्, ञ् यापैकी) कोणतेही व्यंजन आल्यास 'त्' बद्दल 'च्', 'थ्' बद्दल 'छ्', 'द्' बद्दल 'ज्',ध् बद्दल 'झ्',व 'न्' बद्दल 'ञ्' होतो. उदा. तत्+च=तच्च । एतत्+जलम्= एतज्जलम् । एतत्+छदिः=एतच्छदिः । बृहद्+झरः+बृहज्झरः । यज्+नः= यज्+ञः=यज्ञ=यज्ञः । याच्+ना=याच्+ञा=याच्ञा ।

**ष्टुना ष्टुः** - १) 'स्' च्या अगोदर किंवा नंतर 'ष्' किंवा ट वर्गातील कोणतेही व्यंजन आले तर 'स्' बद्दल 'ष्' होतो. उदा. – रामस्+षष्ठः=रामषष्ठः । रामस्+टीकते=रामष्टीकते ।

२) त वर्गातील (त् थ् द् ध् न् या) कोणत्याही व्यंजनाच्या अगोदर किंवा नंतर ष किंवा ट वर्गाचील (ट्, ठ्, ड्, ढ्, ण् यापैकी) कोणतेही व्यंजन आल्यास 'त्' बद्दल 'ट्', 'थ्' बद्दल 'ठ्', 'द्' बद्दल 'ड्',ध् बद्दल 'ढ्',व 'न्' बद्दल 'ण्' होतो. उदा. तत्+टीका=तट्टीका । उद्+डीनः= उड्डीनः । विष्+नुः=विष्णुः । कृष्+नः=कृष्णः ।

* 'जहोत्यदि गण' हा पाणिनीय धातुपाठातील तृतीय (तिसऱ्या) क्रमांकाचा गण असल्यामुळे यास 'तृतीय गण' असे सुद्धा म्हणतात.

# बत्तिसावा पाठ

१. **उदाहरण वाक्ये**

१. धेनुः गच्छति = गाय जाते. २. धेनवः चरन्ति = गायी चरतात ३. तौ धेनूः पश्यतः = ते दोघे गायींना पाहतात ४. वयं धेनुं रक्षामः = आम्ही गायीचे रक्षण करतो. ५. यूयं धेनूः रक्षत = तुम्ही गायींचे रक्षण करा. ६. तस्यां कक्षायां दश छात्राः उपस्थिताः (सन्ति) = त्या वर्गात दहा मुलं हजर आहेत. ७. अहं गृहं गतः = मी घरी गेलो. ८. ते नगरं प्राप्ताः = ते शहरात गेले. ९. तेन सज्जनः दृष्टः = त्याच्याकडून सज्जनाला पाहिले गेले. १०. तैः वनं दृष्टम् = त्यांच्याकडून वन पाहिले गेले.

२. **मराठी भाषेत भाषांतर करा.**

१. धेनुः कुत्र गच्छति ? २. धेनुं पश्य । ३. धेनुना सह बालकः गच्छति । ४. धेनुभिः सह मनुष्यः गच्छति । ५. धेनोः गतिम् ईक्षेथाम् । ६. धेनवः धावन्ति । ७. बालकः धेनुं रक्षति । ८. धेनुभ्यां सह एष क्षेत्रपालकः अस्ति । ९. धेनूनां एषा धेनुः श्रेष्ठा अस्ति । १०. एतस्यां कक्षायां कियत् छात्राः अनुपस्थिताः (सन्ति) । ११. तत्र सर्वं व्यवस्थितम् अस्ति । १२. रामः गृहं गतः । १३. बालकौ गृहं प्राप्तौ । १४. मनुष्याः ग्रामं गताः । १५. कृष्णः गृहम् आगतः । १६. ते गृहम् आगताः । १७. रावणः मृतः । १८. दुर्जनाः मृताः । १९. शिशुः सुप्तः । २०. ते शिशवः सुप्ताः । २१. सज्जनेन एतस्मै बालकाय मोदकं दत्तम् । २२. मया जलं पीतम् भारः च नीतः । २३. रामेण भोजनं कृतम्, प्रश्नः पृष्टः, गृहं त्यक्तम् , शत्रुः बद्धः , कार्यम् आरब्धम्, रावणः हतःच । २४. त्वया उक्तम् । २५. बकः नदीं गतः । २६. काकः तत्र प्राप्तः । २७. कपोतः, चकोरः, शुकः, उलूकः, टिट्टिभः, हन्साः च डयिताः । २८. कोकिलः मधुरं गायति । २९. स धनं ददाति, ददातु, अददात् वा । ३०. ते धनं ददति । ३१. त्वं शिष्याय धनं ददासि, देहि, अददाः वा । ३२. आवां धनं दद्वः ।

३. **संस्कृत भाषेत भाषांतर करा -**

**क)** १. गाय इकडे येत आहे. २. गायीला तिकडे ने. ३. गायीला अन्न दे । ४. मुलांनी गायीचे दूध प्यावे. ५. धूळ उठत आहे. ६. दोरी आण. ७. धुळीवर बसू नका. ८. धर्मासाठी शरीराचे रक्षण केले पाहिजे.

**ख)** १. कोकीळ, कावळे, बगळे आणि पोपट झाडावर राहतात. २. मोर नाचतो. ३. ह्या वर्गात सात मुले गैरहजर आहेत. ४. ह्या वर्गात दहा मुले आहेत. ५. त्या धावणाऱ्या मोराला पहा.

**ग) त (क्त) प्रत्ययान्त धातुसाधिताचा प्रयोग करा** = १. मुलगा शाळेत गेला. २. विद्यार्थी घरी आला. ३. मुलगा झोपला. ४. दुष्ट मनुष्य मरण पावला. ५. तू धर्म जाणलास, दान दिलेस, दूध प्यालास, वाक्य बोललास, काम केलेस आणि धर्म धारण केलास. ६. मी स्नान केले, फळे खाल्ली, प्रश्न विचारला, कार्य आरंभ केले आणि सज्जनाचे रक्षण केले. ७. तो केव्हा गेला?

**घ)** १. तो दान देतो. २. तू सुध्दा दान देतोस. ३. मी त्या मुलाला दान देतो. ४. तो त्या मुलाला फळे देवो. ५. तू मला ते पुस्तक दे. ६. मी त्याला धन देऊ. ७. तू त्याला धन दिलेस. ८. मी सज्जनाला धन दिले.

४.

| अशुद्ध वाक्य | शुद्ध वाक्य | नियम |
|---|---|---|
| त्वं धनं दत्तः । | त्वया धनं दत्तम् । | त प्रत्ययान्त धा.सा.विशेषणाचा प्रयोग |

५. **स्वाध्याय**

अ = धेनु, रेणु, रज्जु, तनु या शब्दांची संपूर्ण विभक्तीरूपे लिहा.

आ = दा धातुंच्या लट्, लोट्, लङ् आणि विधिलिङ् लकाराची संपूर्ण रूपे लिहा.

इ = ३ घ मधील वाक्यांना बहुवचनामध्ये परिवर्तित करा.

ई = ईक्ष्, कृ, हृ, धृ, दा, पा, नश्, स्था, ब्रू, प्रच्छ्, आरभ् आणि हन् या धातुंपासून बनणारे त (क्त) प्रत्ययान्त धातुसाधित रूपे लिहा.

६. **रूपे ओळखा -** धेनुः, धेन्वै, तनुषु, उषितः, पृष्टः

७. **संधी करा -** सत् + चरित्र । तत् + जलं । महान् + झषः । यज्+नः । दुष्+तः ।

# त्रयस्त्रिंशः पाठः

**नामानि** = वारि = पाणी सुरभि = गाय, कामधेनु दन्तः = दात ओष्ठः = ओठ अधरोष्ठः = खालचा ओष्ठ
कण्ठः = कंठ, स्वर (आवाज) केशः = केस नखः = नख स्कन्धः = खांदा हस्तः = हात उदरम् = पोट
मुखम् = मुख, तोंड ललाटम् = कपाळ हृदयम् = हृदय ग्रीवा = मान नासिका = नाक जीह्वा = जीभ

**विशेषणे** = शुचि = पवित्र, स्वच्छ सुरभि = सुंदर, सुगंधित

**अव्यये** = किञ्चित् = थोडे, जरा मुहूः = पुन्हा, वारंवार

☞ **संकेत** = दन्तः ते हस्तः देववत्, उदरम् ते हृदयम् वनवत्, ग्रीवा ते जिह्वा मालावत्

☞ **व्याकरण** (वारि शब्द, क्तवतु प्रत्यय, दा धातु जश्त्व संधी)

१. 'वारि' या शब्दाची संपूर्ण विभक्तीरूपे पाठ करा. पहा परिशिष्ट शब्दरूपसंख्या ३१.

☞ (-हस्व) इकारान्त विशेषणे पुल्लिंगामध्ये **'कवि'** शब्दाप्रमाणे, स्त्रीलिंगामध्ये **'मति'** शब्दाप्रमाणे व नपुंसकलिंगामध्ये **'वरि'** शब्दाप्रमाणे चालतात.

उदा. **शुचिः, मुनिः, शुचिना मुनिना । शुचिः मतिः , शुच्या मत्या । शुचि वारि, शुचिना वारिणा।**

२. जुहोत्यादिगणातील 'दा' धातुच्या विधिलिङ् व लृट् लकारांची संपूर्ण रूपे पाठ करा. पहा परिशिष्ट शब्दरूपसंख्या २८.

☞ भूतकाळात घडलेली क्रिया व्यक्त करण्यासाठी धातुंना त (क्त) किंवा **तवत् (क्तवतु)** प्रत्यये लागून बनलेल्या धातुसाधित विशेषणांचा उपयोग करतात. त्यापैकी मागील दोन पाठांमध्ये आपण **त (क्त)** प्रत्ययान्त भूतकाळवाचक धातुसाधित विशेषणाबद्दल विचार केलेला आहे.

प्रस्तुत पाठामध्ये आपल्याला **तवत् (क्तवतु)** प्रत्ययान्त भूतकाळवाचक, धातुसाधित विशेषणाबद्दल विचार करावयाचा आहे. **त** प्रत्ययान्त भूतकाळवाचक धातुसाधित विशेषणाच्या शेवटी **'वत्'** जोडल्यास **तवत्** प्रत्ययान्त भूतकालवाचक धातुसाधित विशेषण तयार होते. उदा. **पठित = पठित+वत्=पठितवत्** = शिकला, वाचला **तवत्** प्रत्ययान्त भूतकाळवाचक धातुसाधित विशेषणे पुल्लिंगामध्ये 'भगवत्' शब्दाप्रमाणे चालतात. उदा. **पठितवान्, पठितवन्तौ पठितन्तः** इ.

तवत् प्रत्ययान्त भूतकाळवाचक धातुसाधित विशेषणे स्त्रीलिंगामध्ये शेवटी ई लागून **नदी** शब्दाप्रमाणे चालतात. उदा. – **पठितवत् + ई = पठितवती = पठितवती पठितवत्यौ पठितवत्यः** इत्यादि.

तवत् (क्तवतु) प्रत्ययान्त धातुसाधित भूताकाळवाचक धातुसाधित विशेषणे नपुंसकलिंगामध्ये **जगत्** * शब्दाप्रमाणे चालतात. उदा. **पठितवत् पठितवती पठितवन्ति** इत्यादि.

## तवत् (क्तवतु) प्रत्ययान्त भूतकाळवाचक 'धातुसाधित' विशेषणाचा प्रयोग

तवत् (क्तवतु) प्रत्ययान्त भूतकाळवाचक धातुसाधित विशेषणाचा प्रयोग झाल्यास वाक्यरचनेत कर्तरि प्रयोग होतो. म्हणजेच कर्त्याची प्रथमा व कर्माची द्वितीया विभक्ती होते आणि त्या तवत् प्रत्ययान्त धातुसाधित विशेषणाचे लिंग–विभक्ती–वचन कर्त्याच्या लिंग–विभक्ती–वचनानुसार होतात. म्हणून यांना 'कर्तरि भूतकालवाचक धातुसाधित विशेषणे' म्हणतात.

| | | |
|---|---|---|
| **उदा. –** | **स पुस्तकं पठितवान्** | – त्याने पुस्तक वाचले. |
| | **तौ पुस्तकं पठितवन्तौ** | – त्या दोघांनी पुस्तक वाचले. |
| | **ते पुस्तकं पठितवन्तः** | – त्यांनी पुस्तक वाचले. |
| | **तस्य ललाटे लिखितम् अस्ति** | – त्याच्या कपाळावर लिहिले आहे. |
| | **सा पुस्तकं पठितवती** | – तिने पुस्तक वाचले. |
| | **ते पुस्तकं पठितवत्यौ** | – त्या दोघींनी पुस्तक वाचले. |
| | **पठिताय बालकाय मोदकं यच्छ** | – शिकलेल्या मुलाला लाडू दे. |

**संधी - झलां जश् झशि** = अनुनासिक अर्थात **ङ ञ ण न म** व अन्तस्थ अर्थात **य र ल व** या व्यंजनाच्या व्यतिरिक्त कोणत्याही व्यंजनापुढे कोणत्याही वर्गाचे तीसरे अर्थात **ग ज ड द ब** व चौथे अर्थात **घ झ ढ ध भ** यापैकी एखादे व्यंजन आले तर पूर्वीच्या (अगोदरच्या) व्यंजनाबद्दल त्याच्याच वर्गातील तिसरे व्यंजन होते.
उदा. – **दुघ्+धम् = दुग्धम, आरभ्+धम् = आरब्धम् बुध्+धिः = बुद्धिः । लभ्+धः = लब्धः ।**

* जगत् शब्द पहा परिशिष्ट शब्दरूपसंख्या ३७.

# तेहेतिसावा पाठ

## १. उदाहरण वाक्ये

१. अहं पुस्तकं पठितवान् = मी पुस्तक वाचले २. आवां पुस्तकं पठितवन्तौ = आम्ही दोघांनी पुस्तक वाचले. ३. वयं पुस्तकं पठिवन्तः = आम्ही पुस्तक वाचले. ४. वयं पुस्तकानि पठितवन्तः = आम्ही पुस्तके वाचली. ५. त्वं पुस्तके पठितवान् = तू दोन पुस्तके वाचली. ६. स शुचि वारि पीतवान् = तो शुद्ध पाणी प्याला. ७. स गृहं गतवान् = तो घरी गेला. ८. वयं नगरं गतवन्तः = आम्ही शहरात गेलो. ९. त्वं धनं दत्तवान् = तू धन दिलेस. १०. युवां धान्यं दत्तवन्तौ = तुम्ही दोघांनी धान्य दिले. ११. सा धनं दत्तवती = तिने धन दिले. १२. रामः ब्राह्मणाय धनं दद्यात् = राम ब्राह्मणाला धन देवो. १३. स सुरभिणी पुष्पे आनीतवान् = त्याने दोन सुगंधित फूले आणली. १४. त्वं मुखं शुचि कुरु = तू मुख स्वच्छ कर. १५. त्वं मुखं प्रक्षालय = तू मुख स्वच्छ कर. (तू तोंड धू.) १६. पठितवन्तं बालकं पश्य = शिकलेल्या मुलाला पहा.

## २. मराठी भाषेत भाषांतर करा.

१. स वेदं पठितवान् । २. ते ग्रामं गतवन्तौ । ३. स स्नानं कृतवान्. ४. तौ स्नानं कृतवन्तौ. ५. ते धनं त्यक्तवन्तः। ६. वयं गुरुं नतवन्तः । ७. युवां जनकं नतवन्तौ. ८. अहं प्रश्नं पृष्टवान् । ९. ते प्रश्नं पृष्ठवन्तः । १०. रावणः मृतवान् । ११. स वचनम् उक्तवान् । १२. स भारम् ऊढवान् । १३. अहं भाषणं श्रुतवान् । १४. वयमपि भाषणं श्रुतवन्तः । १५. स स्नातवान् । १६. अहं विद्यालयं गतवान् । १७. सा वचनम् उक्तवती । १८. ताः विद्यालय गतवत्यः । १९. स भाषणं दद्यात्, त्वं दद्याः, अहं च दद्याम् । २०. ते धान्यं दद्युः । २१. वयं भृत्याय धनं दद्याम । २२. स धनं दास्यति, त्वं दास्यसि, अहं च दास्यामि । २३. धनं दास्यथः । २४. ते धनं दास्यन्ति । २५. वयं बालकाय मोदकं दास्यामः । २६. तस्य मुखं सुरभि अस्ति । २७. स सुप्तवान् ।

## ३. संस्कृत भाषेत भाषांतर करा -

**क)** १. राम स्वच्छ पाणी पितो. २. तू स्वच्छ पाणी आण. ३. तो स्वच्छ पाण्यासाठी नदीवर जातो. ४. तू सुगंधित फुले आण. ५. तू हात, पाय, नाक, कान आणि मुख स्वच्छ कर. ६. त्या मुलाचे दात, ओठ, नखे, मान, कंठ आणि नाक सुंदर आहेत. ७. जिभेने गोड बोलावे. ८. त्याचे हृदय पवित्र आहे. ९. त्याच्या कपाळावर काय लिहिले आहे? १०. त्याचा आवाज गोड आहे. ११. त्याचे केस सुंदर आहेत.

**ख) तवत् (क्तवतु) प्रत्ययान्तधातुसाधिताचा प्रयोग करा -**

१. रामाने पुस्तक वाचले. २. दोन मुलांनी हे पुस्तक वाचले ३. त्याने लेख लिहिला. ४. त्यांनी दोन पुस्तके वाचली. ५. तू घरी आलास. ६. मी पाणी प्यालो. ७. आम्ही पाणी प्यालो. ८. ते जमीनीवर झोपले. ९. तूं धर्म जाणलास. १०. तुम्ही दोघांनी सद्धा धर्म जाणला. ११. त्यांनी स्नान केले. १२. मुलगी वाक्य बोलली. १३. त्या मुलींनी भाषण ऐकले. १४. मुलगा झोपला. १५. आम्ही खरे बोललो. १६. त्याने धर्म धारण केला. १७. त्यांनी चोरांना बांधले. १८. तो तेथे थांबला. १९. आम्ही दोघांनी गुरुंना नमस्कार केला. २०. आम्ही रात्री चांदण्या पाहिल्या. २१. त्याने ओझे वाहिले. २२. आम्ही काम आरंभ केले.

**ग)** १. राम धन देवो. २. त्या दोघांना धान्य दिले. ३३. तू धन दिले पाहिजे. ४. मी अन्न दिले पाहिजे. ५. आम्ही सुद्धा दिले पाहिजे. ६. त्याने काय दिले? ७. त्यांनी दान दिले. ८. तू ब्राह्मणाला काय दिलेस? ९. मी विद्यार्थ्याला ज्ञान दिले. १० आम्ही विद्यार्थ्यांना दूध देणार.

## ४.

| अशुद्ध वाक्य | शुद्ध वाक्य | नियम |
|---|---|---|
| मया जलं पितवान् । | अहं जलं पितवान् । | तवत् प्रत्ययान्त भू.धा. विशेषणाचा प्रयोग |

## ५. स्वाध्याय

अ = वारि शब्दांची संपूर्ण विभक्तीरूपे लिहा.

आ = पठ्, गम्, हस्, चुर् या धातुंपासून तवत् प्रत्ययान्त धातुसाधित विशेषणे बनवा.

इ = दा धातुच्या विधिलिङ् आणि लृट् लकारांची संपूर्ण रूपे लिहा.

**६. रूपे ओळखा** - वारिणी, वारिणः, पीतवान्, दत्तवान, लिखितम्, दद्यात्

**७. संधी करा** - अध् + धिः । बुध् + धः । दघ्+धः । लभ् + धः ।

# चतुस्त्रिंशः पाठः

**नामानि** = मधु = मध अम्बु = पाणी जानु = गुडघे, गुडघी तालु = टाळू, तालुस्थान वस्तु = वस्तू सानु = शिखर
अश्रु = अश्रु व्याघ्रः = वाघ ऋक्षः= अस्वल वृक्षः = झाड वृकः = लांडगा मृगः = हरिण वानरः = वानर, माकड
शृगालः = कोल्हा शशकः = ससा शुकरः = डुक्कर, जंगली डुक्कर नकुलः = मुंगुस सिंहः = सिंह,
सिंही = सिंहिनी मृगी = हरिणी पात्रम् = भांडे, प्याला

**क्रियापदानि** = स्वादिगण = आप् = मिळविणे शक् = शकणे श्रु = ऐकणे (पंचमगण)
भ्वादिगण परस्मैपद = गर्ज् = गर्जना करणे

☞ **संकेत** = मधु ते अश्रु मधुवत्, व्याघ्रः ते सिंहः देववत्, आप् ते श्रु आप् धातुप्रमाणे, गर्ज् पठतिवत्

☞ **व्याकरण** = (मधु शब्द, शतृ प्रत्यय, आप् धातु, चर्त्व संधी)

१. 'मधु' शब्दाची संपूर्ण विभक्तीरूपे पाठ करा. पहा परिशिष्ट शब्दरूपसंख्या ३३.

२. अम्बु, जानु इत्यादि उकारान्त नपुंसकलिंगी शब्द मधु शब्दाप्रमाणे चालतील. अश्रु शब्दाच्या विभक्ती रूपातील 'न्' चा 'ण्' होईल. उदा. अश्रुणी, अश्रुणः इत्यादि.

३. आप धातुच्या लट्, लोट् व लङ् लकारांची संपूर्ण रूपे पाठ करा. पहा परिशिष्ठ धातुरूपसंख्या ३३.

४. शक् व श्रु धातु आप धातुप्रमाणे चालतील ते चालवा. श्रु धातुच्या रूपांमध्ये 'न्'चा 'ण्' होईल. पहा परिशिष्ट धातुरूपसंख्या ३४ व ३५.

**लटः शतृ शानचावप्रथमासमानाधिकरणे** - परस्मैपदी धातुंना शतृ प्रत्यये लावून वर्तमान काळवाचक धातुसाधित विशेषणे बनवितात व आत्मनेपदातील धातुंना शानच् प्रत्यय लावून वर्तमानकालवाचक धातुसाधित विशेषणे बनवितात. प्रस्तुत पाठात आपल्याला शतृ प्रत्ययाबद्दल विचार करावयाचा आहे. शतृ प्रत्ययाचा अत् शिल्लक राहतो.

☞ **अत् (शतृ) प्रत्ययान्त वर्तमानकाळवाचक धातुसाधित विशेषणे बनविण्याचा सरळ उपाय**

धातुच्या लट् लकाराच्या प्रथमपुरुषी बहुवचनी रूपाच्या शेवटील इ व त्याच्या शेजारी असणाऱ्या त् च्या अगोदरचा न् काढून टाकावा. त्यानंतर जे शिल्लक राहते ते त्या धातुचे अत् (शतृ) प्रत्ययान्तरूप जाणावे. उदा. **पठन्ति = पठ न् त् इ** यातील 'इ' व 'न्' काढून टाकल्यानंतर 'पठत्' हे रूप शिल्लक राहते म्हणून पठ् धातुचे अत् (शतृ) प्रत्ययान्त रूप 'पठत्' हे होय. ज्या धातुंच्या प्रथमपुरुषी बहुवचनी रूपात 'न्' नसतो. त्या रूपाच्या शेवटील फक्त 'इ' काढून टाकावा व त्यानंतर जे शिल्लक राहिल ते त्या धातुचे अत् (शतृ) प्रत्ययान्त रूप जाणावे. उदा. **जुहोत्यादि** गणातील दा या धातुचे प्रथमपुरुषी बहुवचनी ददति हे रूप आहे. त्यामध्ये 'न्' नाही. त्या रुपातील शेवटील 'इ' काढून टाकल्यानंतर 'ददत्' हे रूप शिल्लक राहते. म्हणून प्रस्तुत दा धातुचे ददत् हे अत् (शतृ) प्रत्ययान्त रूप आहे.

☞ **काही धातुंपासून बनलेली अत् (शतृ) प्रत्ययान्त वर्तमानकालवाचक धातुसाधित विशेषणे -**

पठ् = पठत् = शिकणारा, शिकत असलेला लिख्=लिखत्= लिहिणारा, लिहित असलेला, हस् = हसत्, दृश्= पश्यत्, स्था=तिष्ठत्, पा=पिबत्, धाव्=धावत्, कृ=कुर्वत्, घ्रा = जिघ्रत्, गर्ज्=गर्जत्, नम्=नमत्, अस्=सन्, आप्=आप्नुवत्, श्रु=शृण्वत्

या प्रमाणे आतापर्यन्त आपण जे परस्मैपदी धातु शिकलो त्यांची अत् (शतृ) प्रत्ययान्त रूपे बनवा

अत् (शतृ) प्रत्ययान्त वर्तमानकालवाचक धातुसाधित विशेषणे पुल्लिंगामध्ये 'गच्छत्' शब्दाप्रमाणे चालतात.

उदा. पठन् पठन्तौ पठन्तः पठन्तम् इत्यादी

स्त्रीलिंगामध्ये 'ई' लागून 'नदी' शब्दाप्रमाणे चालतात.

उदा. पठन्ती* पठन्त्यौ पठन्त्यः पठन्तीम् इत्यादी

नपुंसकलिंगामध्ये 'जगत्' शब्दाप्रमाणे चालतात.

उदा. - पठत् पठती पठन्ति पठत् इत्यादी

☞ **अत् (शतृ) प्रत्ययान्त वर्तमानकालवाचक धातुसाधित विशेषणाचा प्रयोग**

अत् (शतृ) प्रत्ययान्त वर्तमानकालवाचक धातुसाधित विशेषणाचा प्रयोग झाल्यास वाक्यरचनेत कर्तरि प्रयोग असतो. अर्थात कर्त्याची प्रथमा, कर्माची द्वितीया विभक्ती होते आणि त्या वर्तमानकालवाचक धातुसाधित विशेषणाचे लिंग-विभक्ती-वचन कर्त्याच्या लिंग-विभक्ती-वचनानुसार होतात. म्हणून यांना 'कर्तरि वर्तमानकालवाचक धातुसाधित विशेषणे' म्हणतात.

उदा. **पठन् बालकः कुत्र अस्ति**= शिकणारा मुलगा कोठे आहे? **स पठन् अस्ति** = तो शिकत आहे **सा पठन्ती अस्ति** = ती शिकत आहे **स पठन् आसीत्** = तो शिकत होता! **गच्छन्तं बालकं पश्य** = जाणाऱ्या मुलाला पहा.

**संधी-खरि च** = अनुनासिक अर्थात ङ, ञ, ण, न, म व अन्तसस्थ अर्थात य र ल व या व्यंजनांच्या व्यतिरिक्त कोणत्याही व्यंजनापुढे कठोर व्यंजन अर्थात क, च, ट, त, प, ख, छ, ठ, थ, फ, श, ष, स या व्यंजनापैकी एखादे व्यंजन आल्यास पूर्वीच्या (अगोदरच्या) व्यंजनाबद्दल त्याच्याच वर्गातील पहिले व्यंजन होते. उदा.-भेद्+तुम्=भेत्तुम । लभ्+सते = लप्सते । युयुध्+सते=युयुत्सते ।

*भ्वादि, दिवादि, तुदादि व चुरादि गणातील धातुंपासून बनलेल्या वर्तमानकालवाचक अत् (शतृ) प्रत्ययान्त विशेषणांना स्त्री लिंगामध्ये न् लागतो. मात्र तुदादिगणातील धातुंपासून बनलेल्या विशेषणांना न् विकल्पाने लागतो. उदा. - तुदत् = तुदन्ती, तुदती ।

# चौतिसावा पाठ

१. **उदाहरण वाक्ये**

१. स पठन्नस्ति* = स पठन् अस्ति = तो शिकत आहे. २. तौ पठन्तौ स्तः = ते दोघे शिकत आहेत. ३. ते पठन्तः सन्ति = ते शिकत आहेत. ४. त्वं पठन् असि = तू शिकत आहेस. ५. युवां पठन्तौ स्थः = तुम्ही दोघे शिकत आहात ६. यूयं पठन्तः स्थ = तुम्ही शिकत आहात. ७. अहं पठन् अस्मि = मी शिकत आहे. ८. आवां पठन्तौ स्वः = आम्ही दोघे शिकत आहोत. ९. वयं पठन्तः स्मः = आम्ही शिकत आहोत १०. स पठन् आसीत = तो शिकत होता. ११. त्वं पठन् आसीः= तू शिकत होतास. १२. स पठन् भविष्यति = तो शिकत असेल. १३. ते पठन् भविष्यन्ति = ते शिकत असतील १४. स बालकः पठन् अस्ति = तो मुलगा शिकत आहे. १५. पठन्तं बालकं पश्य = शिकणाऱ्या मुलाला पहा. १६. स बालकः जनकं नमन् अस्ति = तो मुलगा वडिलांना नमस्कार करत आहे. १७. अहं भाषणं श्रुण्वन् आसीत् = मी भाषण ऐकत होतो. १८. स गर्जतः सिंहात् बिभेति = तो गर्जना करणाऱ्या सिंहाला भितो.

२. **मराठी भाषेत भाषांतर करा.**

१. स गच्छन् अस्ति. २. तौ धावन्तौ स्तः । ३. त्वं जलं पिबन् असि । ४. यूयं लिखन्तः स्थ । ५. वयं नमन्तः स्मः। ६. सा पठन्ती अस्ति । ७. स गच्छन् आसीत् । ८. सः ईश्वरं नमन्, पुष्पं जिघ्रन्, जलं च पिबन् अस्ति । ९. गच्छन् बालकः ईश्वरं स्मरति । १०. पठन्तं छात्रं पश्य । ११. पठिता छात्रेण सह ते के सन्ति ? १२. पठिता छात्रेण सह तेऽपि विद्यार्थिनः सन्ति । १३. पठते छात्राय दुग्धं देहि । १४. गच्छन्तं व्याघ्रं मृक्षं चेक्षस्व । १५. शशकः कस्मात् बिभेति ? १६. मृगी सिंह्याः बिभेति । १७. स धनम् आप्नोति । १८. युयं धनम् आप्नुथः । १९. वयं धनम् आप्नुमः । २०. स धनम् आप्नोत् । २१. त्वं धान्यम् आप्नुहि । २२. ते धनम् आप्नोत् ।

३. **संस्कृत भाषेत भाषांतर करा -**

क) १. तो पत्र लिहित आहे. २. ते दोघे पत्र लिहित आहेत. ३. ते पत्र लिहित आहेत. ४. तू काम करीत आहेस. ५. तुम्ही दोघे पाहत आहात. ६. तुम्ही हसत आहात. ७. मी फुलांना पाहत आहे. ८. आम्ही फुलांचा वास घेत आहोत. ९. तो मुलगा शिकत होता. १०. तू तेव्हा जेवण करीत होतास. ११. रमा वाचत होती. १२. इकडे येणाऱ्या कोल्ह्याला पहा. १३. तेथे बसलेल्या हरणांना, डुकरांना आणि वानरांना पहा. १४. त्या पळणाऱ्या सशाला पहा. १५. मुंगुस आणि ससे फार पळतात. १६. वाघ सुध्दा सिंहाला घाबरतो । १८. सिंह गर्जना करतो.

ख) १. मध कोठे आहे? २. मध इकडे आण. ३. मधासाठी भांडे आण. ४. तो मध भक्षण करतो. ५. आपले गुडघे स्वच्छ कर. ६. चांगले लाकूड इकडे आण. ७. स्वच्छ पाणी पी. ८. पाण्यासाठी नदीवर जा. ९. माझी वस्तु इकडे आण. १०. पर्वताच्या कड्यावरून मोठा दगड पडला. ११. ह्या मुलाचे अश्रु भूमिवर पडत आहेत. १२. त्याने लाकूड फोडले (भिन्नवान्)

ग) १. तो काय मिळवितो? २. तो धान्य मिळवितो. ३. तू सुद्धा धान्य मिळव. ४. त्याने धान्य मिळविले. ५. आम्ही धन मिळविले.

४.

| अशुद्ध वाक्य | शुद्ध वाक्य | नियम |
|---|---|---|
| ते लिखन् अस्ति । | ते लिखन्तः सन्ति । | अत् (शतृ) प्रत्ययान्त वर्त. काल.धा.सा.वि. प्रयोग |
| सानु शिला अपतत् | सानुनः शिला अपतत् | अपदाने पञ्चमी |

५. **स्वाध्याय**

१. मधु, जानु, सानु, अश्रु या शब्दांची संपूर्ण विभक्तीरूपे लिहा.

२. अत् (शतृ) प्रत्ययान्त वर्तमानकालवाचक धातुसाधित विशेषण बनविण्याचा सरळ उपाय स्पष्ट करा.

३. पठ्, गम्, हस्, वद्, नम्, दिव्, तुद् ह्या धातुपासून बनणारी अत् (शतृ) प्रत्ययान्त रूपे लिहा.

६. **रूपे ओळखा** - मधुने, जानुभ्यः, सानौ, मृगीम् गर्जन्ति ।

७. **संधी करा** - सद्+कर्म । कुकुभ्+प्रान्तः । उद्+कृष्टः । युयुध्+सुः ।

*ङ्, ण्, न् यांच्या पूर्वी ऱ्हस्व स्वर असून पुढे कोणताही स्वर आल्यास हे वर्ण द्वित्व पावतात.
उदा. - पश्यन्+अस्ति=पश्यन्नस्ति । अनिच्छन्+अपि=अनिच्छन्नपि ।
या पाठात अशी अनेक उदाहरणे बनत असूनही नवीनच शिकणाऱ्या पाठकांना कठिण वाटू नये यासाठी यांचा प्रयोग जास्त केलेला नाही.

# पञ्चत्रिंशः पाठः

**नामानि** = जगत्=जग,विश्व वियत्=आकाश, गगन लौहकारः = लोहार मालाकारः = माळी चर्मकारः = चांभार मायाकारः=जादूगार तैलकारः = तेली कुंभकारः = कुंभार भक्ष्यकारः = हलवाई स्वर्णकारः = सोनार नापितः=न्हावी रजकः=धोबी व्याधः=पारधी लोहः=लोखंड क्षुरः=वस्तारा,२. बाण कर्तरी=कातर मुण्डनम् = मुंडन, हजामत

**विशेषणम्** = दीन = गरीब, निर्धन

**क्रियापदानि** = तुदादिगण = कृत् (कृन्त) = कापणे, तोडणे, छेदन करणे
चुरादिगण = तड् (ताड्) = मारणे, ठोकणे धृ (धार्)=धारण करणे, परिधान करणे २.ऋण लागणे
प्र+इर् (प्रेर्) = प्रेरणा करणे, प्रेरणा देणे, स्थापि* (स्थाप्) = स्थापन करणे, ठेवणे.

☞ **संकेत** = वियत् जगत् प्रमाणे लौहकारः ते क्षुरः देववत्

☞ **व्याकरण** (जगत् शब्द, शानच् प्रत्यय, आप् धातु, वैकल्पिक अनुनासिक संधी)

१. जगत् या तकारान्त नपुंसकलिंगी शब्दाची संपूर्ण विभक्तीरूपे पाठ करा. पहा परिशिष्ट शब्दरूपसंख्या ३७.

२. आप धातुच्या विधिलिङ् व लृट् लकारांची रूपे पाठ करा. पहा परिशिष्ट धातुरूपसंख्या ३३.

शक् व श्रु धातुंच्या विधिलिङ् व लृट लकारांची रूपे सुद्धा आप धातुच्या विधिलिङ् व लृट् लकाराच्या रूपांप्रमाणे चालतील. सहाय्यतेसाठी पहा परिशिष्ट धातुरूप संख्या ३४ व ३५.

**शानच्** = आत्मनेपदी धातुंना शानच् प्रत्यय लावून वर्तमानकाळवाचक धातुसाधिक विशेषणे बनवितात.
शानच् प्रत्ययाचा आन शिल्लक राहतो. 'आन' चा काही ठिकाणी 'मान'होतो.

**शानच् प्रत्ययान्त वर्तमानकालवाचक धातुसाधित विशेषणे बनविण्याचा सरळ उपाय =** भ्वादि, दिवादि, तुदादि व चुरादिगणातील धातुंच्या प्रथमपुरुषी बहुवचनी रूपाच्या शेवटी असलेला अन्ते शब्द काढून टाकावा. त्यानंतर पुढे 'मान' शब्द जोडावा. इतर गणातील धातुच्या प्रथम पुरुषी बहुवचनी रूपाच्या शेवटील अन्ते किंवा अते शब्द काढून टाकावा त्यानंतर पुढे आन जोडावा.

उदा. – वर्त् (वर्तन्ते) = **वर्तमान** = असणारा, वर्ध्= **वर्धमान** = वाढणारा, मुद् (**मोदते**) = **मोदमान**, ईक्ष्=**ईक्षमाण**, लभ्=**लभमान**, डी= **डयमान**, जन्=**जायमान**, रम्=**रममाण**, याच्=**याचमान**, सह्=**सहमान**, शिक्ष्=**शिक्षमाण**

**मान** किंवा **आन** (**शानच्**) प्रत्ययान्त वर्तमानकाळवाचक धातुसाधित विशेषणे पुल्लिंगामध्ये **देव** शब्दाप्रमाणे, स्त्रीलिंगामध्ये (शेवटी आ लागून) **माला** शब्दाप्रमाणे व नपुंसकलिंगामध्ये **वन** शब्दाप्रमाणे चालतील.

उदा. **वर्तमानः** (पुल्लिंग), **वर्तमाना** (स्त्रीलिंग), **वर्तमानम्** (नपुंसकलिंग)

चालुकाळातील क्रिया व्यक्त करण्यासाठी सुद्धा काही सुज्ञ **मान** किंवा **आन** (**शानच्**) प्रत्ययान्त धातुसाधित विशेषणाचा प्रयोग करतात. त्यावेळी '**अस्**' धातुचे यथायोग्य रूप वापरतात.

उदा. – **सः ईक्षमाणः अस्ति** = तो पाहत आहे. सः ईक्षमाणः आसीत् = तो पाहत होता.

**मान किंवा आन (शानच्) प्रत्ययान्त वर्तमानकाळवाचक धातुसाधित विशेषणाचा प्रयोग**

मान किंवा आन (शानच्) प्रत्ययान्त वर्तमानकाळवाचक धातुसाधित विशेषणाचा उपयोग झाल्यास वाक्यरचनेत कर्तरिप्रयोग असतो अर्थात कर्त्याची प्रथमा व कर्माची द्वितीया विभक्ती होते आणि कर्त्याच्या लिंग–विभक्ती–वचनानुसार त्या वर्तमानकाळवाचक धातुसाधित लिंग–विभक्ती–वचन होतात. म्हणून यांना 'कर्तरि वर्तमानकाळवाचक धातुसाधित विशेषणे' म्हणतात.

उदा. –**शिक्षमाणः बालकः दुखं सहते** = शिकणारा मुलगा दुःख सहन करतो. **सा सहमाना अस्ति** = ती सहन करत आहे.

**संधी - यरोऽनुनासिकेऽनुनासिको वा** = 'ह' शिवाय कोणतेही व्यंजन पदाच्या अर्थात शब्दरूपाच्या किंवा धातुरूपाच्या शेवटी असून त्यापुढे अनुनासिक आल्यास अगोदरच्या (पूर्वीच्या) व्यंजनाबद्दल त्याच्याच वर्गातील तिसरे व्यंजन होते किंवा ते अगोदरचे व्यंजन कायम राहते.

उदा. एतद् + मुरारिः = एतन्मुरारिः किंवा एतद् मुरारिः । वाग्+नयति = वाङ्नयति किंवा वाग् नयति

* स्थापि हा भ्वादिगणातील स्था धातुपासून बनलेला 'णिजन्त' धातु आहे. णिजन्त धातु चुरादिगणातील धातुंप्रमाणे चालतात.

# पस्तिसावा पाठ

१. **उदाहरण वाक्ये**

१. स शिक्षमाणः अस्ति = तो शिकत आहे. २. स शिक्षमाणः आसीत् = तो शिकत होता. ३. अहं शिक्षमाणः आसम् = मी शिकत होतो. ४. वयं शिक्षमाणाः स्मः = आम्ही शिकत आहोत. ५. सा शिक्षमाणा अस्ति = ती शिकत आहे. ६. ते शिक्षमाणाः सन्ति = ते शिकत आहेत. ७. ताः शिक्षमाणाः सन्ति = त्या शिकत आहेत. ८. शिक्षमाणं बालकं पश्य = शिकणाऱ्या मुलाला पहा. ९. शिक्षमाणां बालिकां पश्य = शिकणाऱ्या मुलीला पहा. १०. शिक्षनाणाय बालकाय मोदकं यच्छ = शिकणाऱ्या मुलाला लाडू दे. ११. मयि वर्तमाने कः तत्र गच्छेत् = मी असताना कोणी तेथे जावे? १२. वियति पक्षिणः डयन्ति = पक्षी आकाशात उडतात. १३. स धनम् आप्नुयात् = त्याने धन मिळविले पाहिजे. १४. स धनम् आप्स्यति = तो धन मिळविल. १५. वयं धनम् आप्नुयाम् = आम्ही धन मिळविले पाहिजे.

२. **मराठी भाषेत भाषांतर करा.**

१. स मोदमानः अस्ति । २. तौ मौदमानौ स्तः । ३. त्वं सहमानः असि । ४. यूयम् ईक्षमाणाः सन्ति । ५. स मोदमान् आसीत्? ६. वयं शिक्षमाणाः आस्म । ७. अहं शिक्षमाणः भविष्यामि । ८. याचमानः मनुष्यः कुत्र आसीत् ९. विद्यालयम् ईक्षमाणं बालकं पश्य । १०. शिक्षमाणायै बालिकायै पुस्तकानि यच्छ । ११. शिक्षमाणात् बालकात् एतां विद्या शिक्षस्व । १३. त्वयि वर्तमाने कः तत्र गच्छेत्? १४. जगत् कथम् अस्ति? १५. सज्जनः जगतः अपि शिक्षते । १६. वियति के डयन्ति? १७. रजकः वस्त्राणि प्रक्षालयति । १८. व्याधः मृगे वाणं क्षिपति । १९. लौहकारः लोहं ताडयति । २०. नापितः कर्तर्या केशान् कृन्तति । २१. स वस्त्रं धारयति प्रेरयति च । २२. भक्ष्यकारः अन्नं पचति । २३. कुम्भकारेण घटः कृतः । २४. अहं भूमौ घटं स्थापयामि । २५. तौ धनम् आप्नुयाताम् । २६. अहं धान्यम् आप्स्यामि । २७. वयमपि धान्यम् आप्स्यामः । २८. स केशान् कर्तिष्यति ।

३. **संस्कृत भाषेत भाषांतर करा -**

**क)** १. तो आनंदित होत आहे. २. तो मिळवित आहे. ३. तू काय मागत आहेस? ४. ते वाढत आहेत. ५. त्या मुली शिकत होत्या. ६. ती पाने पडत आहेत. ६. पडणाऱ्या पानांना इकडे आण. ७. उडणाऱ्या पक्षांना पहा. ८. दुःख सहन करणाऱ्या माणसाला प्रेरणा कर. ९. धन मिळविणारा गरिबांना धन देवो.

**ख)** १. जगत उत्पन्न होते आणि नष्ट होते. २. जगाला पहा. ३. जगाचा मालक कोण आहे? ४. रात्री आकाशात तारे चमकतात. ५. त्या गावात माळी, लोहार, सोनार, धोबी आणि चांभार राहतात. ६. तेली, जादुगार आणि हलवाई ह्या गावात राहतात. ७. तो वस्तऱ्याने मुंडन करत आहे. ८. तो हृदयाला शुद्ध ठेवतो. ९. कुंभार मडके बनवितो.

**ग)** १. त्याने धान्य मिळविले, तू मिळविले पाहिजे आणि मी सुद्धा मिळविले पाहिजे. २. त्या दोघांनी धन मिळविले पाहिजे. तुम्ही दोघांनी धन मिळविले पाहिजे आणि आम्ही दोघांनी सुद्धा धन मिळविले पाहिजे. ३. त्या मुलांनी धन मिळविले पाहिजे. तुम्ही धन मिळविले पाहिजे आणि आम्ही सुद्धा धन मिळविले पाहिजे. ४. तो धन मिळविल, तू धन मिळविणार आणि मी सुद्धा धन मिळविणार. ५. ते धन मिळवतील, तुम्ही मिळविणार आणि आम्ही सुद्धा मिळविणार.

४.

| अशुद्ध वाक्य | शुद्ध वाक्य | नियम |
|---|---|---|
| जगत् जगतौ जगतः । | जगत् जगती जगन्ति । | शब्दरूप । |
| कुम्भकारं घटं रचयति । | कुम्भकारः घटं रचयति । | कर्तरि प्रथमा । |

५. **स्वाध्याय**

अ = जगत् आणि वियत् या शब्दांची संपूर्ण विभक्तीरूपे लिहा.

आ = आप्, शक् व श्रु या धातच्या विधिलिङ् व लृट् लकाराची संपूर्ण रूपे लिहा.

इ = याच्, रम्, ईक्ष् , वर्त् व सह् या धातुंपासून वर्तमानकालवाचक धातुसाधिते बनवा व लिहा.

६. **रूपे ओळखा** - याचमाना, वियति, वर्तमान, भूत, शिक्षमाणायै, आप्स्यामि ।

७. **संधी करा** - तत्+न । पत् + नगः । षट् + मुखम् ।

तन्न पन्नग षण्मुख

# षट्त्रिंशः पाठः

**नामानि** = पयस् = पाणी २. दूध मनस् = चित्त शिरस् = डोके, मस्तक तमस् = अन्धःकार, अंधार रक्षस् = राक्षस, पिशाच सरस् = तळे, तडाग अङ्कः= आकडा, गुण अवकाशः = सुट्टी २. जागा परिणामः = फळ, कृतिजन्य फळ सतीर्थ्यः= वर्गमित्र, गुरुबंधु उत्तरम् = उत्तर मसीपत्रम् = दऊत क्रीडाक्षेत्रम् = क्रिडांगण, खेळण्याचे मैदान सञ्चिका = वहि मसी=शाई लेखनी=लेखनी(पेन)२.पळी संस्कृतम् = शुद्ध, संस्कृत भाषा शिरस्कम् = टोप, टोपी, पागोटे

**क्रियापदम्** = <u>रुधादिगण</u> = रुध् = अडविणे, थांबविणे, विरोध करणे, झाकणे, कोंडणे, बंद करणे (सप्तम गण)

**अव्ययानि** = कति = किती नहि = नाही (नकारार्थी) परन्तु = परन्तु, पण **किमर्थम्** =का

☞ **संकेत** = पयस् ते सरस् पयस् प्रमाणे

☞ **व्याकरण** (पयस् शब्द, तुमन्त अव्यय, रुध धातु, अनुस्वार परसवर्ण संधी)

१. पयस् शब्दाची संपूर्ण विभक्तीरूपे पाठ करा. पहा परिशिष्ट शब्दरूपसंख्या ३४.

२. मनस्, शिरस् इत्यादि सकारान्त नपुंसकलिंगी शब्द पयस् शब्दाप्रमाणे चालवा.

३. रुध् धातुच्या लट्, लोट्, लङ्, विधिलिङ् व लृट् लकारांची संपूर्ण [illegible]रूपे रूपे पाठ करा. पहा परिशिष्ट धातुरूपसंख्या ६५.

**तुमुन्ण्वुलौ क्रियायां क्रियार्थायाम्** = शिकण्या करिता, शिकण्या साठी जातो अशाप्रकारे वाक्यातील मुख्य क्रियेचा हेतु किंवा उद्देश दाखविण्यासाठी धातुस **तुमुन्** प्रत्यय लागून बनविलेल्या **तुमन्त** अव्ययाचा प्रयोग करतात. **तुमुन्** चा **तुम्** शिल्लक राहतो. 'तुमन्त' शब्द अव्यय असलल्यामुळे त्याची विभक्तीरूपे चालत नाहीत.

**तुमन्त अव्यय बनविण्याचा उपाय =**

१. तुम् प्रत्यय लागतांना काही धातुच्या तुम् प्रत्ययाच्या अगोदर इडागम ('इ' आगम) होतो.

उदा. = पठ = पठ्+इ+तुम् = पठितुम् = शिकण्याकरिता, शिकण्यासाठी, वाचण्याकरिता, वाचण्यासाठी

२. तुम् प्रत्यय लागताना अन्त्य स्वरास गुण होतो.

उदा. – जि* =जेतुम्= जिंकण्यासाठी, जिंकण्याकरिता नी* =नेतम्= नेण्याकरीता, नेण्यासाठी

भू★=भो+तुम्=भो+इ ✱+तुम् अव् आदेश होऊन भव्+इ+तुम्= भवितुम्= होण्याकरीता, होण्यासाठी

३. तुम् प्रत्यय लागताना धातुच्या उपान्त्य (शेवटच्या वर्णाच्या अगोदरच्या) स्वरास सुद्धा गुण होतो. लिख् धातुचा शेवटचा वर्ण ख् आहे त्याच्या अगोदर इ हा स्वर आहे म्हणून तो उपान्त्य आहे. वरील विधानानुसार त्यास गुण होईल.

लिख्+इ+तुम्=लेखितुम् = लिहिण्याकरिता, लिहिण्यासाठी

छिद् = छेद्+तुम=छेत्तुम् = छेदण्याकरिता, छेदण्यासाठी (तुम् प्रत्ययास इडागम् झालेला नाही)

**काही तुमन्त अव्यये -**

कृ⅄= कर्तुम् = करण्याकरीता, करण्यासाठी, स्ना = स्नातुम् = स्नानासाठी, धृ = धर्तुम् = धरण्यासाठी रुद् = रोदितुम्= रडण्यासाठी, पा=पातुम्, गम्=गन्तुम्, हन्=हन्तुम्, पच् = पक्तुम्, खाद् = खादितुम्, दा=दातुम् दृश् = द्रष्टुम्, वह् = वोढुम्, सह्=सोढुम्, प्रच्छ् = प्रष्टुम् हृ = हर्तुम्, पाल् = पालयितुम्, तड् = ताडयितुम् इ.

**संधी-वाऽपदान्तस्य** = पदाच्या अर्थात शब्दरूपाच्या किंवा धातुरूपाच्या अन्ती असणाऱ्या 'म्' पासून झालेल्या अनुस्वारापुढे श, ष, स आणि ह या व्यंजनांच्या व्यतिरिक्त कोणतेही व्यंजन आल्यास ते व्यांजन ज्या वर्गातील असेल त्या वर्गातील अनुनासिक 'म्' बद्दल विकल्पाने होते. अर्थात एका पक्षात अनुनासिक होते, तर दुसऱ्या पक्षात अनुस्वार रहातो. उदा. = त्वम् + किम् = त्वं किम किंवा त्वङ्किम्✿ (त्वङ्किम्) । तृणम् + चरति = तृणं चरति किंवा तृणञ्चरति । प्रमाणम्=टीकते=प्रमाणं टीकते किंवा प्रमाण्टीकते । पाठम् + पठति = पाठं पठति किंवा पाठम्पठति श ष स आणि ह पुढे असता त्या पदान्त 'म्' चा फक्त अनुस्वार होईल. उदा. त्वम् + शिक्षसे = त्वं शिक्षसे

* इ किंवा ई चा गुण ए होतो. ★उ चा गुण ओ होतो. ✱भू धातुस लागणाऱ्या तुम् प्रत्ययास इडागम सुद्धा होतो. ⅄ ऋ चा गुण अर् होतो.

✿ जेव्हा परवर्ण होतो तेव्हा दोन्ही शब्द जोडून लिहावे.

# छत्तिसावा पाठ

१. **उदाहरण वाक्ये**

१. स जलं पातुं गच्छति = तो पाणी पिण्यासाठी जातो. २. स कार्यं कर्तुं शक्नोति = तो काम करु शकतो ३. त्वं किं कर्तुम् इच्छसि = तू काय करु इच्छितो ? ४. अहं स्नातुम् इच्छामि = मी स्नान करु इच्छितो. ५. भवान् कुत्र गतुम् इच्छसि = आपण कोठे जाऊ इच्छितात? ६. अहं विद्यालयं गन्तुमिच्छामि = मी शाळेत जाऊ इच्छितो. ७. वयं धर्मं धर्तुम् इच्छामः = आम्ही धर्म धारण करु इच्छितो. ८. पयः पिव = पाणी पी ९. तेषां समीपे पुस्तकनि सञ्चिकाः लेखन्यः च सन्ति = त्यांच्याजवळ पुस्तके, वह्या आणि लेखण्या आहेत. १०. तस्य परीक्षायाः परिणामः कथम् अस्ति, उत्तीर्णः वा अनुत्तीर्णः = त्याच्या परीक्षेचे फळ कसे आहे, उत्तीर्ण अथवा अनुत्तीर्ण ?

२. **मराठी भाषेत भाषांतर करा.**

१. स पठितुम् इच्छति । २. तौ गन्तुम् इच्छतः । ३. तेऽपि गन्तुम् इच्छन्ति । ४. स कार्यं कर्तुं शक्नोति । ५. ते वेदान् पठितुं शक्नुवन्ति । ६. त्वं संस्कृतं पठितुम् इच्छसि किम् ? । ७. आम्, अहं संस्कृतं पठितुम् इच्छामि । ८. स स्नातुम् इच्छति किम् ? ९. नहि, स स्नातुं नेच्छति । १०. स खलं हन्तुं शक्नोति न वा? । ११. नहि, स खलं हन्तुं न शक्नोति । १२. वयं गृहं गन्तुम्, धनं दातुम्, भारं वोढुं चेच्छामः । १३. शिष्यः प्रश्नं प्रष्टुम्, दुखं सोढुं चेच्छति । १४. यूयं दानं दातुं शक्नुथ न वा? १५. आम्, वयं दातुं शक्नुमः । १६. सा पक्तुं शक्नोति । १७. ते छात्राः उत्तरं दातुं शक्नुवन्ति । १८. तेन परीक्षायां कति अङ्काः प्राप्ताः ? १९. अद्यः अवकाशः अस्ति । २०. तव परीक्षायाः परिणामः कथमस्ति उत्तीर्णः वा नुत्तीर्णः? २१. एष मम सतीर्थ्यः अस्ति । २२. स बालकः वस्त्राणि धारयति । २३. छात्रः मसीपत्रं तत्र स्थापयति । २४. चौरः मनुष्यं रुणध्दि । २५. स सज्जनं न रुणध्द् । २६. ते सजनं न रन्ध्युः । २७. स तं रोत्स्यति । २८. त्वं कं रुणत्सि? २९. अहं कमपिन रोत्स्यामि । ३०. वयमपि नारुन्धम न च रोत्स्यामः ।

३. **संस्कृत भाषेत भाषांतर करा -**

**क)** १. मुलगा पाणी पिण्यासाठी कोठे गेला? २. तो पाणी पिण्यासाठी नदीवर गेला. ३. ते स्नानासाठी नदीवर गेले. ४. राम वडिलांची आज्ञा पालन करण्यासाठी वनात गेले . ५. तू शिकण्यासाठी कोठे जातोस? ६. मी शिकण्यासाठी शाळेत जातो. ७. आम्ही सुद्धा शिकण्यासाठी शाळेतच जातो. ८. ते दोघे लिहण्यासाठी लेखणी व वही मागंत आहेत. ९. तू दान देवू शकतोस काय? नाही, का? १०. कारण की माझ्याजवळ धन नाही. ११. तो ओझे वाहू शकतो. १२. तो लाकूड तोडू शकतो. १३. तो शत्रुला मारण्यासाठी आणि फळ खाण्यासाठी तेथे जातो.

**ख)** १. आज सुटी आहे म्हणून क्रिडांगणात खेळा. २. तू परीक्षेत किती गुण मिळविलेस? ३. त्याची दऊत आणि लेखणी कोठे आहे? ४. तुझा वर्गमित्र कोण आहे? ५. तुझी वही मला दे.

**ग)** १. येथे स्वच्छ पाणी आहे. २. हे स्वच्छ पाणी प्या. ३. ह्या स्वच्छ पाण्याने आंघोळ करा. ४. तलावात बगळे आहेत. ५. अंधारात जेवण करु नये. ६. राक्षस दुःख देतात. ७. मनाने चिन्तन कर.

**घ)** १. तो त्या सज्जनाला अडवितो परंतु मी अडवित नाही. २. त्याने सज्जनाला अडविले, तू अडविलेस परन्तु मी अडविले नाही. ३. त्याने सज्जनाला अडवू नये, तू अडवू नये व मी सुद्धा अडवू नये. ४.तो त्याला अडविल, तू अडवशिल परन्तु मी अडविणार नाही.

४.

| अशुद्ध वाक्य | शुद्ध वाक्य | नियम |
|---|---|---|
| लिखतुम् पिबतुम्, दर्शितुम् । | लेखितुम्, पातुम्, द्रष्टुम् । | तुमन्त अव्यय । |
| त्वं सतीर्थ्यः कः अस्ति । | तव सतीर्थ्यः कः अस्ति । | षष्ठी शेषे । |

५. **स्वाध्याय**

अ = ३ घ मधील वाक्यांना द्विवचनामध्ये व बहुवचनामध्ये परिवर्तित करा.

आ = पयस्, मनस्, शिरस् या शब्दांची संपूर्ण विभक्तीरूपे लिहा.

इ = पठ्, गम्, लिख्, दृश्, नी, हृ, पाल् या धातुंपासून होणारी तुमन्त अव्यये लिहा.

६. **रूपे ओळखा** - पयोभ्याम्, मनसा, शिरसि, पातुम्, द्रष्टुम्

७. **संधी करा**- त्वम्+करोषि । रिपुम् + जयति । प्रमाणम् + टीकते । धनम् + ददाति । वेदम् + पठति ।

# सप्तत्रिंशः पाठः

**नामानि** = नामन् = नाव, नाम कर्मन् = काम, कार्य प्रेमन् = प्रेम, स्नेह व्योमन् = आकाश अग्रजः = मोठा भाऊ
अनुजः= लहान भाऊ पितृव्यः = काका मातुलः = मामा पितामहः = आजोबा, वडिलांचे वडिल
मातामहः = आजोबा, आईचे वडिल पौत्रः = नातु श्वशूरः = सासरा भगिनी = बहिण देवालयः = मंदिर

**विशेषणानि** (संख्यावाचक) = शतम् = शंभर सहस्रम् = हजार लक्षम् = लक्ष, लाख
कोटिः = कोटी, करोड २. प्रकार

**क्रियापदानि** = क्र्यादिगण = क्री = विकत घेणे, खरेदी करणे ग्रह (गृह) = घेणे, ग्रहण करणे ज्ञा (जा) = जाणणे

☞ **संकेत** = नामन् ते व्योमन् नामन् प्रमाणे, क्री ते ज्ञा क्री धातुप्रमाणे

☞ **व्याकरण** (नामन् शब्द क्त्वा, ल्यप्, क्री धातु, विसर्ग संधी)

१. नामन् शब्दाची संपूर्ण विभक्तीरूपे पाठ करा. पहा परिशिष्ट शब्दरूपसंख्या ३५.

२. कर्मन्, प्रेमन् इत्यादि अन्नत नपुंसकलिंगी शब्द नामन् शब्दाप्रमाणे चालतील. प्रसंग विशेषी विभक्तीरूपांमध्ये 'न्' चा 'ण्' होईल.

३. क्री, ग्रह व ज्ञा या धातुंच्या लट्, लोट् व लङ् लकारांची संपूर्ण विभक्ती रूपे पाठ करा. पहा परिशिष्ट धातुरूपसंख्या ४१,४२, ४३.

४. शत, सहस्त्र, लक्ष व कोटि हे शब्द एकवचनामध्ये चालतात.
शत्, सहस्त्र, लक्ष हे शब्द नपुंसकलिंगी असल्यामुळे यांची विभक्तीरुपे 'वन' शब्दाप्रमाणे होतात.

उदा. शतम् मनुष्याः शतम् गृहाणि शतम् मालाः ।
सहस्त्रम् बालकाः सहस्त्रम् गृहाणि सहस्त्रम् बालिका : ।
लक्षम् पुरुषाः लक्षम् गृहाणि लक्षम् पाठशालाः ।

५. कोटि शब्द स्त्रीलिंगी असल्यामुळे त्याची रूपे 'मति' शब्दाप्रमाणे होतात.
उदा. – कोटिः बालकाः कोटिः गृहाणि कोटिः मालाः

६. अग्रज वगैरे शब्दांपासून होणारे स्त्रीलिंगी शब्द पुढील प्रमाणे
अग्रजा = मोठी बहिण, अनुजा = धाकटी बहिण, पितृव्या = काकू मातुलानी = मामी पितामही = आजी (वडिलांची आई) मातामही = आजी (आईची आई) पौत्री = नात

**समानकर्तृकयोः पूर्वकाले** = राम शिकून गेला, कार्य करुन जातो. अशाप्रकारे एकाच कर्त्याकडून होणाऱ्या दोन किंवा अनेक क्रियांपैकी पूर्वकाळी (अगोदर) होणारी क्रिया व्यक्त करण्यासाठी धातुंना क्त्वा प्रत्यय लावून बनविलेल्या त्वान्त अव्ययाचा उपयोग करतात. अशाप्रसंगी पूर्वकाळी घडणारी क्रिया व त्या बरोबर होणारी क्रिया या दोन्ही क्रियांचा कर्ता एकच पाहिजे. क्त्वा प्रत्ययाचा त्वा शिल्लक राहतो.

**काही त्वान्त अव्यये** = कृ = कृत्वा = करुन, ज्ञा =ज्ञात्वा= जाणून, लिख्=लिखित्वा=लिहून, गम् = गत्वा नम् = नत्वा, दा=दात्वा, स्वप्=सुप्त्वा, श्रु=श्रुत्वा, ग्रह्=गृहीत्वा, प्रच्छ्=पृष्ट्वा, वस्=उषित्वा, दृश्=दृष्ट्वा, पच्=पक्त्वा, खाद्=खादित्वा, पठ्=पठित्वा, पा=पीत्वा, मुच्=मुक्त्वा, घ्रा=घ्रात्वा, लभ्=लब्ध्वा, हन्=हत्वा

**समासेऽनञ्पूर्वे क्त्वो ल्यप्** = धातुच्या अगोदर उपसर्ग असल्यास त्वा प्रत्ययाबद्दल ल्यप् प्रत्यय लागतो. ल्यप् चा 'य' शिल्लक राहतो. अशा अव्ययांना 'ल्यबन्त अव्यये' म्हणतात.
उदा. अनु+भू+य=अनुभूय=अनुभव करुन, अनुभव घेऊन, आ+दा+य=आदाय=देऊन
वि+क्री+य=विक्रीय= विकून आ+गम्=आगम्य=येवून आ+ह्वे =आहूय= बोलावू

**ऱ्हस्वस्य पिति कृति तुक्** = जेव्हा धातु ऱ्हस्व स्वरान्त असतो तेव्हा त्वा प्रत्ययाबद्दल लागणाऱ्या 'य' प्रत्ययाच्या पूर्वी 'त्' लागतो. अर्थात 'य' च्या ऐवजी 'त्य' लागतो. अशा प्रकारे बनणाऱ्या शब्दांला सुध्दा 'ल्यबन्त अव्यय' म्हणतात.
उदा. – अनु+कृ+त्+य=अनुकृत्य= दुसऱ्यासारखे करुन प्र+हृ+त्+य=प्रहृत्य= प्रहार करुन

**संधी-(ससजुषोःरुः)** = विसर्गाच्या अगोदर अ व आ या स्वराव्यतिरिक्त कोणताही स्वर असून त्यापुढे स्वर किंवा मृदु व्यंजन अर्थात प्रत्येक वर्गाचे तिसरे, चौथे व पाचवे व्यंजन आणि य, र, ल, व, ह यापैकी कोणतेही व्यंजन आल्यास विसर्गाचा 'र्' होतो. उदा. – हरिः+अवदत्=हरिरवदत् । भानुः+उदेति=भानुरुदेति। दोषैः+एतैः=दोषैरेतैः, गुरोः+भाषणम्=गरोर्भाषणम्, हरिः+वदति=हरिर्वदति ।

☞ **लक्षात असू द्या** - र् पुढे र् आल्यास पहिल्या र् चा लोप होतो व त्यापूर्वी (अगोदर) असलेले अ,इ,उ हे ऱ्हस्व स्वर दीर्घ होतात. भूपतिः+रक्षति=भूपतिर्+रक्षति=भूपती रक्षति ।

# सदोतिसावा पाठ

## १. उदाहरण वाक्ये

१. स पठित्वा आगच्छति = तो शिकून येतो. २. स पाठं पठित्वा आगच्छति = तो पाठ शिकून येतो. ३. स पाठं पठित्वा गृहम् आगच्छति = तो पाठ शिकून घरी येतो. ४. अहं पाठं पठित्वा आगमिष्यामि = मी पाठ शिकून येईल. ५. ते पाठं पठित्वा गतवन्तः = ते पाठ शिकून गेले. ६. वयं पाठं पठित्वा आगतवन्तः = आम्ही पाठ शिकून आलो. ७. त्वं स्नानं कृत्वा आगच्छ = तू स्नान करुन ये. ८. भवतः किं नाम अस्ति = आपले नाव काय आहे? ९. स वस्त्राणि क्रीणाति = तो कपडे विकत घेतो. १०. ते धर्मं जानन्ति = ते धर्म जाणतात.

## २. मराठी भाषेत भाषांतर करा.

१. स स्नात्वा विद्यालयं गच्छति । २. स पठित्वा, लिखित्वा, खादित्वा, जलं पीत्वा चात्र आगच्छति । ३. रामः फलानि विक्रीय, धनम् आदाय, शत्रून् प्रहृत्य, गृहम् आगम्य च तिष्ठति । ४. तव किं नाम अस्ति? ५. श्रीमन्, मम नाम देवदत्तः अस्ति । ६. तस्य किं नाम अस्ति? ७. तस्य नाम यज्ञदत्तः अस्ति । ८. तस्याः किं नाम? ९. तस्याः नाम रमा अस्ति । १०. पक्षिणः व्योम्नि डयन्ते । ११. सर्वेषु प्रेम कुर्यात् । १२. एतत् कर्म कः कर्तुं शक्नोति? १३. रामः मम अग्रजः अस्ति रमा च ममाग्रजा । १४. रामः वस्त्राणि क्रीणातु अक्रीणात् वा । १५. रामः धर्मं जानाति, जानातु, अजानात् वा । १६. स धनं गृह्णाति, गृह्णातु, अगृह्णात् वा ।

## ३. संस्कृत भाषेत भाषांतर करा -

क) १. तो स्नान करुन शाळेत जातो. २. तो स्नान करुन शाळेत गेला. ३. आम्ही सुद्धा स्नान करुन मंदिरात जातो. ४. हा मुलगा धडा वाचून, लेख लिहून आणि जेवण करुन शाळेत जातो. ५. तो मुलगा स्नान करुन, देवाला व वडिलांना नमस्कार करुन आणि पुस्तके घेऊन शाळेत गेला । ६. राम अनुभव घेऊन सांगतो.

ख) १. आपले नाव काय आहे? २. श्रीमान, माझे नाव रामचंद्र आहे. ३. त्याचे नाव विष्णुप्रिय आहे. ४. सर्वांवर स्नेह करा. ५. आकाश स्वच्छ आहे. ६. तो हे काम करतो. ७. आजोबा, मामा आणि काका बाहेर गेले. ८. माझी धाकटी बहिण हुशार आहे. ९. त्यांचा नातु हे काम करु शकतो. १०. तुझा भाऊ सुद्धा हुशार आहे. ११. माझी बहिण तिच्या सासऱ्यांबरोबर गेली. १२. शंभर मुले खेळत आहे. १३. हजार घरे तेथे आहेत. १४. (एक) लाख माळा तयार करा. १५. रावणाची सात कोटी घरे सोन्याची होती.

ग) १. तो पुस्तके विकत घेतो. २. तू फळे विकत घेतोस. ३. मी कपडे विकत घेतो. ४. त्याने पुस्तके विकत घेतली. ५. तो धर्म जाणतो. ६. तू सुद्धा धर्म जाण. ७. मी ज्ञान ग्रहण करतो.

## ४.

| अशुद्ध वाक्य | शुद्ध वाक्य | नियम |
|---|---|---|
| रामः अनुभूत्वा कथयति । | रामः अनुभूय कथयति । | समासेऽनञ्पुर्वे क्त्वो ल्यप्। |

## ५. स्वाध्याय

अ = ३ ग मधील वाक्यांना बहुवचनामध्ये परिवर्तित करा.

आ = नामन्, व्योमन्, प्रेमन् या शब्दांची संपूर्ण विभक्तीरूपे लिहा.

इ = क्री, ग्रह् व ज्ञा या धातुंच्या लट्, लोट् व लङ् लकारांची संपूर्ण रूपे लिहा.

ई = पठ्, गम्, हस्, लिख्, पा, स्ना या धातुंपासून होणारी त्वान्त अव्यये लिहा.

६. **रूपे ओळखा** - प्रेम, कर्मसु, कृत्वा, लिखित्वा, आगम्य ।

७. **संधी करा** - मुनिः + आगच्छति । शिशुः+आगच्छत् । पितुः+इच्छा। वधूः+एषा। हरेः+द्रष्टव्यम् । भूपतिः + जयति । नृपतिः+रक्षति ।

# अष्टात्रिंशः पाठः

**नामानि** = पाचकः = आचारी, स्वयंपाकी शाकः = भाजी सूप = आमटी, (वरण) मिष्टान्नम् = मिष्टान्न, गोड पदार्थ भक्तम् = भात पायसम् = खीर नवनीतम् = लोणी घृतम् = तूप लवणम् = मीठ रोटिका = पोळी लप्सिका = शिरा, लाप्सी शर्करा = साखर सुत्रिका = शेवई

**सर्वनाम** = कति = किती

**विशेषणानि** = अधिकम् = अधिक न्यूनम् = कमी अल्पम् = थोडे, क्षुल्लक

**अव्ययानि** = यदि = जर, जरी तर्हि = तर, तरी, तर मग, तसे असेल तर पुनः = पुन्हा

☞ **संकेत** = पाचकः ते सुपः देववत्, मिष्टान्नम् ते लवणम् वनवत्, रोटिका ते सूत्रिका मालावत्

☞ **व्याकरण** (उपानह्, क्रि धातु, तव्य, अनीय, विसर्ग संधी)

१. उपानह् शब्दाची संपूर्ण विभक्तीरूपे पाठ करा. पहा परिशिष्ट शब्दरूपसंख्या २९.
२. क्री, ग्रह व ज्ञा या धातुंची विधिलिङ् व लृट् लकारांची संपूर्ण रूपे पाठ करा. पहा परिशिष्ट धातुरूपसंख्या ४१, ४२,४३.
३. जर–तर, जरी–तरी या अर्थासाठी यदि–तर्हि या अव्ययांचा प्रयोग करतात. उदा. यदि स अध्ययनं कुर्यात तर्हि उत्तीर्णं भवेत् = तो अभ्यास करील तर पास होईल.
४. 'कति' ह्या शब्दाची रूपे बहुवचनात चालतात. कति शब्दाची प्रथमा, द्वितीया याप्रमाणे क्रमशः विभक्तीरूपे पुढील प्रमाणे – कति (प्रथमा) कति (द्वितीया) कतिभिः (तृतीया) कतिभ्यः (चतुर्थी) कतिभ्यः (पंचमी) कतीनाम् (षष्टी) कतिषु (सप्तमी)

**तव्यत्तव्यानीयरः** = एखादी वस्तु, व्यक्ती इत्यादींची योग्यता, पात्रता, शक्यता इत्यादी विधिलिङ् लकाराच्या विविध अर्थाच्या छटा व्यक्त करण्यासाठी धातुंना तव्य किंवा अनीय प्रत्यय लागून बनलेल्या विध्यर्थ धातुसाधित विशेषणाचा प्रयोग करतात.

### तव्य किंवा अनीय विध्यर्थ धातुसाधित विशेषणे बनविण्याचा उपाय.

१. तव्य किंवा अनीय प्रत्यय लागतांना धातुंच्या अन्त्य स्वरास किंवा उपान्त्य (शेवटच्या वर्णाच्या जवळच्या) ऱ्हस्व स्वरास गुण होतो. काही धातुंना लागणाऱ्या तव्य प्रत्ययाला इडागम ('इ' आगम होतो)

| 'तव्य' | | | 'अनीय' | | |
|---|---|---|---|---|---|
| कृ+तव्य | = कर्तव्य | = करावे, केले पाहिजे, करण्यास योग्य, करण्याजोगे | कृ+अनीय | = करणीय | = करावे, केले पाहिजे, करण्यास योग्य, करण्याजोगे |
| लिख्+तव्य | = लेखितव्य | = लिहावे, लिहिले पाहिजे, लिहिण्यास योग्य , लिहिण्याजोगे | लिख+अनीय | = लेखनीय | = लिहावे, लिहिले पाहिजे, लिहिण्यास योग्य, लिहिण्याजोगे |
| पठ्+तव्य | = पठितव्य | = शिकावे/वाचावे, शिकले पाहिजे, शिकण्यास योग्य, शिकण्याजोगे | पठ+अनीय | = पठनीय | = शिकावे/वाचावे, शिकले पाहिजे, शिकण्यास योग्य , शिकण्याजोगे |

हृ= हर्तव्य, हरणीय; स्मृ = स्मर्तव्य, स्मरणीय; गम्=गन्तव्य, गमनीय; खाद्=खादितव्य, खादनीय; ब्रू =वक्तव्य, वचनीय दृश्=दृष्टव्य, दर्शनीय; वन्द्=वन्दितव्य, वन्दनीय इत्यादी.

### तव्य किंवा अनीय प्रत्ययान्त विध्यर्थ धातुसाधित विशेषणाचा प्रयोग -

सकर्मक धातुपासून बनलेल्या तव्य किंवा अनिय प्रत्ययान्त विध्यर्थ धातुसाधित विशेषणाचा प्रयोग झाल्यास वाक्यरचनेत कर्मणि प्रयोग असतो. अर्थात कर्त्याची तृतीया व कर्माची प्रथमा विभक्ती होते आणि कर्माच्या लिंग–विभक्ती–वचनाप्रमाणे त्या विध्यर्थ धातुसाधित विशेषणाचे लिंग–विभक्ती–वचन असतात. म्हणून तव्य किंवा अनीय प्रत्ययान्त विशेषणांना कर्मणि विध्यर्थ धातुसाधित विशेषणे म्हणतात.

| तव्य | | अनिय | विधिलिङ् |
|---|---|---|---|
| उदा. तेनः वेदः पठितव्यः | = त्याने वेद वाचला पाहिजे | = तेन वेदः पठनीयः । | स वेदं पठेत् । |
| तेन गीता पठितव्यः | = त्याने गीता वाचली पाहिजे | = तेन गीता पठनीया। | स गीतां पठेत् । |
| तेन पुस्तकं पठितव्यम् | = त्याने पुस्तक वाचले पाहिजे | = तेन पुस्तकं पठनीयम् । | स पुस्तकं पठेत । |
| मया भोजनं कर्तव्यम् | = मी जेवण केले पाहिजे | = मया भोजनं करणीयम् । | अहं भोजनं कुर्याम् । |
| त्वया पुस्तकानि पठितव्यानि | = तू पुस्तक वाचली पाहिजे | = त्वया पुस्तकानि पठनीयानि । | त्वम् पुस्तकानि पठेः । |

अकर्मक धातुपासून बनलेल्या तव्य किंवा अनीय प्रत्ययांत धातुसाधित विशेषणाचा प्रयोग झाल्यास कर्त्याची तृतीया विभक्ती होते आणि ते विध्यर्थ धातुसाधित विशेषण नपुंसकलिंगी प्रथमा विभक्ती एकवचनी राहते. उदा.–तेन हसितव्यम्=त्याच्याकडून हसले गेले पाहिजे = तेन हसनीयम्

**संधी-(विसर्जनीयस्य सः)** = १. विसर्गाच्या अगोदर (पूर्वी) कोणताही स्वर असून त्यापुढे (त्यानंतर) च किंवा छ आल्यास विसर्गाचा 'श्' होतो. उदा. = नृपः+चलति = नृपश्चलति । कतिभिः छात्रैः = कतिभिश्छात्रैः ।
२. विसर्गाच्या अगोदर कोणताही स्वर असून त्यापुढे (त्यानंतर) ट किंवा ठ आल्यास विसर्गाचा 'ष्' होतो.
उदा. पतञ्जलेः+टीका = पतञ्जलेष्टीका । भीतः+ टलति = भीतष्टलति ।
३. विसर्गाच्या अगोदर कोणताही स्वर असून त्यापुढे त किंवा थ आल्यास विसर्गाचा 'स्' होतो.
उदा. रामः+तरति= रामस्तरति । भानुः+तपति=भानुस्तपति ।

# अडोतिसावा पाठ

१. **उदाहरण वाक्ये**

१. त्वया पुस्तकं पठितव्यम् = तुझ्याकडून पुस्तक वाचले गेले पाहिजे (तू पुस्तक वाचले पाहिजे) २. मया लेखः लेखितव्यः = माझ्याकडून लेख लिहिला गेला पाहिजे. ३. अस्माभिः गीता पठतव्या पठनीया वा = आमच्याकडून गीता वाचली गेली पाहिजे. ४. युष्माभिरन्नत् कार्यं करणीयम् = युष्माभिः तत् कार्यं करणीय् = तुमच्याकडून ते काम केले गेले पाहिजे. ५. स वस्त्रं क्रीणीयात् = त्याने कपडे विकत घेतले पाहिजे. ६. स वस्त्रं क्रेष्यति = तो कपडे विकत घेईल. ७. पाचकः किं पचति = आचारी काय शिजवित आहे? ८. एतत् पुस्तकं पठनीयम् अस्ति = हे पुस्तक वाचण्यास योग्य / वाचण्याजोगे आहे.

२. **मराठी भाषेत भाषांतर करा.**

१. तेनात्र पुस्तकं पठितव्यम् । २. ताभ्यामपि पुस्तकानि पठितव्यानि । ३. तैरप्याधिकानि पुस्तकानि पठितव्यानि । ४. तेनाप्यात्रैव पुस्तकं पठनीयम् । ५. मया मोदकं खादितव्यम् । ६. तेन ग्रामः गन्तव्यः । ७. त्वयापि ग्रामः गन्तव्यः । ८. तेन फलं खादितव्यम् । ९. मयापि फलं खादितव्यम् । १०. मया लेखाः लेखनीयाः । ११. अस्माभिरपि लेखाः लेखनीयाः । १२. अस्माभिः सदा सत्यं वक्तव्यम् । १३. स कतिभ्यश्छात्रेभ्यः पक्वानं यच्छति । १४. पाचकः सूपं शाकं च पचति । १५. गुरुः शिष्येभ्यः मिष्टान्नं यच्छति । १६. शाके लवणं न्यूनमस्ति । १७. भक्तं गृह्णातु । १८. अल्पं ददातु । १९. भवान् पुनः किञ्चित् पायसं गृह्णातु । २०. अलं पायसेन । २१. स पुस्तकं क्रीणीयात् । २२. स धर्मं जानीयात् । २३. त्वं उपानहौ क्रीणीयाः । २४. अहं पुस्तकं क्रेष्यामि । २५. आवां फलानि क्रेष्यावः । २६. अहं धर्मं ज्ञास्यामि. २७. पाचकः तण्डुलान् ओदनं पचति ।

३. **संस्कृत भाषेत भाषांतर करा -**

क) १. त्याच्याकडून खरे बोलले गेले पाहिजे. २. त्याच्याकडून वडिलांना नमस्कार केला गेला पाहिजे. ३. तुझ्याकडून देवाचे स्मरण केले गेले पाहिजे. ४. आमच्याकडून सुद्धा देवाचे स्मरण केले गेले पाहिजे. ५. मुलांनी पोळी–भाजी, आमटी–भात व फळे खाल्ली पाहिजे. ४. अधिक साखर खाऊ नये. ७. नेहमी खरे बोलावे. ८. त्याला शिरा आवडतो. ९. तुला शेवया आवडतात का? १०. आई मुलांना खाण्यासाठी लोणी देते. ११. आज भाजीत मीठ जास्त आहे. १२. तुप पुरे. (अलम्)

ख) १. त्याने पुस्तके विकत घेतली पाहिजे, तू विकत घेतली पाहिजे आणि मी सुद्धा विकत घेतली पाहिजे. २. त्याने ज्ञान ग्रहण केले पाहिजे, तू ग्रहण केले पाहिजे आणि मी सुद्धा ग्रहण केले पाहिजे. ३. त्याने धर्म जाणला पाहिजे, तू जाणला पाहिजे आणि मी सुद्धा जाणला पाहिजे. ४. तो कपडे विकत घेईल, तू विकत घेशील आणि मी सुद्धा विकत घेईन. ५. तो ज्ञान ग्रहण करील, तू ग्रहण करशील आणि मी ग्रहण करीन. ६. तो सत्य जाणेल, तू जाणशील आणि मी सुद्धा जाणेल.

४.

| अशुद्ध वाक्य | शुद्ध वाक्य | नियम |
|---|---|---|
| स सत्यं वक्तव्यः । | तेन सत्यं वक्तव्यम् । | तव्य आणि अनीय प्रत्ययान्त धा.वि. चा प्रयोग |
| अद्य शाकं लवणम् अधिकम् । | अद्य शाके लवणम् अधिकम् । | सप्तम्यधिकरणे च। |

५. **स्वाध्याय**

अ = ३ ख मधील वाक्यांना बहुवचनामध्ये परिवर्तित करा.

आ = लिख्, पठ्, ब्रू, हृ, स्मृ या धातुंपासून विध्यर्थ धातुसाधित विशेषणे तयार करा.

६. **रूपे ओळखा** - लेखनीयः गन्तव्यम्, हर्तव्यम्, कर्तव्यम्, क्रेष्यन्ति ।

७. **संधी करा** - रामः + चलति । तैः+छात्रैः । बालकः + टीकते । सज्जनः + तरति ।

८. **रिकाम्या जागी खालील कंसात दिलेल्या शब्दाचे योग्य विभक्ती रूप लिहा. -**

(अधिक, बालक, भोजन, नदी, मूर्धन्)

१. स.......................... लाप्सिकां ददाति ।

२. तस्य ........................ शिलां पतत् ।

३. स जलाय ..................... गच्छति ।

४. तेनाद्य ....................... शर्करा खादिता ।

५. तैः न्यूनं ......................... कृतम् ।

# एकोणचत्वारिंशः पाठः

**नामानि** = वासरः = वार यानम् = वाहन आम्रम् = आंबा दाडिमम् = डाळिंब कालिन्दम् = टरबुज द्राक्षाफलम् = द्राक्षे बदरीफलम् = बोर कदलीफलम् = केळी जम्बूफलम् = जांभूळ बिल्वफलम् = बेल खर्जूरम् = खजूर अञ्जीरम् = अंजीर नारंगम् = संत्री आताफलम् (सेवम्) = सफरचंद

**सर्वनाम** = इदम् = हा

**विशेषणानि** = श्वेतः = पांढरा रक्तः = लाल, तांबडा हरितः = हिरवा कृष्णः = काळा नीलः = निळा पीतः = पिवळा

 **संकेत** = वासरः देववत् , यानम् ते आताफलम् वनवत्

 **व्याकरण (इदम् सर्वनाम, यत् प्रत्यय, विसर्ग संधी)**

१. इदम् सर्वनामाची तिन्ही लिंगाची विभक्ती रूपे पाठ करा. पहा परिशिष्ट शब्दरूपसंख्या ४७, ४८, ४९.
२. एक व द्वि या शब्दाची तिन्ही लिंगाची रूपे पाठ करा. पहा परिशिष्ट शब्दरूपसंख्या ५३, ५४.
३. सात वारांची नावे पुढील प्रमाणे – सोमवारः, मंगलवारः, बुधवारः, बृहस्पतिवारः, शुक्रवारः, शनिवारः, रविवारः ।
४. 'यानम्' हा शब्द काही शब्दापुढे लावून विशेषनाम (वाहनवाचक शब्द) तयार करतात. उदा. – वायुयानम् = विमान
५. सध्या काही इंग्रजी शब्दांपुढे सुद्धा 'यानम्' हा शब्द जोडून वाहनवाचक शब्द बनवितात. ते कितपत योग्य आहे हा विषय विचारणीय आहे. उदा. – बसयानम् = बस जीपयानम् = जीप
६. आम्रम्, दाडिमम्, बिल्वम् या सारख्या काही फळवाचक शब्दांचा नपुंसकलिंगी प्रयोग झाल्यास त्याचा अर्थ (त्या वृक्षांचे) फळ असा होईल व आम्रः, दाडिमः, बिल्वः अशाप्रकारे पुल्लिंगी प्रयोग झाल्यास त्यांचा अर्थ (त्या आंबे, डाळिंब, बेल यांचे) झाड असा होईल.

धातुंना यत्, क्यप्, ण्यत् ही प्रत्यये लागून सुद्धा विध्यर्थ सातुसाधित विशेषणे बनवितात. या तिन्ही प्रत्ययांचा फक्त 'य' शिल्लक राहतो. **यत्** प्रत्यय लागल्यावर धातुच्या अन्त्य किंवा उपान्त्य ऱ्हस्व स्वरास गुण होतो. **क्यप्** प्रत्यय लागल्यावर मात्र धातुच्या **अन्त्य** किंवा **उपान्त्य** स्वरास **गुण-वृद्धि** होत नाही. **ण्यत्** प्रत्यय लागल्यावर धातुच्या **अन्त्य** स्वरास किंवा उपान्त्य अ ह्या स्वरास वृद्धि होते. कोणत्या धातुस **यत्** कोणत्या धातुस **क्यप्** व कोणत्या धातुस **ण्यत्** प्रत्यय लावावा याबद्दलच्या सखोल ज्ञानासाठी महर्षि पाणिनीय अष्टाध्यायीमधील तृतीय अध्यायातील प्रथमपदातील कृदन्त प्रकरण पहावे. त्यातील काही महत्त्वाची उदाहरणे पुढे दिली जात आहेत.

**अचो यत्** = अजन्त (अच्+अ न्त) अर्थात स्वरान्त धातुंना यत् (य) प्रत्यय लागतो.
उदा. जि* = जेय, नी = नेय, दा★ = देय, पा=पेय, ज्ञा=ज्ञेय, श्रु⅄ =श्रव्य, भू =भव्य

**एतिस्तुशास्वृदृजुषः क्यप्** = इ (जाणे) स्तु (स्तुति करणे) शास् (शासन करणे) वृ (वरण करणे) दृ=आ+दृ (आदर करणे) जुष् (सेवा करणे) या धातुंना क्यप् (य) प्रत्यय लागतो. या क्यप् च्या शिल्लक राहिलेल्या 'य' प्रत्ययाला 'त्' आगम होऊन त्याचा 'त्य' होतो.
उदा. इ=इत्य, स्तु=स्तुत्य, शास्=शिष्य ✿ वृ=वृत्य, आ+दृ=आदृत्य, जुष्=जुष्य

**ऋहलोर्ण्यत्** – ऋकारान्त व हलन्त धातुंना 'ण्यत्' (य) प्रत्यय लागतो. कृ =कार्य, हृ =हार्य, पठ् =पाठ्य, कृष् =कृष्य
'य' प्रत्ययान्त विध्यर्थ धातुसाधित विशेषणाचा प्रयोग तव्य व अनीय प्रत्ययान्त धातुसाधित विशेषणाप्रमाणे जाणावा.

**संधी - अतो रोरप्लुतादप्लुते** = विसर्गाच्या पूर्वी (अगोदर) अ असून त्यापुढे (नंतर) अ आल्यास विसर्गाचा उ होतो तो उ व अगोदरचा अ मिळून 'ओ' होतो.
उदा. – बालः+अस्ति=बाल् अः+अस्ति=बाल्+अ+उ+अस्ति+बालो+अस्ति=बालोऽस्ति⁂ याप्रमाणे
बालः+अगच्छत्=बालोऽगच्छत् । रामः+अनमत् = रामोऽनमत् ।

**हशि च** = विसर्गाच्या पूर्वी (अगोदर) अ असून त्या पुढे मृदुव्यंजन अर्थात कोणत्याही वर्गातील तिसरे, चौथे किंवा पाचवे व्यंजन तसेच य, र, ल, व आणि ह यापैकी एखादे व्यंजन आल्यास विसर्गाचा उ होतो. तो उ व पूर्वीचा (अगोदरचा) अ मिळून 'ओ' होतो.
उदा. – बालकः +गच्छति =बालको गच्छति । नृपः+जयति=नृपो जयति ।

**भोभगोअघोअपूर्वस्य योऽशि** = १) विसर्गाच्या पूर्वी (अगोदर) अ असून त्यापुढे अ व्यतिरिक्त दुसरा कोणताही स्वर आल्यास विसर्गाचा 'य्' होतो. अशाप्रकारे विसर्गापासून झालेल्या य् चा विकल्पाने लोप होतो. य चा लोप होऊन जे दोन स्वर एकत्र येतात तेव्हा पुन्हा संधी होत नाही.
उदा. – सूर्यः +उदेति=सूर्य उदेति किंवा सुर्ययुदेति ।
बालः+इच्छति = बाल इच्छति किंवा बालयिच्छति ।

२) विसर्गाच्या पूर्वी (अगोदर) आ असून पुढे कोणताही स्वर आल्यास विसर्गाचा य् होतो. अशाप्रकारे विसर्गापासून झालेल्या य् चा विकल्पाने लोप होतो. य् चा लोप होऊन जे दोन स्वर एकत्र येतात तेव्हा पुन्हा संधी होत नाही.
उदा. – जनाः+अवसन् = जना अवसन किंवा जनायवसन । नराः+ऐच्छिन् = नरा ऐच्छन् किंवा नरायैच्छन् ।

**लोपः शाकल्यस्य सर्वेषाम्** = विसर्गाच्या पूर्वी (अगोदर) आ असून त्यापुढे मृदु व्यंजन अर्थात कोणत्याही वर्गातील तिसरे, चौथे किंवा पाचवे व्यंजन तसेच य, र, ल, व आणि ह यापैकी एखादे व्यंजन आल्यास विसर्गाचा लोप होतो.
उदा. जनाः गच्छन्ति = जना गच्छन्ति । भक्ताः नमन्ति=भक्ता नमन्ति ।

---

* धातुंच्या अंती असणाऱ्या इ व ई यांना गुण होतो. अर्थात त्यांचा 'ए' होतो. ★धातुंच्या अंती असणाऱ्या आ चा ए होतो. ⅄ धातुंच्या अंती असणाऱ्या उ व ऊ यांचा गुण होऊन त्या ओ चा अव् होतो. ✿ धातुच्या आ चा ई होतो. शास् धातुस लागणाऱ्या (क्यप्) 'य' प्रत्ययाला 'त्' आगम होत नाही. धातुच्या आ चा ई होतो.
⁂ पुढच्या या पाठात दिलेल्या "एङः पदान्तादति" या संधी नियमाने पुढील 'अ' मागच्या ओ मध्ये मिळून गेलेला आहे.

# एकोनचाळीसावा पाठ

१. **उदाहरण वाक्ये**

१. तेन जलं पेयम् = त्याच्याकडून पाणी प्याले जावे. २. त्वया भाषणं श्रव्यम् = तुझ्याकडून भाषण ऐकले जावे. ३. वनेऽस्मिन् बिल्वाः कदल्यः* च सन्ति = ह्या वनात बेल व केळी (यांची झाडे) आहेत. ४. अस्मिनुद्यानयाम्राणि द्राक्षाफलानि च सन्ति = अस्मिन् उद्याने आम्राणि द्राक्षाफलानि च सन्ति = ह्या बगीच्यात आंबे व द्राक्षे (यांची फळे) आहेत. ५. अयं बालकः कुत्र गच्छति = हा मुलगा कोठे जातो? ६. अस्मिन् वने रक्तानि पुष्पाणि सन्ति = ह्या बागेत लाल फुले आहेत. ७. बाल वदति = बालःवदति = मुलगा बोलतो.

२. **मराठी भाषेत भाषांतर करा.**

१. मया जलं पेयम् । २. तेन धनं देयम् । ३. अद्य सोमवारोऽस्ति । ४. एकः बालकः एका बालिका एकं पुस्तकं चात्र सन्ति । ५. एकस्मै बालकाय एकस्यै बालिकायै एतत् फलं देहि । ६. एकस्मिन् वने व्याघ्रः वसति स्म । ७. अयं बालकोऽस्ति । ८. इयं सञ्चिकास्ति ९. वनेऽस्मिन् आम्राः दाडिमाः कदल्यः बदर्यः च सन्ति । १०. अनेन बालकेन धर्मः ज्ञेयः । ११. अस्मै बालकाय अस्यै बालिकायै च पुस्तकानि देयानि । १२. अस्मिनुद्याने जम्बूफलानि बदरीफलानि बिल्वफलानि खर्जूराणि अञ्जिराणि नारंगाणि च सन्ति । १३. सोऽपठत् । १४. बालो लिखति । १५. बालक आगच्छति . १६. वृक्षा वर्धन्ते ।

३. **संस्कृत भाषेत भाषांतर करा -**

क) १. त्याच्याकडून भाषण ऐकले जावो. २. तुझ्याकडून पाणी प्याले जावो. ३. माझ्याकडून दान दिले जावे. ४. आमच्याकडून धर्म जाणला जावो. ५. तुमच्याकडून कथा ऐकली जावो. ६. विद्यार्थ्याला हे लाल पुस्तक द्या. ७. हिमालयात सफरचंदाची झाडे आहेत. ८. तो दररोज आंबे डाळिंब टरबूज व द्राक्षे खातो ९. ह्या बागेत पांढऱ्या, निळ्या व पिवळ्या रंगाची फुले आहेत. १०. या वनात हिरव्या रंगाचे आंबे आहेत परन्तु ते गोड आहेत. ११. त्यांचा रंग काळा आहे. १२. तो विमानाने गेला. १३. आज काय वार आहे? १४. आज गुरुवार आहे. १५. एक विद्यार्थी, एक वही आणि एक पुस्तक येथे आहे. १६. एका विद्यार्थ्याला ही पुस्तके द्या.

ख) **'इदम्' सर्वनामाचा प्रयोग करा -**

१. हा मुलगा आहे. २. ही माळा आहे. ३. हे पुस्तक सुद्धा वाचण्यास योग्य आहे. ४. ह्या मुलाला ही फळे द्या. ५. ह्या मुलीला ही पुस्तके द्या. ६. ह्या मुलापेक्षा ती मुलगी अधिक हुशार आहे. ७. ह्या मुलाचे पुस्तक कोठे आहे? ८. ह्या मुलीत क्षमा आणि धैर्य आहे.

४.

| अशुद्ध वाक्य | शुद्ध वाक्य | नियम |
|---|---|---|
| १. स भाषणं श्रव्यः । | तेन भाषणं श्रव्यम् । | यत् प्रत्ययान्त वि.धा. विशेषणाचा प्रयोग । |
| २. अस्मै बालकाय अस्मै बालिकायै । | अस्मै बालकाय, अस्यै बालिकायै । | शब्दरूप । |

५. **स्वाध्याय**

अ = इदम् सर्वनामाची तिन्ही लिंगाची संपूर्ण विभक्ती रूपे लिहा.

आ = एक व द्वि या सर्वनामाची तिन्ही लिंगाची संपूर्ण विभक्तीरूपे लिहा.

६. **संधी करा -** मृगः+अगच्छत् । मृगः+धावति । मानवः+ऐच्छन् । खगाः+उड्डीयन्ते । जनाः +वसन्ति ।

* **कदल्य :** हे प्रथमा बहुवचनाचे रूप आहे. मूळ शब्द कदली आहे. तो 'नदी' या शब्दाप्रमाणे चालतो.

# चत्वारिंशः पाठः

**नामानि** = कञ्चुकः = सदरा कम्बलः = कांबळ उत्तरीयः = उपरणे (वरचे वस्त्र) पादयामः = पायजमा
अधोवस्त्रम = धोतर (खालचे वस्त्र) अङ्गप्रोक्षणम् = रुमाल मुखप्रोक्षणम् = हातरुमाल, (दस्ती)
शिरस्त्रम् = पागोटे, फेटा, टोपी शय्या = अंथरुण, पलंग, बिछाना पादत्राणम् = पादत्राण, जोडे, चप्पल वगैरे
शाटिका = साडी किरीटः = मुकुट दर्पणः = आरसा तिलकम् = टिळा, गंध मुद्रिका = अंगठी
कुण्डलः = कुंडल, कर्ण भूषण फेनिलः = साबण मासः = महिना ऋतुः= ऋतु

**सर्वनाम** = अदस् = हा, तो

☞ **व्याकरण** (अदस् सर्वनाम, त्रि ते दशन् शब्द, कर्मणी व भावे प्रयोग, ल्युट् प्रत्यय)

१. 'अदस्' सर्वनामाची तिन्ही लिंगातील संपूर्ण विभक्तीरूपे पाठ करा. पहा परिशिष्ट शब्दरूपसंख्या ५०,५१,५२.
२. त्रि व चतुर् या शब्दांची तिन्ही लिंगातील संपूर्ण विभक्तीरूपे पाठ करा. पहा परिशिष्ट शब्दरूपसंख्या ५५,५६.
३. पञ्चन्, षष्, सप्तन्, अष्टन्, नवन्, दशन् या शब्दांची तिन्ही लिंगामध्ये सारखीच (एकच) विभक्ती रूपे होतात.
४. पञ्चन्, षष्, सप्तन्, अष्टन्, नवन्, दशन् या शब्दांची संपूर्ण विभक्तीरूपे पाठ करा. पहा परिशिष्ट शब्दरूपसंख्या ५७ ते ६२.
५. सहा ऋतु पुढील प्रमाणे – १. वसन्तः २. ग्रीष्मः ३. वर्षा ४. शरद् ५. हेमन्तः ६. शिशिरः
६. बारा महिने पुढील प्रमाणे – चैत्रः, वैशाखः, जेष्ठः, आषाढः, श्रावणः, भाद्रपदः, आश्विनः, कार्तिकः, मार्गशीर्षः, पौषः, माघः, फाल्गुनः

**कर्तरि प्रयोग** = कर्तरि प्रयोगात कर्त्याची प्रथमा व कर्माची द्वितीया विभक्ती असते आणि कर्त्याच्या (लिंग) पुरुष– वचनाप्रमाणे क्रियापदाचे रूप असते. उदा. – रामः वेदं पठति = राम वेद शिकतो.

पाठकांनो, आतापर्यन्त आपण ज्या लट्, लोट्, लङ्, विधिलिङ् व लृट् या लकारांच्या वाक्यांचा अभ्यास केला, तो संपूर्ण 'कर्तरि प्रयोग' होता. आता आपल्याला कर्मणि प्रयोग व भावे प्रयोग यांच्या लट्, लोट्, लङ्, विधिलिङ् व लृट् या लकारांचा अभ्यास करावयाच्या आहे.

कर्मणि व भावे प्रयोगात लट्, लोट्, लङ्, विधिलिङ् या लकारांची रूपे बनवितांना मूळ धातुस 'य्' लागतो व त्या पुढे आत्मनेपदाचेच संक्षिप्त प्रत्यये लागतात. धातु परस्मैपदी असला तरी त्याला आत्मनेपदाचे संक्षिप्त प्रत्यये लागतात.

उदा. – लट् लकार प्रथम पुरुष एकवचन = पठ् + य् + अते = पठ्यते = शिकला जातो / वाचला जातो.
लोट् लकार प्रथम पुरुष एकवचन = पठ् + य् +अताम् = पठ्यताम् = शिकला जावो / वाचला जावो.
विधिलिङ् लकार प्रथम पुरुष एकवचन = पठ् + य् + एत = पठ्येत =शिकला जावो, शिकला गेला पाहिजे
लङ् लकार प्रथम पुरुष एकवचन = अ+पठ्+य्+अत= अपठ्यत = शिकला गेला / वाचला गेला.

वरील लकारांची राहिलेली इतर (कर्मणि प्रयोगाची) रूपे चालवा.

वरील प्रमाणे काही धातुंच्या कर्मणि व भावे लट्, लोट्, लङ्, विधिलिङ् या लकारांची रूपे (अनुक्रमे) पुढील प्रमाणे.

| | लट् | लोट् | लङ् | विधिलिङ् | लट् | लोट् | लङ् | विधिलिङ् |
|---|---|---|---|---|---|---|---|---|
| उदा. | गम् = गम्यते | गम्यताम् | अगम्यत | गम्येत । | सेव् = सेव्यते | सेव्यताम् | असेव्यत | सव्येत । |
| | हस्= हस्यते | हस्यताम् | अहस्यत | हस्येत । | त्यज= त्यज्यते | त्यज्यताम् | अत्यज्यत | त्यजेत । |
| | नम्=नम्यते | नम्यताम् | अनम्यत | नम्येत । | चिन्त = चिन्त्यते | चिन्त्यताम् | अचिन्त्यत | चिन्त्येत । |
| | दृश्=दृश्यते | दृश्यताम् | अदृश्यत | दृश्येत । | सुप् = सुप्यते | सुप्यताम | असुप्यत | सुप्येत |

साधारणपणे कर्तरि प्रयोगातील लृट् लकाराच्या ष्यति च्या जागी ष्यते किंवा स्यति च्या जागी स्यते केले तर तयार होणारे रूप हे त्या धातुच्या कर्मणि लृट् लकाराचे असते.

उदा. – पठ् = पठिष्यते = शिकले जाईल / वाचले जाईल गम् = गमिष्यते = जाईले जाईल
दा = दास्यते = दिले जाईल सेव= सेविष्यते = सेवा केली जाईल

**कर्मणि प्रयोग** = कर्मणिप्रयोगात कर्त्याची तृतीया व कर्माची प्रथमा विभक्ती असते आणि कर्माच्या (लिंग) पुरुष–वचनाप्रमाणे क्रियापदाचे रूप असते.

| | कर्मणि प्रयोग | कर्तरी प्रयोग |
|---|---|---|
| उदा. – | रामेण वेदः पठ्यते = रामाकडून वेद वाचला जातो. | रामः वेदं पठति = राम वेद वाचतो. |
| | छात्रैः त्वं सेव्यसे = विद्यार्थ्यांकडून तू सेविला जातोस. | छात्राः त्वां सेवन्ते = विद्यार्थी तुझी सेवा करतात. |
| | जनैः वयं दृश्यामहे = लोकांकडून आम्ही पाहिले जातो. | जनाः अस्मान् पश्यन्ति = लोक आम्हाला पाहतात. |

**भावे प्रयोग** = भावे प्रयोगात कर्त्याची तृतीया विभक्ती असते आणि क्रियापद (नपुंसकलिंगी) प्रथम पुरुषी एकवचनी असते. भावे प्रयोगामध्ये धातुच्या कर्मणि लकाराच्या प्रथमपुरुषी एकवचनी रूपाचा प्रयोग करतात. संस्कृतमध्ये अकर्मक धातुंचा प्रयोग झाला तरच भावे प्रयोग होतो. उदा. तेन हस्यते = त्याच्याकडून हसले जाते. मया हस्यते = माझ्याकडून हसले जाते.

☞ कर्मणि प्रयोगामध्ये ऱ्हस्व ऋकारान्त धातुच्या ऋ च्या पूर्वी (अगोदर) संयुक्त व्यंजन नसेल तर ऋ चा 'रि' होतो = कृ=क्रियते
☞ कर्मणि प्रयोगामध्ये दा, पा, स्था अशा काही आकारान्त धातुच्या 'आ' चा 'ई' होतो=दा=दीयते, पा=पीयते, स्था=स्थीयते।

**ल्युट् च** = धातुंना ल्युट् प्रत्यय लावून भाववाचक नाम तयार करतात. ल्युट् चा 'अन' शिलक राहतो . त्याची रूपे फक्त नपुंसक लिंगातच चालतात. उदा. कृ+अन=करणम्, लिख्=लेखनम्, पठ्=पठनम्, गम्=गमनम्, स्था=स्थानम्, स्ना=स्नानम् ।

# चाळीसावा पाठ

## १. उदाहरण वाक्ये

१. रामेण वेदः पठ्यते = रामाकडून वेद शिकला जातो / वाचला जातो । २. मया वेदः पठ्यते = माझ्याकडून वेद शिकला जातो / वाचला जातो. ३. त्वया जनकः नम्यते = तुझ्याकडून वडिलांना नमस्कार केला जातो. ४. अस्माभिः जनकः नम्यते = आमच्याकडून वडिलांना नमस्कार केला जातो. ५. ईश्वरेण ते रक्ष्यन्ते = ईश्वराकडून त्यांचे रक्षण केले जाते. ६. ईश्वरेण ते रक्ष्येरन् = ईश्वराकडून त्यांचे रक्षण केले जावो. ७. असौ बालकः गच्छति = हा मुलगा जातो / तो मुलगा जातो । ८. अदः पुष्पं पतति = हे पान पडते । ९. अमुं कञ्चुकं पश्य = हा सदरा पहा. १०. अमुष्य बालकस्य लेखनं सुंदरमस्ति = ह्या मुलाचे लेखन (लिहिणे) सुंदर आहे.

## २. मराठी भाषेत भाषांतर करा.

१. त्वया वेदः पठ्यते । २. बालकेन गुरुः नम्यते । ३. छात्रैः गुरुः नम्यते । ४. रामेण बालकाय धनं दीयते । ५. जनकेन भोजनं क्रियते । ६. त्वया मया च भोजनं क्रियते । ७. अस्माभिरपि भोजनं क्रियते । ८. देवदत्तेन पुस्तकं पठ्यते । ९. शिशुना सुप्यते । १०. शिशुभिस्सुप्यते । ११. मित्रेण त्वं त्यज्यसे । १२. मया सत्यं भाष्यते । १३. जनै र्दृश्यामहे । १४. शिष्यैर्नम्यामहे । १५. वर्षे षड् ऋतवः सन्ति द्वादश मासाः च । १६. असौ बालकः कुत्र गच्छति । १७. अमुं छात्रं पश्य । १८. अमुना बालकेन सह कः अस्ति ? १९. अमुष्य छात्रस्य समीपे कम्बलाः सन्ति । २०. अमुष्याः बालिकायाः समीपे रक्ता शाटिका अस्ति । २१. त्रयः छात्राः, तिस्रः बालिकाः, त्रीणि पुस्तकानि चात्र सन्ति । २२. पञ्च बालकाः कुत्र गच्छन्ति? २३. अमीभिः दशभिः छात्रैः सत्यं बुध्येत । २४. तेन वेदाः अपठ्यन्त । २५. अस्माभिरपि वेदाः अपठ्यन्त । २६. तत्र रक्तानि पुष्पाणि सन्ति ।

## ३. संस्कृत भाषेत भाषांतर करा -

क) १. माझा सदरा पांढरा आहे. २. त्याचा हातरुमाल कोठे आहे? ३. त्यांच्याजवळ कांबळ, चादर, धोतर, आंगरखा आणि पायजमा आहे. ४. तिची साडी पिवळी आहे. ५. अंथरुण तिकडे ठेव. ६. तो कपाळावर टिळा लावतो (धारृ). ७. राजाच्या डोक्यावर मुकुट आहे. ८. सीतेच्या कानात कुण्डलं आहेत. ९. तो आरशात मुख पाहतो. १०. ही स्त्री साबणाने कपडे धुते. ११. त्याचा फेटा पांढरा आहे.

ख) १. हा मुलगा हुशार आहे. २. ती मुलगी ते पुस्तक वाचते: ३. ह्या मुलाबरोबर त्याचा भाऊ जात आहे. ४. ह्या मुलाला आणि ह्या मुलीला फळे द्या. ५. ती त्याची धाकटी बहिण आहे. ६. तिन मुले आणि तिन मुली ती पुस्तके वाचतात. ७. चार मुलांना आणि चार मुलींना ही पुस्तके द्या. ८. तो पाच मुलांना फळे देतो. ९. त्याने सहा मुलींना पुस्तके दिली. १०. तू नऊ विद्यार्थ्यांना ज्ञान दिलेस.

ग) १. मुलाकडून वेद वाचला जातो. २. त्याच्याकडून पुस्तके वाचली जातात. ३. त्याच्याकडून धन त्यागिले जाते. ४. तू राजाकडून रक्षिला जातो. ५. आमच्याकडून सत्य बोलले जावो (भाष्). ६. आम्ही ईश्वराकडून रक्षिले जावो.

## ४.

| अशुद्ध वाक्य | शुद्ध वाक्य | नियम |
|---|---|---|
| बालकः वेदं पठ्यते । | बालकेन वेदः पठ्यते । | कर्मणि प्रयोग । |

## ५. स्वाध्याय

अ = अदस् शब्दाची तिन्ही लिंगातील संपूर्ण विभक्तीरूपे लिहा.

आ = त्रि व चतुर या शब्दांची तिन्ही लिंगातील संपूर्ण विभक्तीरूपे लिहा.

इ = पठ्, गम्, हस्, चिन्त्, रम् या धातुंच्या कर्मणि लट् व लङ् लकारांची संपूर्ण रूपे लिहा.

## ६. रूपे ओळखा - असौ, अमुष्यै, सेव्यते, गम्यताम्, बुध्यताम् ।

# संधी विचार

**॥ अथ शब्दानुशासनम् ॥**

**अइउण् १ । ऋलृक् २ । एओङ् ३ । ऐऔच् ४ । हयवरट् ५ । लण् ६ । ञमङणनम् ७ । झभञ् ८ ।**

**घढधष् ९ । जबगडदश् १० । खफछठथचटतव् ११ । कपय् १२ । शषसर् १३ । हल् १४ । इति प्रत्याहार सूत्राणि ।**

वरील शब्दानुशासनाचे चौदा सूत्रांतील हलन्त्य (ण्, क्, ङ्, च्, ट्, ण्, म्, ञ्, ष्, श्, व्, य्, र्, ल्) अक्षरांना सोडून कोणतेही एक अक्षर घेऊन त्यापुढे वरील (कोणताही) हलन्त्य वर्ण जोडावा. उदा. – अ+ण्=अण्, अ+क्=अक् अशा प्रकारे जो उपयुक्त शब्द तयार होईल, त्यास प्रत्याहार असे म्हणतात. प्रत्यहारातील कोणतेही शेवटचे अक्षर हलन्त्यच असणार. म्हणून त्यास हलन्त्य (वाच्, मरुत्, भूभृत्, ) नामाप्रमाणे चालवावे.

उदा. – भूभृत् भूभृतौ भूभृतः अशाप्रकारे अक् अकौ अकः चालविल्यावर त्याची विभक्ती रुपे तयार होतात. त्या विभक्तीरुपांची अर्थप्रक्रिया करतांना पञ्चमी, षष्ठी, प्रथमा व सप्तमी अशा प्रकारे रचना करावी. षष्ठीचा अर्थ स्थानवाचक धरावा. सप्तमीचा अर्थ पररूप वाचक धरावा, अशा पद्धतीने सूत्राचा अर्थ करावा. उदा. इकोऽयणचि या सूत्रामध्ये इकः ही षष्ठी विभक्ती आहे. यण् ही प्रथमा विभक्ती आहे अचि ही सप्तमी विभक्ती आहे. वरील निर्देशाप्रमाणे इकः, **अचि, यण् (स्यात्)** अशा प्रकारे रचना करावी. अर्थात इकः (इ, उ, ऋ, लृ) म्हणजे इक् च्या स्थानी अच् (अ इ उ ऋ लृ ए ओ ऐ औ) पर (पुढे) असतांना यण् (य व र ल) प्रत्यहार होवो. अर्थात इ, उ, ऋ, लृ च्या जागी अनुक्रमे य व र ल होवो. अशाप्रकारे सूत्रार्थ करण्याची पद्धत आहे. ज्या सूत्राचा आपण अर्थ करणार आहोत, त्या सूत्रामध्ये इतर सूत्रांवरुन (पाठिमागून) येणारी (सूत्राची) अनुवृतीचा सुद्धा विभक्तीअर्थ करुन वरील निर्देशाप्रमाणे सूत्रामध्ये मिळविणे असे केल्यावर त्या सूत्राचा पूर्ण अर्थबोध होईल. याप्रमाणे खालील संधीमध्ये येणाऱ्या सूत्रांचा अर्थ करावा. न कळल्यास संस्कृत व्याकरणविशेष सुज्ञांचे मार्गदर्शन घ्यावे.

**१. मोऽनुस्वारः** = पदान्त अर्थात शब्दरूपाच्या किंवा धातुरूपाच्या शेवटील 'म्' (हलन्त म) च्या पुढे कोणतेही व्यंजन आल्यास 'म्' चा अनुस्वार होतो. 'म्' पुढे स्वर आल्यास मात्र 'म्' चा अनुस्वार होत नाही.

उदा. – त्वम् पठसि= त्वं पठसि । अहम् पठामि = अहं पठामि ।

**२. एतत्तदोः सुलोपः** ===== सः आणि एषः यांच्या पुढे कोणतेही व्यंजन आल्यास यांच्या विसर्गाचा लोप होतो.

उदा. : सः गच्छति= स गच्छति (तो जातो) एषः गच्छति = एष गच्छति हा जातो

**३. अकः सवर्णे दीर्घः** = (१) अ किंवा आ यांच्यापुढे अ किंवा आ आल्यास त्या दोहोंबद्दल 'आ' होतो. उदा. तत्र+अस्ति = तत्रास्ति । तव+आसनम् = तवासनम् । माला + अरय = मालारय । सीता+आगता = सीतागता (२) इ किंवा ई यांच्या पुढे इ किंवा ई आल्यास त्या दोहोंबद्दल 'ई' होतो.

उदा. – पठामि+इदानीम् = पठामीदानीम् । गिरि+ईशः = गिरीशः । दासी+इच्छति=दासीच्छति । पार्वती+ईशः=पार्वतीशः

(३) उ किंवा ऊ यांच्या पुढे उ किंवा ऊ आल्यास त्या दोहोंबद्दल 'ऊ' होतो उदा. साधु+उपदेशः= साधूपदेशः । लघु+ऊर्णा=लघूर्णा । भू+उध्दारः=भूध्दारः । वधू+ऊहा=वधूहा (४) ऋ किंवा ॠ यांच्यापुढे ऋ किंवा ॠ आल्यास त्या दोहोंबद्दल 'ॠ' होतो. उदा. पितृ+ऋण=पितॄण वरीलप्रमाणे होणाऱ्या संधीस 'दीर्घदेश संधी' असे म्हणतात.

**४. आद् गुणः : (१)** अ किंवा आ ह्या स्वरांपुढे इ किंवा ई आल्यास मागील व पुढील दोन्ही स्वरांबद्दल 'ए' होतो.

उदा. तव+इच्छा = तवेच्छा । ज्ञान+ईश्वरः=ज्ञानेश्वरः । वसुधा + इच्छति = वसुधेच्छति । रमा+ईशः = रमेशः

(२) अ किंवा आ ह्या स्वरांपुढे उ किंवा ऊ आल्यास मागील व पुढील दोन्ही स्वरांबद्दल 'ओ' होतो.

उदा. सूर्य+उदयः=सूर्योदयः । नव+ऊढा = नवोढा । महा + उत्सवः = महोत्सवः गङ्गा+ऊर्मयः=गङ्गोर्मयः ।

(३) अ किंवा आ ह्या स्वरांपुढे ऋ किंवा ॠ आल्यास मागील व पुढील दोन्ही स्वरांबद्दल 'अर्' होतो.

उदा. – देव+ऋषिः = देवर्षिः । महा+ऋषिः = महर्षिः ।

(४) अ किंवा आ ह्या स्वरांपुढे लृ आल्यास मागील व पुढील दोन्ही स्वरांबद्दल 'अल्' होतो.

उदा. – तव+लृकारः = तवल्कारः

वरीलप्रमाणे होणाऱ्या संधीस 'गुणादेश संधी' असे म्हणतात.

**५. वृद्धिरेचि (१)** अ किंवा आ ह्या स्वरांपुढे ए किंवा ऐ आल्यास मागील व पुढील दोन्ही स्वराबद्दल 'ऐ' होतो. उदा. तव+एव = तवैव। तव+ऐश्वर्यम्=तवैश्वर्यम् । सदा+एव = सदैव । यथा+ऐश्वर्यम्=यथैश्वर्यम् ।

(२) अ किंवा आ ह्या स्वरांपुढे ओ किंवा औ आल्यास मागील व पुढील दोन्ही स्वरांबद्दल 'औ' होतो.
उदा. मधुर+ओदनः = मधुरोदनः । तव+औदार्यम् =तवौदार्यम् । गङ्गा+ओघः=गंङ्गौघः । दिव्या+औषधिः=दिव्यौषधि (३) काही थोड्या शब्दात अ ह्या स्वरांपुढे ऋ आल्यास मागील व पुढील दोन्ही स्वरांबद्दल 'अर्' होतो. प्र+ऋणम्=प्रार्णम् । सुख+ऋतः=सुखार्तः । कम्बल+ऋणम्=कम्बलार्णम् । वसन+ऋणम् = वसनार्णम् ।
वरीलप्रमाणे होणाऱ्या संधीस 'वृध्द्यादेश संधी' असे म्हणतात.

**६. इकोयणचि** (१) इ किंवा ई यांच्यापुढे इ किंवा ई यांच्या व्यतिरिक्त कोणताही स्वर आल्यास इ किंवा ई बद्दल 'य्' होतो. उदा. प्रीति+अर्थम् = प्रीत्यर्थम् । नदी+अम्बु = नद्यम्बु । पठति+एव= पठत्येव ।
(२) उ किंवा ऊ यांच्या पुढे उ किंवा ऊ यांच्या व्यतिरिक्त कोणताही स्वर आल्यास उ किंवा ऊ बद्दल 'व्' होतो.
उदा. पठतु+अत्र = पठत्वत्र । मधु+अरिः = मध्वरिः । चमू+ऐक्यम् = चम्वैक्यम् ।
(३) ऋ किंवा ॠ यांच्या पुढे ऋ किंवा ॠ यांच्याव्यतिरिक्त कोणताही स्वर आल्यास ऋ किंवा ॠ बद्दल 'र्' होतो.
उदा. – पितृ+आ=पित्रा । धातृ+अंशः= धात्रंशः । मातृ+अर्थम् = मात्रर्थम्
(४) ऌ ह्या स्वरापुढे ऌ ह्या स्वराव्यतिरिक्त कोणताही स्वर आल्यास ऌ बद्दल 'ल्' होतो.
उदा. – ऌ+आकृतिः = लाकृतिः
वरीलप्रमाणे होणाऱ्या संधीस 'यणादेश संधी' असे म्हणतात.

**७. एचोऽयवायावः** (१) ए, ओ, ऐ आणि औ यांच्या पुढे कोणताही स्वर आला असता ए बद्दल अय्, ओ बद्दल अव्, ऐ बद्दल आय् व औ बद्दल आव् असे आदेश होतात.
उदा. ने+अनम् = नयनम् । नै + अकः = नायकः । भो+अति= भवति । पौ+अकः = पावकः

**८. एङः पदान्तादति** = पदाच्या अर्थात शब्दरूपाच्या किंवा धातुरूपाच्या शेवटी ए किंवा ओ असून त्यापुढे अ आल्यास तो अ मागील स्वरात (ए किंवा ओ) मध्ये मिळून जातो म्हणजे त्याचा उच्चार होत नाही. अथवा तो लिहितही नाहीत; त्याच्याबद्दल 'ऽ' असे चिन्ह (द्विखण्ड चिन्ह) बहुधा लिहितात. ह्या संधीस पूर्वरूप संधी असे म्हणतात. उदा. एते + अत्र = एतेऽत्र । देवो + अयम् = देवोऽयम् ।

**९. स्तोः श्चुना श्चुः** =
१) 'स्' च्या अगोदर किंवा नंतर 'श्' किंवा त वर्गातील कोणतेही व्यंजन आले तर 'स्' बद्दल 'श्' होतो.
उदा. – रामस्+शेते=रामश्शेते । कस्+चित्+कश्चित् । वृक्षस्+छादयति=वृक्षश्छादयति ।
२) त वर्गातील (त् थ् द् ध् न्) या कोणत्याही व्यंजनाच्या अगोदर किंवा नंतर च वर्गाचील (च्, छ्, ज्, झ्, ञ्) कोणतेही व्यंजन आल्यास 'त्' बद्दल 'च्', 'थ्' बद्दल 'छ्' 'द्' बद्दल 'ज्' ध बद्दल 'झ्' व 'न्' बद्दल 'ञ्' होतो.
उदा. तत्+च=तच्च । एतत्+जलम्= एतज्जलम् । एतत्+छदिः=एतच्छदिः । बृहद्+झरः+बृहज्झरः । यज्+नः= यज्+ञः=यज्ञः=यज्ञः ।
याच्+ना=याच्+ञा=याच्ञा ।

**१०. ष्टुना ष्टुः** – १) 'स्' च्या अगोदर किंवा नंतर 'ष्' किंवा ट वर्गातील कोणतेही व्यंजन आले तर 'स्' बद्दल 'ष्' होतो. उदा. – रामस्+षष्ठः=रामषष्ठः । रामस्+टीकते=रामष्टीकते ।
२) त वर्गातील (त् थ् द् ध् न् या) कोणत्याही व्यंजनाच्या अगोदर किंवा नंतर ष किंवा ट वर्गाचील (ट्, ठ्, ड्, ढ्, ण् यापैकी) कोणतेही व्यंजन आल्यास 'त्' बद्दल 'ट्', 'थ्' बद्दल 'ठ्', 'द्' बद्दल 'ड्', ध् बद्दल 'ढ्', व 'न्' बद्दल 'ण्' होतो. उदा. तत्+टीका=तट्टीका । उद्+डीनः= उड्डीनः । विष्+नुः=विष्णुः । कृष्+नः=कृष्णः ।

**११. झलां जश् झशि** = अनुनासिक अर्थात ङ ञ ण न म व अन्तस्थ अर्थात य र ल व या व्यंजनाच्या व्यतिरिक्त कोणत्याही व्यंजनापुढे कोणत्याही वर्गाचे तिसरे अर्थात ग ज ड द ब व चौथे अर्थात घ झ ढ ध भ यापैकी एखादे व्यंजन आले तर पूर्वीच्या (अगोदरच्या) व्यंजनाबद्दल त्याच्याच वर्गातील तिसरे व्यंजन होते.
उदा. – दुघ्+धम् = दुग्धम, आरभ्+धम् = आरब्धम् बुध्+धिः = बुद्धिः । लभ्+धः = लब्धः ।

**१२. खरि च** = अनुनासिक अर्थात ङ, ञ, ण, न, म व अन्तसस्थ अर्थात य र ल व या व्यंजनांच्या व्यतिरिक्त कोणत्याही वर्गातील व्यंजनापुढे कठोर व्यंजन अर्थात क, च, ट, त, प, ख, छ, ठ, थ, फ, श, ष, स या व्यंजनांपैकी एखादे व्यंजन आल्यास पूर्वीच्या (अगोदरच्या) व्यंजनाबद्दल त्याच्याच वर्गातील पहिले व्यंजन होते. उदा. – भेद्+तुम् = भेत्तुम । लभ्+सते = लप्सते । युयुध्+सते=युयुत्सते ।

**१३. यरोऽनुनासिकेऽनुनासिको वा** = अनुनासिक अर्थात ङ, ञ, ण, न, म यांच्या शिवाय कोणतेही व्यंजन पदाच्या अर्थात शब्दरूपाच्या किंवा धातुरूपाच्या शेवटी आल्यास त्यापुढे अनुनासिक असेल तर अगोदरच्या (पूर्वीच्या) व्यंजनाबद्दल त्याच्याच वर्गातील तिसरे व्यंजन होते किंवा ते अगोदरचे व्यंजन कायम राहते.

उदा. एतद् + मुरारिः = एतन्मुरारिः किंवा एतद् मुरारिः । वाग्+नयति = वाङ्नयति किंवा वाग् नयति

**१४. वाऽपदान्तस्य** = पदाच्या अर्थात शब्दरूपाच्या किंवा धातुरूपाच्या अन्ती असणाऱ्या 'म्' पुढे श, ष, स, ह आणि र या व्यंजनांच्या व्यतिरिक्त कोणतेही व्यंजन आल्यास 'म्' बद्दल अनुस्वार होतो. किंवा पुढचे (म् च्या नंतरचे) व्यंजन ज्या वर्गातील असते, त्या वर्गातील अनुनासिक 'म्' बद्दल होते

उदा. = त्वम् + किम् = त्वं किम किंवा त्वङ्किम् (त्वङ्किम्) । तृणम् + चरति = तृणं चरति किंवा तृणञ्चरति ।

प्रमाणम्=टीकते=प्रमाणं टीकते किंवा प्रमाण्टीकते । पाठम् + पठति = पाठंपठति किंवा पाठम्पठति श ष स ह आणि र पुढे असता त्या पदान्त 'म्' चा फक्त अनुस्वार होईल. उदा. त्वम् + शिक्षसे = त्वं शिक्षसे

**१५. ङमो ह्रस्वादचि ङमुण् नित्यम्** ङ्, ण्, न् यांच्या पूर्वी ह्रस्व स्वरं असून पुढे कोणताही स्वर आल्यास हे वर्ण द्वित्व पावतात.

उदा. – पश्यन्+अस्ति=पश्यन्नस्ति । अनिच्छन्+अपि=अनिच्छन्नपि ।

**१६. (ससजुषोःरुः)** विसर्गाच्या अगोदर अ व आ या स्वराव्यतिरिक्त कोणताही स्वर असून त्यापुढे स्वरु किंवा मृदु व्यंजन अर्थात प्रत्येक वर्गाचे तिसरे, चौथे व पाचवे व्यंजन आणि य्, र्, ल्, व्, ह् यापैकी कोणतेही व्यंजन आल्यास विसर्गाचा 'र्' होतो. उदा. – हरिः+अवदत्=हरिरवदत् । भानुः+उदेति=भानुरुदेति। दोषैः+एतैः=दोषैरेतैः, गुरोः+भाषणम्=गरोर्भाषणम्, हरिः+वदति=हरिर्वदति ।

**लक्षात असू द्या** – र् पुढे र् आल्यास पहिल्या र् चा लोप होतो व त्यापूर्वी (अगोदर) असलेले अ,इ,उ हे ह्रस्व स्वर दीर्घ होतात. भूपतिः+रक्षति=भूपतिर्+रक्षति=भूपती रक्षति ।

**१७. (विसर्जनीयस्य सः)** १. विसर्गाच्या अगोदर (पूर्वी) कोणताही स्वर असून त्यापुढे (त्यानंतर) च किंवा छ आल्यास विसर्गाचा 'श्' होतो.

उदा. = नृपः+चलति = नृपश्चलति । कतिभिः छात्रैः = कतिभिश्छात्रैः ।

२. विसर्गाच्या अगोदर कोणताही स्वर असून त्यापुढे (त्यानंतर) ट किंवा ठ आल्यास विसर्गाचा 'ष्' होतो.

उदा. पतञ्जलेः+टीका = पतञ्जलेष्टीका । भीतः+ टलति = भीतष्टलति ।

३. विसर्गाच्या अगोदर कोणताही स्वर असून त्यापुढे त किंवा थ आल्यास विसर्गाचा 'स्' होतो.

उदा. रामः+तरति= रामस्तरति । भानुः+तपति=भानुस्तपति ।

**१८. अतो रोरप्लुतादप्लुते** = विसर्गाच्या पूर्वी (अगोदर) अ असून त्यापुढे (नंतर) अ आल्यास विसर्गाचा उ होतो तो उ व अगोदरचा अ मिळून 'ओ' होतो.

उदा. – बालः+अस्ति=बाल् अः+अस्ति=बाल्+अ+उ+अस्ति+बालो+अस्ति=बालोऽस्ति याप्रमाणे

बालः+अगच्छत्=बालोऽगच्छत् । रामः+अनमत् = रामोऽनमत् ।

**१९. हशि च** = विसर्गाच्या पूर्वी (अगोदर) अ असून त्या पुढे मृदुव्यंजन अर्थात कोणत्याही वर्गातील तिसरे, चौथे किंवा पाचवे व्यंजन तसेच य,र,ल,व आणि ह यापैकी एखादे व्यंजन आल्यास विसर्गाचा उ होतो. तो उ व पूर्वीचा (अगोदरचा) अ मिळून 'ओ' होतो.

उदा. – बालकः +गच्छति =बालको गच्छति । नृपः+जयति=नृपो जयति ।

**२०. ...अपूर्वस्य योऽशि** = १. विसर्गाच्या पूर्वी (अगोदर) अ असून त्यापुढे अ व्यतिरिक्त दुसरा कोणताही स्वर आल्यास विसर्गाचा 'य्' होतो. अशाप्रकारे विसर्गापासून झालेल्या य् चा विकल्पाने लोप होतो. य चा लोप होऊन जे दोन स्वर एकत्र येतात तेव्हा पुन्हा संधी होत नाही..

उदा. – सूर्यः +उदेति=सूर्य उदेति किंवा सुर्ययुदेति ।

बालः+इच्छति = बाल इच्छति किंवा बालयिच्छति ।

२. विसर्गाच्या पूर्वी (अगोदर) आ असून पुढे कोणताही स्वर आल्यास विसर्गाचा य् होतो. अशाप्रकारे विसर्गापासून झालेल्या य् चा विकल्पाने लोप होतो. य् चा लोप होऊन जे दोन स्वर एकत्र येतात तेव्हा पुन्हा संधी होत नाही.

उदा. – जनाः+अवसन् = जना अवसन किंवा जनायवसन । नराः+ऐच्छिन् = नरा ऐच्छन् किंवा नरायैच्छन् ।

**२१. हलि सर्वेषाम्** = विसर्गाच्या पूर्वी (अगोदर) आ असून त्यापुढे मृदु व्यंजन अर्थात कोणत्याही वर्गातील तिसरे, चौथे किंवा पाचवे व्यंजन तसेच य, र, ल, व आणि ह यापैकी एखादे व्यंजन आल्यास विसर्गाचा लोप होतो.

उदा. जनाः गच्छन्ति = जना गच्छन्ति । भक्ताः नमन्ति=भक्ता नमन्ति ।

# शब्दरूप संग्रह

### १. देव (देव) = अकारान्त पु.

| | एकवचन | द्विवचन | बहुवचन |
|---|---|---|---|
| प्रथमा-कर्ता | देवः | देवौ | देवाः |
| द्वितीया-कर्म | देवम् | देवौ | देवान् |
| तृतीया-करण | देवेन | देवाभ्याम् | देवैः |
| चतुर्थी-सम्प्रदान | देवाय | देवाभ्याम् | देवेभ्यः |
| पंचमी-अपादान | देवात् | देवाभ्याम् | देवेभ्यः |
| षष्ठी-संबंध | देवस्य | देवयोः | देवानाम् |
| सप्तमी-अधिकरण | देवे | देवयोः | देवेषु |
| संबोधन-संबोधन | हे देव | हे देवौ | हे देवाः |

### २. कवि (कविता करणारा) = इकारान्त पुल्लिंग

| | एकवचन | द्विवचन | बहुवचन |
|---|---|---|---|
| प्रथमा-कर्ता | कविः | कवी | कवयः |
| द्वितीया-कर्म | कविम् | कवी | कवीन् |
| तृतीया-करण | कविना | कविभ्याम् | कविभिः |
| चतुर्थी-सम्प्रदान | कवये | कविभ्याम् | कविभ्यः |
| पंचमी-अपादान | कवेः | कविभ्याम् | कविभ्यः |
| षष्ठी-संबंध | कवेः | कव्योः | कवीनाम् |
| सप्तमी-अधिकरण | कवौ | कव्योः | कविषु |
| संबोधन-संबोधन | हे कवे | हे कवी | हे कवयः |

### ३. सखि (मित्र) = इकारान्त पु.

| | एकवचन | द्विवचन | बहुवचन |
|---|---|---|---|
| प्रथमा-कर्ता | सखा | सखायौ | सखायः |
| द्वितीया-कर्म | सखायम् | सखायौ | सखीन् |
| तृतीया-करण | सख्या | सखिभ्याम् | सखिभिः |
| चतुर्थी-सम्प्रदान | सख्ये | सखिभ्याम् | सखिभ्यः |
| पंचमी-अपादान | सख्युः | सखिभ्याम् | सखिभ्यः |
| षष्ठी-संबंध | सख्युः | सख्योः | सखीनाम् |
| सप्तमी-अधिकरण | सख्यौ | सख्योः | सखिषु |
| संबोधन-संबोधन | हे सखे | हे सखायौ | हे सखायः |

### ४. भानु (सूर्य) = उकारान्त पुल्लिंग

| | एकवचन | द्विवचन | बहुवचन |
|---|---|---|---|
| प्रथमा-कर्ता | भानुः | भानू | भानवः |
| द्वितीया-कर्म | भानुम् | भानू | भानून् |
| तृतीया-करण | भानुना | भानुभ्याम् | भानुभिः |
| चतुर्थी-सम्प्रदान | भानवे | भानुभ्याम् | भानुभ्यः |
| पंचमी-अपादान | भानोः | भानुभ्याम् | भानुभ्यः |
| षष्ठी-संबंध | भानोः | भान्वोः | भानूनाम् |
| सप्तमी-अधिकरण | भानौ | भान्वोः | भानुषु |
| संबोधन-संबोधन | हे भानो | हे भानू | हे भानवः |

### ५. स्वयम्भू (स्वतः होणारा) = ऊकारान्त पुल्लिंग

| | एकवचन | द्विवचन | बहुवचन |
|---|---|---|---|
| प्रथमा-कर्ता | स्वयम्भूः | स्वयम्भुवौ | स्वयम्भुवः |
| द्वितीया-कर्म | स्वयम्भुवम् | स्वयम्भुवौ | स्वयम्भुवः |
| तृतीया-करण | स्वयम्भुवा | स्वयम्भूभ्याम् | स्वयम्भूभिः |
| चतुर्थी-सम्प्रदान | स्वयम्भुवे | स्वयम्भूभ्याम् | स्वयम्भूभ्यः |
| पंचमी-अपादान | स्वयम्भुवः | स्वयम्भूभ्याम | स्वयम्भुवाम् |
| षष्ठी-संबंध | स्वयम्भुवः | स्वयम्भुवोः | स्वयम्भुवाम् |
| सप्तमी-अधिकरण | स्वयम्भुवि | स्वयम्भुवोः | स्वयम्भूषु |
| संबोधन-संबोधन | हे स्वयम्भू | हे स्वयम्भुवौ | हे स्वयम्भुवः |

### ६. कर्तृ (करने वाला) = ऋकारान्त पुल्लिंगी

| | एकवचन | द्विवचन | बहुवचन |
|---|---|---|---|
| प्रथमा-कर्ता | कर्ता | कर्तारौ | कर्तारः |
| द्वितीया-कर्म | कर्तारम् | कर्तारौ | कर्तॄन् |
| तृतीया-करण | कर्त्रा | कर्तृभ्याम् | कर्तृभिः |
| चतुर्थी-सम्प्रदान | कर्त्रे | कर्तृभ्याम् | कर्तृभ्यः |
| पंचमी-अपादान | कर्तुः | कर्तृभ्याम् | कर्तृभ्यः |
| षष्ठी-संबंध | कर्तुः | कर्त्रोः | कर्तॄणाम् |
| सप्तमी-अधिकरण | कर्तरि | कर्त्रोः | कर्तृषु |
| संबोधन-संबोधन | हे कर्तः | हे कर्तारौ | हे कर्तारः |

### ७. पितृ (पिता) = ऋकारान्त पुल्लिंगी

| | एकवचन | द्विवचन | बहुवचन |
|---|---|---|---|
| प्रथमा-कर्ता | पिता | पितरौ | पितरः |
| द्वितीया-कर्म | पितरम् | पितरौ | पितॄन् |
| तृतीया-करण | पित्रा | पितृभ्याम् | पितृभिः |
| चतुर्थी-सम्प्रदान | पित्रे | पितृभ्याम् | पितृभ्यः |
| पंचमी-अपादान | पितुः | पितृभ्याम् | पितृभ्यः |
| षष्ठी-संबंध | पितुः | पित्रोः | पितॄणाम् |
| सप्तमी-अधिकरण | पितरि | पित्रोः | पितृषु |
| संबोधन-संबोधन | हे पितः | हे पितरौ | हे पितरः |

### ८. गो (गाय वा बैल) = ओकारान्त पु. स्त्री.

| | एकवचन | द्विवचन | बहुवचन |
|---|---|---|---|
| प्रथमा-कर्ता | गौः | गावौ | गावः |
| द्वितीया-कर्म | गाम् | गावौ | गाः |
| तृतीया-करण | गवा | गोभ्याम् | गोभिः |
| चतुर्थी-सम्प्रदान | गवे | गोभ्याम् | गोभ्यः |
| पंचमी-अपादान | गोः | गोभ्याम् | गोभ्यः |
| षष्ठी-संबंध | गोः | गवोः | गवाम् |
| सप्तमी-अधिकरण | गवि | गवोः | गोषु |
| संबोधन-संबोधन | हे गौः | हे गावौ | हे गावः |

**९. भूभृत् (राजा, पर्वत) = तकारान्त पु.**

| | एकवचन | द्विवचन | बहुवचन |
|---|---|---|---|
| प्रथमा-कर्ता | भूभृत् | भूभृतौ | भूभृतः |
| द्वितीया-कर्म | भूभृतम् | भूभृतौ | भूभृतः |
| तृतीया-करण | भूभृता | भूभृद्भ्याम् | भूभृद्भिः |
| चतुर्थी-सम्प्रदान | भूभृते | भूभृद्भ्याम् | भूभृद्भ्यः |
| पंचमी-अपादान | भूभृतः | भूभृद्भ्याम् | भूभृद्भ्यः |
| षष्ठी-संबंध | भूभृतः | भूभृतोः | भूभृताम् |
| सप्तमी-अधिकरण | भूभृति | भूभृतोः | भूभृत्सु |
| संवोधन-संबोधन | हे भूभृत् | हे भूभृतौ | हे भूभृतः |

**१०. भगवत् (भगवान) = तकारान्त पु.**

| | एकवचन | द्विवचन | बहुवचन |
|---|---|---|---|
| प्रथमा-कर्ता | भगवान् | भगवन्तौ | भगवन्तः |
| द्वितीया-कर्म | भगवन्तम् | भगवन्तौ | भगवतः |
| तृतीया-करण | भगवता | भगवद्भ्याम् | भगवद्भिः |
| चतुर्थी-सम्प्रदान | भगवते | भगदद्भ्याम् | भगवद्भ्यः |
| पंचमी-अपादान | भगवतः | भगवद्भ्याम् | भगवद्भ्यः |
| षष्ठी-संबंध | भगवतः | भगवतोः | भगवताम् |
| सप्तमी-अधिकरण | भगवति | भगवतोः | भगवत्सु |
| संवोधन-संबोधन | हे भगवन् | हे भगवन्तौ | हे भगवन्तः |

**११. गच्छत् (जाणारा) = तकारान्त पु.**

| | एकवचन | द्विवचन | बहुवचन |
|---|---|---|---|
| प्रथमा-कर्ता | गच्छन् | गच्छन्तौ | गच्छन्तः |
| द्वितीया-कर्म | गच्छन्तम् | गच्छन्तौ | गच्छतः |
| तृतीया-करण | गच्छता | गच्छद्भ्याम् | गच्छद्भिः |
| चतुर्थी-सम्प्रदान | गच्छते | गच्छद्भ्याम् | गच्छद्भ्यः |
| पंचमी-अपादान | गच्छतः | गच्छद्भ्याम् | गच्छद्भ्यः |
| षष्ठी-संबंध | गच्छतः | गच्छतोः | गच्छताम् |
| सप्तमी-अधिकरण | गच्छति | गच्छतोः | गच्छत्सु |
| संवोधन-संबोधन | हे गच्छन् | हे गच्छन्तौ | हे गच्छन्तः |

**१२. योगिन् (योगी) = इन्नन्त पुल्लिंग**

| | एकवचन | द्विवचन | बहुवचन |
|---|---|---|---|
| प्रथमा-कर्ता | योगी | योगिनौ | योगिनः |
| द्वितीया-कर्म | योगिनम् | योगिनौ | योगिनः |
| तृतीया-करण | योगिना | योगिभ्याम् | योगिभिः |
| चतुर्थी-सम्प्रदान | योगिने | योगिभ्याम् | योगिभ्यः |
| पंचमी-अपादान | योगिनः | योगिभ्याम् | योगिभ्यः |
| षष्ठी-संबंध | योगिनः | योगिनोः | योगिनाम् |
| सप्तमी-अधिकरण | योगिनि | योगिनोः | योगिषु |
| संबोधन-संबोधन | हे योगिन् | हे योगिनौ | हे योगिनः |

**१३. पथिन् (मार्ग) = इन्नन्त पु.**

| | एकवचन | द्विवचन | बहुवचन |
|---|---|---|---|
| प्रथमा-कर्ता | पन्थाः | पन्थानौ | पन्थानः |
| द्वितीया-कर्म | पन्थानम् | पन्थानौ | पथः |
| तृतीया-करण | पथा | पथिभ्याम् | पथिभिः |
| चतुर्थी-सम्प्रदान | पथे | पथिभ्याम् | पथिभ्यः |
| पंचमी-अपादान | पथः | पथिभ्याम् | पथिभ्यः |
| षष्ठी-संबंध | पथः | पथोः | पथाम् |
| सप्तमी-अधिकरण | पथि | पथोः | पथिषु |
| संवोधन-संबोधन | हे पन्थाः | हे पन्थानौ | हे पन्थानः |

**१४. आत्मन् (आत्मा) = अन्नन्त पु.**

| | एकवचन | द्विवचन | बहुवचन |
|---|---|---|---|
| प्रथमा-कर्ता | आत्मा | आत्मानौ | आत्मानः |
| द्वितीया-कर्म | आत्मानम् | आत्मानौ | आत्मनः |
| तृतीया-करण | आत्मना | आत्मभ्याम् | आत्माभिः |
| चतुर्थी-सम्प्रदान | आत्मने | आत्मभ्याम् | आत्मभ्यः |
| पंचमी-अपादान | आत्मनः | आत्मभ्याम् | आत्मभ्यः |
| षष्ठी-संबंध | आत्मनः | आत्मनोः | आत्मनाम् |
| सप्तमी-अधिकरण | आत्मनि | आत्मनोः | आत्मसु |
| संबोधन-संबोधन | हे आत्मन् | हे आत्मानौ | हे आत्मानः |

**१५. राजन् (राजा) = अन्नन्त पु.**

| | एकवचन | द्विवचन | बहुवचन |
|---|---|---|---|
| प्रथमा-कर्ता | राजा | राजानौ | राजानः |
| द्वितीया-कर्म | राजानम् | राजानौ | राज्ञः |
| तृतीया-करण | राज्ञा | राजभ्याम् | राजभिः |
| चतुर्थी-सम्प्रदान | राज्ञे | राजभ्याम् | राजभ्यः |
| पंचमी-अपादान | राज्ञः | राजभ्याम् | राजभ्यः |
| षष्ठी-संबंध | राज्ञः | राज्ञोः | राज्ञाम् |
| सप्तमी-अधिकरण | राज्ञि, राजनि | राज्ञोः | राजसु |
| संवोधन-संबोधन | हे राजन् | हे राजानौ | हे राजानः |

**१६. विद्वस् (विद्वान्) = असन्त पु**

| | एकवचन | द्विवचन | बहुवचन |
|---|---|---|---|
| प्रथमा-कर्ता | विद्वान् | विद्वांसौ | विद्वांसः |
| द्वितीया-कर्म | विद्वांसम् | विद्वांसौ | विदुषः |
| तृतीया-करण | विदुषा | विद्वद्भ्याम् | विद्वद्भिः |
| चतुर्थी-सम्प्रदान | विदुषे | विद्वद्भ्याम् | विद्वद्भ्यः |
| पंचमी-अपादान | विदुषः | विद्वद्भ्याम् | विद्वद्भ्यः |
| षष्ठी-संबंध | विदुषः | विदुषोः | विदुषाम् |
| सप्तमी-अधिकरण | विदुषि | विदुषोः | विद्वत्सु |
| संबोधन-संबोधन | हे विद्वन् | हे विद्वांसौ | हे विद्वांसः |

## १७. माला (माळ) = आकारान्त स्त्रीलिंगी

| | एकवचन | द्विवचन | बहुवचन |
|---|---|---|---|
| प्रथमा-कर्ता | माला | माले | मालाः |
| द्वितीया-कर्म | मालाम् | माले | मालाः |
| तृतीया-करण | मालया | मालाभ्याम् | मालाभिः |
| चतुर्थी-सम्प्रदान | मालायै | मालाभ्याम् | मालाभ्यः |
| पंचमी-अपादान | मालायाः | मालाभ्याम् | मालाभ्यः |
| षष्ठी-संबंध | मालायाः | मालयोः | मालानाम् |
| सप्तमी-अधिकरण | मालायाम् | माललयोः | मालासु |
| संबोधन-संबोधन | हे माले | हे माले | हे मालाः |

## १८. मति (बुद्धि) = इकारान्त स्त्री.

| | एकवचन | द्विवचन | बहुवचन |
|---|---|---|---|
| प्रथमा-कर्ता | मतिः | मती | मतयः |
| द्वितीया-कर्म | मतिम् | मती | मतीः |
| तृतीया-करण | मत्या | मतिभ्याम् | मतिभिः |
| चतुर्थी-सम्प्रदान | मत्यै, मतये | मतिभ्याम् | मतिभ्यः |
| पंचमी-अपादान | मत्याः, मतेः | मतिभ्याम् | मतिभ्यः |
| षष्ठी-संबंध | मत्याः, मतेः | मत्योः | मतीनाम् |
| सप्तमी-अधिकरण | मत्याम्, मतौ | मत्योः | मतिषु |
| संबोधन-संबोधन | हे मते | हे मती | हे मतयः |

## १९. नदी (नदी) = ईकारान्त स्त्री.

| | एकवचन | द्विवचन | बहुवचन |
|---|---|---|---|
| प्रथमा-कर्ता | नदी | नद्यौ | नद्यः |
| द्वितीया-कर्म | नदीम् | नद्यौ | नदीः |
| तृतीया-करण | नद्या | नदीभ्याम् | नदीभिः |
| चतुर्थी-सम्प्रदान | नद्यै | नदीभ्याम् | नदीभ्यः |
| पंचमी-अपादान | नद्याः | नदीभ्याम् | नदीभ्यः |
| षष्ठी-संबंध | नद्याः | नद्योः | नदीनाम् |
| सप्तमी-अधिकरण | नद्याम् | नद्योः | नदीषु |
| संबोधन-संबोधन | हे नदि | हे नद्यौ | हे नद्यः |

## २०. स्त्री (स्त्री) = ईकारान्त स्त्री

| | एकवचन | द्विवचन | बहुवचन |
|---|---|---|---|
| प्रथमा-कर्ता | स्त्री | स्त्रियो | स्त्रियः |
| द्वितीया-कर्म | स्त्रियम् | स्त्रियौ | स्त्रियः |
| | स्त्रीम् | स्त्रियौ | स्त्रीः |
| तृतीया-करण | स्त्रिया | स्त्रीभ्याम् | स्त्रीभिः |
| चतुर्थी-सम्प्रदान | स्त्रियै | स्त्रीभ्याम् | स्त्रीभ्यः |
| पंचमी-अपादान | स्त्रियाः | स्त्रीभ्याम् | स्त्रीभ्यः |
| षष्ठी-संबंध | स्त्रियाः | स्त्रियोः | स्त्रीणाम् |
| सप्तमी-अधिकरण | स्त्रियाम् | स्त्रियोः | स्त्रीषु |
| संबोधन-संबोधन | हे स्त्री | हे स्त्रियौ | हे स्त्रियः |

## २१. धेनु (गाय) = उकारान्त स्त्री

| | एकवचन | द्विवचन | बहुवचन |
|---|---|---|---|
| प्रथमा-कर्ता | धेनुः | धेनू | धेनवः |
| द्वितीया-कर्म | धेनुम् | धेनू | धेनूः |
| तृतीया-करण | धेन्वा | धेनुभ्याम् | धेनुभिः |
| चतुर्थी-सम्प्रदान | धेन्वै, धेनवे | धेनुभ्याम् | धेनुभ्यः |
| पंचमी-अपादान | धेन्वाः, धेनोः | धेनुभ्याम् | धेनुभ्यः. |
| षष्ठी-संबंध | धेन्वाः, धेनोः | धेन्वोः | धेनूनाम् |
| सप्तमी-अधिकरण | धेन्वाम्, धेनौ | धेन्वोः | धेनुषु |
| संबोधन-संबोधन | हे धेनो | हे धेनू | हे धेनवः |

## २२. वधू (वधू) = ऊकारान्त स्त्री

| | एकवचन | द्विवचन | बहुवचन |
|---|---|---|---|
| प्रथमा-कर्ता | वधूः | वध्वौ | वध्वः |
| द्वितीया-कर्म | वधूम् | वध्वौ | वधूः |
| तृतीया-करण | वध्वा | वधूभ्याम् | वधूभिः |
| चतुर्थी-सम्प्रदान | वध्वै | वधूभ्याम् | वधूभ्यः |
| पंचमी-अपादान | वध्वाः | वधूभ्याम् | वधूभ्यः |
| षष्ठी-संबंध | वध्वाः | वध्वोः | वधूनाम |
| सप्तमी-अधिकरण | वध्वाम् | वध्वोः | वधूषु |
| संबोधन-संबोधन | हे वधु | हे वध्वौ | हे वध्वः |

## २३. मातृ (माता) = ऋकारान्त स्त्री.

| | एकवचन | द्विवचन | बहुवचन |
|---|---|---|---|
| प्रथमा-कर्ता | माता | मातरौ | मातरः |
| द्वितीया-कर्म | मातरम् | मातरौ | मातृः |
| तृतीया-करण | मात्रा | मातृभ्याम् | मातृभिः |
| चतुर्थी-सम्प्रदान | मात्रे | मातृभ्याम् | मातृभ्यः |
| पंचमी-अपादान | मातुः | मातृभ्याम् | मातृभ्यः |
| षष्ठी-संबंध | मातुः | मात्रोः | मातृणाम् |
| सप्तमी-अधिकरण | मातरि | मात्रोः | मातृषु |
| संबोधन-संबोधन | हे मातः | हे मातरौ | हे मातरः |

## २४. वाच् (वाणी) = चकारान्त स्त्री

| | एकवचन | द्विवचन | बहुवचन |
|---|---|---|---|
| प्रथमा-कर्ता | वाक्-ग् | वाचौ | वाचः |
| द्वितीया-कर्म | वाचम् | वाचौ | वाचः |
| तृतीया-करण | वाचा | वाग्भ्याम् | वाग्भिः |
| चतुर्थी-सम्प्रदान | वाचे | वाग्भ्याम् | वाग्भ्यः |
| पंचमी-अपादान | वाचः | वाग्भ्याम् | वाग्भयः |
| षष्ठी-संबंध | वाचः | वाचो | वाचाम् |
| सप्तमी-अधिकरण | वाचि | वाचौः | वाक्षु |
| संबोधन-संबोधन | हे वाक्-ग | हे वाचौ | हे वाचः |

### २५. दिश् (दिशा) = शकारान्त स्त्री

| | एकवचन | द्विवचन | बहुवचन |
|---|---|---|---|
| प्रथमा-कर्ता | दिक्-ग् | दिशौ | दिशः |
| द्वितीया-कर्म | दिशम् | दिशौ | दिशः |
| तृतीया-करण | दिशा | दिग्भ्याम् | दिग्भिः |
| चतुर्थी-सम्प्रदान | दिशे | दिग्भ्याम् | दिग्भ्यः |
| पंचमी-अपादान | दिशः | दिग्भ्याम् | दिग्भयः |
| षष्ठी-संबंध | दिशः | दिशोः | दिशाम् |
| सप्तमी-अधिकरण | दिशि | दिशोः | दिक्षु |
| संबोधन-संबोधन | हे दिक्-ग् | हे दिशौ | हे दिशः |

### २६. सरित् (नदी) = तकारान्त स्त्री.

| | एकवचन | द्विवचन | बहुवचन |
|---|---|---|---|
| प्रथमा-कर्ता | सरित् | सरितौ | सरितः |
| द्वितीया-कर्म | सरितम् | सरितौ | सरितः |
| तृतीया-करण | सरिता | सरिद्भ्याम् | सरिद्भिः |
| चतुर्थी-सम्प्रदान | सरिते | सरिद्भ्याम् | सरिद्भ्यः |
| पंचमी-अपादान | सरितः | सरिद्भ्याम् | सरिद्भ्यः |
| षष्ठी-संबंध | सरितः | सरितोः | सरिताम् |
| सप्तमी-अधिकरण | सरिति | सरितोः | सरित्सु |
| संबोधन-संबोधन | हे सरित् | हे सरितौ | हे सरितः |

### २७. क्षुध् (भूख) = धकारान्त स्त्री.

| | एकवचन | द्विवचन | बहुवचन |
|---|---|---|---|
| प्रथमा-कर्ता | क्षुत् | क्षुधौ | क्षुधः |
| द्वितीया-कर्म | क्षुधम् | क्षुधौ | क्षुधः |
| तृतीया-करण | क्षुधा | क्षुद्भ्याम् | क्षुद्भिः |
| चतुर्थी-सम्प्रदान | क्षुधे | क्षुद्भ्याम् | क्षुद्भ्यः |
| पंचमी-अपादान | क्षुधः | क्षुद्भ्याम् | क्षुद्भ्यः |
| षष्ठी-संबंध | क्षुधः | क्षुधोः | क्षुधाम् |
| सप्तमी-अधिकरण | क्षुधि | क्षुधोः | क्षुत्सु |
| संबोधन-संबोधन | हे क्षुत् | हे क्षुधौ | हे क्षुधः |

### २८. गिर् (वाणी, वाचा) = रकारान्त स्त्री.

| | एकवचन | द्विवचन | बहुवचन |
|---|---|---|---|
| प्रथमा-कर्ता | गीः | गिरौ | गिरः |
| द्वितीया-कर्म | गिरम् | गिरौ | गिरः |
| तृतीया-करण | गिरा | गीर्भ्याम् | गीर्भिः |
| चतुर्थी-सम्प्रदान | गिरे | गीर्भ्याम् | गीर्भ्यः |
| पंचमी-अपादान | गिरः | गीर्भ्याम् | गीर्भ्यः |
| षष्ठी-संबंध | गिरः | गिरोः | गीराम् |
| सप्तमी-अधिकरण | गिरि | गिरोः | गीर्षु |
| संबोधन-संबोधन | हे गीः | हे गिरौ | हे गिरः |

### २९. उपानह् (बुट, पादत्राण) = हकारान्त स्त्री.

| | एकवचन | द्विवचन | बहुवचन |
|---|---|---|---|
| प्रथमा-कर्ता | उपानत् | उपानहौ | उपानहः |
| द्वितीया-कर्म | उपानहम् | उपानहौ | उपानहः |
| तृतीया-करण | उपानहा | उपानद्भ्याम् | उपानद्भिः |
| चतुर्थी-सम्प्रदान | उपानहे | उपानद्भ्याम् | उपानद्भ्यः |
| पंचमी-अपादान | उपानहः | उपानद्भ्याम् | उपानद्भ्यः |
| षष्ठी-संबंध | उपाहनः | उपानहोः | उपानहाम् |
| सप्तमी-अधिकरण | उपानहि | उपानहोः | उपानत्सु |
| संबोधन-संबोधन | हे उपानत् | हे उपानहौ | हे उपानहः |

### ३०. वन (जंगल) = अकारान्त नपुं.

| | एकवचन | द्विवचन | बहुवचन |
|---|---|---|---|
| प्रथमा-कर्ता | वनम् | वने | वनानि |
| द्वितीया-कर्म | वनम् | वने | वनानि |
| तृतीया-करण | वनेन | वनाभ्याम् | वनैः |
| चतुर्थी-सम्प्रदान | वनाय | वनाभ्याम् | वनेभ्यः |
| पंचमी-अपादान | वनात् | वनाभ्याम् | वनेभ्यः |
| षष्ठी-संबंध | वनस्य | वनयोः | वनानाम् |
| सप्तमी-अधिकरण | वने | वनयोः | वनेषु |
| संबोधन-संबोधन | हे वन | हे वने | हे वनानि |

### ३१. वारि (जल) = इकारान्त नपुं.

| | एकवचन | द्विवचन | बहुवचन |
|---|---|---|---|
| प्रथमा-कर्ता | वारि | वारिणी | वारीणि |
| द्वितीया-कर्म | वारि | वारिणी | वारीणि |
| तृतीया-करण | वारिणा | वारिभ्याम् | वारिभिः |
| चतुर्थी-सम्प्रदान | वारिणे | वारिभ्याम् | वारिभ्यः |
| पंचमी-अपादान | वारिणः | वारिभ्याम् | वारिभ्यः |
| षष्ठी-संबंध | वारिणः | वारिणोः | वारीणाम् |
| सप्तमी-अधिकरण | वारिणि | वारिणोः | वारिषु |
| संबोधन-संबोधन | हे वारि-रे | हे वारिणी | हे वारिणि |

### ३२. दधि (दहि) = इकारान्त नपुं

| | एकवचन | द्विवचन | बहुवचन |
|---|---|---|---|
| प्रथमा-कर्ता | दधि | दधिनी | दधीनि |
| द्वितीया-कर्म | दधि | दधिनी | दधीनि |
| तृतीया-करण | दध्ना | दधिभ्याम् | दधिभिः |
| चतुर्थी-सम्प्रदान | दध्ने | दधिभ्याम् | दधिभ्यः |
| पंचमी-अपादान | दध्नः | दधिभ्याम् | दधिभ्यः |
| षष्ठी-संबंध | दध्नः | दध्नोः | दध्नाम् |
| सप्तमी-अधिकरण | दध्नि, दधनि | दध्योः | दधिषु |
| संबोधन-संबोधन | हे दधि-धे | हे दधिनी | हे दधीनि |

